


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका

# नवी क्षितिजे

अंक-१९
वर्ष-४

नाटयोत्पत्तीच्या संबंधातील एक संकल्पना
*जेम्स लेव्हर*
*अनुवादक–माधव मनोहर*

विद्येच्या वाटेवर
*दुर्गा भागवत*

एका इंग्रजाच्या शब्दात सावरकर
*वि. श्री. जोशी*

मानवाचे हृदय

हिटलर–एक मानसशास्त्रीय अभ्यास
*नाना जोशी*

कि. ५ रुपये

अनुक्रमणिका



वर्ष चौथे
अंक १६ वा
ऑक्टो. नोव्हें. डिसें. ७२

# नवी क्षितिजे

संपादक :
नाना जोशी
विश्वास पाटील
रचना :
पामार्ट, मुंबई २८.
पत्रव्यवहाराचा पत्ता :
विश्वास पाटील
पुष्प कुंज, पाळखी वाडी,
१३, काशीनाथ धुरु रोड, मुंबई २८.
मुद्रक व प्रकाशक :
सौ. शुभांगी जोशी
३२९, वि. प. रोड, मुंबई ४.
वार्षिक वर्गणी
रु. १२-५०
या अंकाची
किंमत रु पाच
मालक : सौ. शुभांगी जोशी
३२९, वि. प. रोड, मुंबई ४
मुद्रण स्थळ :
विमा मुद्रक आणि प्रकाशक लि.,
सातारा, यांचा विमा छापखाना.

## अनुक्रमणिका







# संपादकीय :

*"नवी क्षितिजे"*चा १९७२ चा हा चौथा अंक, अंक उशिराने निघत आहे. विलंबासाठी वाचकांचे आम्ही दिलगीर आहोत.

*"नवी क्षितिजे"*ची साधारण प्रथा एकेका विषयावर काही लेखांची लेखमाला देणे ही आहे. हा अंक नेहमीच्या प्रथेला अपवाद आहे. यातील प्रत्येक लेख याच अंकात संपत आहे.

एकूण चार लेख या अंकात आले आहेत. पहिला लेख *जेम्स लेव्हर* या नाटयेतिहासकाराच्या लेखाचा अनुवाद आहे. अनुवाद विख्यात मराठी नाटय-समीक्षक *श्री. माधव मनोहर* यांनी केला आहे. नाटयाचा जन्म हा त्या लेखाचा विषय.

दुसरा लेख *श्रीमती दुर्गाबाई* भागवतांच्या सिद्धहस्त लेखणीतून उतरलेला असून त्याचा विषय त्यांच्या बालपणाच्या काळातील शालेय व इतर सांस्कृतिक जीवन हा आहे. जीवनावरील एक मनोज्ञ भाष्य म्हणूनही आपणास तो आवडावा.

तिसरा लेख *क्रांतिवीरांचा आत्मयज्ञ* ह्या नामांकित पुस्तकाचे लेखक *श्री. वि. श्री. तथा राजाभाऊ जोशी* यांनी डेव्हिड *गार्नेट* या ब्रिटिश लेखकाच्या आत्मचरित्रातील एका प्रकरणावरून तयार केला आहे. क्रांतिवीर सावरकरांविषयी आमच्या लोकांनी लिहिलेले अनेक प्रकारचे लेखन आपल्या नजरेखालून गेले असेल. पण एका इंग्रज तरुणाला तरुण सावरकर कसे दिसले याचे हे पहिलेच वर्णन आपणास लक्षणीय वाटेल.

चौथा लेख मानवातील हिंसक प्रवृत्ती व त्या अनुषंगाने हिटलरचे व्यक्तिमत्व यांचे विश्लेषण करणारा आहे. हे संकलन *श्री. नाना जोशी* यांनी केले आहे. हा लेख त्यांनी *एरिक फ्रॉम* यांच्या ग्रंथांच्या आधारे तयार केला आहे. एरिक फ्रॉम हे फ्रॉइडचे अनुयायी पण पोथीनिष्ठ नव्हत. फ्रॉईडच्याच उपपत्ती पण नवीन मानसिक ज्ञानाच्या प्रकाशात बदलून त्यानी त्या वापरल्या आहेत.

फ्रॉईड मूलभूत प्रेरणांचे द्वैत मानतो यातील एक प्रेरणा कामवृत्तीची व दुसरी मृत्यूवृत्तीची. कामवृत्तीची प्रेरणा जीवन अधिकाधिक प्रमाणात संगठित करू पाहते. मृत्यूवृत्तीची प्रेरणा ही जडत्वाकडील ओढ असल्याने ती जीवनाचे विघटन, विनाश करू पाहते. प्रत्येक सचेतन जीववस्तूचे आयुष्य या दोन वृत्तींच्या ओढाओढीत जात असते. या दोन वृत्तीतील संग्राम म्हणजे जीवन. जेव्हा कामवृत्ती नामोहरम बनून मृत्यूवृत्ती प्रबल होते तेव्हा जीवन संपुष्टात येते असे फ्रॉईड सांगतो.

एरिक फ्रॉम ह्यानी फ्रॉईडच्या या उपपत्तीत काही बदल केले आहेत. ते

म्हणतात कीं प्ररणांचे द्वैत मानण्याऐंवजी एकच मूलभूत प्रेरणा मनुष्याच्या शरीरात कार्य करीत असते व परिस्थितीनुसार तिला सुंगठन आणि विघटन हे दोन फाटे फुटतात, असे मानता येण्यासारखा पुरावा आता मानसशास्त्रापाशी गोळा झाला आहे. फ्रॉम यांच्या म्हणण्याप्रमाणे मानवाची मूलभूत प्रेरणा स्वतःतीत होण्याची, कार्यप्रवणतेची आहे. मनुष्यामध्ये त्याच्या मानवपूर्व पूर्वजांच्या पशुत्वाचा अंश अवशेषरूपाने राहिलेला असला तरी मनुष्य पशू नव्हे. मनुष्य हा महामानव आणि पशू यांच्या मधली स्थिती आहे. पशूला मनुष्याइतकी जाणिवशक्ती नसते. त्याला भविष्याची तिसरी मिती वापरता येत नाही. मनुष्याला जाणीवशक्ती, कल्पनाशक्ती व इच्छाशक्ती आहे. त्याला भूत आणि वर्तमानाचे अवधान राखून भविष्याविषयी योजना व संकल्प करता येतात. त्याचमुळे शरीराने आणि शरीराने नाही जमले तर मनाने मनुष्य सतत त्याच्या प्राप्त स्थितीच्या पलीकडे जाऊ पाहत असतो. मनुष्य हा अशा प्रकारे स्वतःतीत होत राहणारा प्राणी आहे. या स्वतःतीतपणातच सुंगठन आणि विघटन मोडते. जेव्हा सुंगठनाच्या त्याच्या कार्यात व्यत्यय येतो तेव्हा तो विघटनाकडे वळतो. सुंगठनाच्या कार्यात व्यत्यय बाहेरील परिस्थितीतून येतो, तसेच बालपणात घेतल्या गेलेल्या अनुभवातून मनुष्याने आयुष्याचा म्हणून जो काही नमुना उचललेला असतो त्यामुळेही येतो. काही का असेना परंतु हा व्यत्यय आला तरी मनुष्य स्वतःतीत होण्याची वृत्ती टाकीत नाही. रचनात्मक मार्गाने नाहीं, तर विघातक व विध्वंसक मार्गांनी तो स्थितीतून गतीत जाऊच पाहतो. स्वतःतीतता ही त्याची मूलभूत गरज आहे.

या विवेचनावरून मग फ्रॉम यांनी मनुष्याच्या जीवनाच्या काही सर्व-सामान्य नमुन्यांची चर्चा केली आहे व त्या नमुन्यांना आपला प्रबंध लावून दाखविला आहे. ते म्हणतात की काही माणसे स्वःच्याच प्रतिमेच्या प्रेमात अडकून राहतात व तेथून बाहेर पडू न शकल्याने आत्मिक विकासाच्या दृष्टीने मृत्यू पावतात मृत्यू हा शब्द फ्रॉम ह्यानी मानसिक भावनिक किंवा व्यक्तित्वाचा आंतरिस्क विकास यांचा मृत्यू अशा लाक्षणिक अर्थाने वापरला आहे. मृत्यू म्हणजे केवळ शारिरीक नाश नव्हे आत्मिक नाश हा त्यापेक्षाही भयंकर असतो. याच्या उलट जे लोक आत्मप्रीतीच्या घट्ट बंधनातून बाहेर येतात, स्वःच्या मानसिक व्यापारांविषयी अलिप्त भूमिका स्वीकारावयास शिकतात ते मानसिकदृष्ट्या प्रगल्भ बनतात असे फ्रॉम म्हणतात. आत्मिक नाशाचा दुसरा प्रकार हा आत्मप्रतिमेऐवजी मातृप्रतिमेत अडकून पडण्याचा प्रकार. काहीजण आत्मप्रतिमेऐवजी मातृप्रतिमेच्या प्रेमबंधनात अडकतात व स्वतःच्या विकासाची संधी गमावून बसतात मनाचा अलिप्तपणा आल्यावाचून, स्वःकडे, स्वतःच्या कृतीकडे व एकूण वर्तनाकडे त्रयस्थाच्या दृष्टीने

पाहाण्यास शिकल्यावाचून विकास शक्य नसतो. मातृप्रतिमेत अडकून पडलेले लोक नेमके हेच शिकत नाहीत व शेवटी स्वतःचे आणि प्रसंगानुसार इतर लोकांचे सर्व प्रकारचे नुकसान करून बसतात. मातृप्रतिमा हाही शब्द या ठिकाणी व्यापक अर्थाने वापरलेला आहे. मातृ म्हणजे माता व ज्यांच्यासाठी माता हे प्रतीक बनते त्या सर्व संस्था. उदा, राष्ट्र. वर्ग, जात, पंथ, राजकीय पक्ष. माणसे यापैकी एक ना एक प्रतिमेत आपल्या भावना अडकवून बसतात व शेवटी स्वतःचा विकास गमावून बसतात. एवढेच नव्हे तर विशिष्ट भावनेच्या तालात बुद्धीला व माणुसकीलाही न पटणारी कृत्ये करून मोकळी होतात. ही आणि इतर अनेक प्रकारची मानसशास्त्रीय माहिती 'मानवाचे हृदय' या लेखात आली आहे हा लेख संपल्यानंतर हिटलरच्या व्यक्तिमत्वाचे आजवर अज्ञात असणारे विशेष सांगणारा लेख आहे. या लेखात चिकित्सा व निष्कर्ष दिलेले नाहीत. फक्त तपशीलवार माहिती त्यात दिलेली आहे. हिटलरविषयक स्वतःची मते मागील मानसशास्त्रीय चर्चेच्या साह्याने त्याने बनवायची आहेत. —संपादक

---

## लग्नगाठ :

लग्नगाठ बांधणे हा वाक्प्रयोग वधूवरांच्या बाह्यवस्त्रांच्या पदराची गाठ पुरोहित अगर नवऱ्यामुलाकडची करवली अगर वडीलधारी सवाष्ण बांधते त्याला उद्देशून पडला आहे. To tie the nupital knol हा वाक्प्रयोग इंग्रजीतही आहे. याचे मूळ बॅबिलोनी संस्कृतीत आढळते. पुरोहित वधूवरांच्या बाह्यवस्त्रातले दोनदोन धागे काढून त्यांची गाठ मारीत असे. वधूवरांच्या मीलनाचे ते प्रतीक होते (Carolyin G. Bradley, A History of World Costumes, London, MCMV, P. 32.)

• • •

इजिप्त ऊर्फ मिसर देशाची राणी क्लिओपात्रा हिने रब्बी मेइर या धर्मोपदेशकाला एक प्रश्न विचारला. ती म्हणाली "मृत फिरून जिवंत होणार, हे आपण धरूनच चालतो; कारण शास्त्रात लिहिलं आहे की 'जमिनीवरच्या गवता प्रमाणे (मृत) नगरीतले लोक वाढणार आहेत.' पण जेव्हा ते उठतील, ते नागवे उठतील की कपडे घातलेले ? " रब्बीने उत्तर केले 'या प्रश्नाचं उत्तर आपल्याला गव्हाच्या दाण्यावरूनच मिळेल. गव्हाचा दाणा जमिनीत पेरताना नागडा पेरला, तर तो पिकाच्या रूपाने हाती येतो तेव्हा पुष्कळ वस्त्रांचे पापुद्रे अंगावर घेऊनच येतो. तर मग जे पुण्यवान लोक वस्त्रानिशी जमिनीत पुरले आहेत, ते वस्त्रे घालूनच वर येतील हे का सांगायला हवं " ?

(Rabbi Ashar Feldman, Parables and Similes of the Rabbis, Cambridge, 1924, P. 54.)

# कै. प्रा. श्री. प. सोहोनी

"नवी क्षितिजे" चे एक लेखक, नासिकच्या हंसराज प्रागजी ठाकरसी या महाविद्यालयाचे प्राचार्य श्री. प. सोहोनी हे ता. १५ डिसेंबर १९७२ रोजी अल्पशा आजाराने निधन पावले. प्रा. सोहोनी यांच्या निधनाने केवळ शिक्षणक्षेत्राचीच नव्हे, तर मराठीतील वैचारिक साहित्याचीही फार मोठी हानी झाली आहे.

प्रा. सोहोनी हे मूळचे रत्नागिरी जिल्ह्यातील. हं. प्रा. ठा. महविद्यालयातून बी. ए. ची परीक्षा पास झाल्यानंतर त्यांनी पुण्याच्या गोखले स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स अँड पॉलिटिक्स या सुप्रसिद्ध संस्थेतून प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ कै. डॉ. धनंजयराव गाडगीळ यांच्या मार्गदर्शनाखाली राज्यशास्त्र हा विषय घेऊन एम्. ए. ची पदवी संपादन केली. पहिली काही वर्षे कै. डॉ. गाडगीळ यांच्या हाताखाली काम केल्यानंतर १९४४ साली ते राज्यशास्त्राचे प्राध्यापक म्हणून हं. प्रा ठा कॉलेजात दाखल झाले व थोड्याच दिवसात ज्या गोखले एज्युकेशन सोसायटीतर्फे हे कॉलेज चालविले जाते त्या संस्थेने त्यांना आजीव सदस्य करून घेतले.

तेव्हापासून गेली अठ्ठावीस वर्षे त्यांनी या संस्थेच्या कामाला सर्वस्वी वाहून घेतले होते. राज्यशास्त्राचे प्राध्यापक व त्या विभागाचे प्रमुख या नात्याने अत्यंत यशस्वी व विद्यार्थीप्रिय प्राध्यापक म्हणून त्यांनी जसा लौकिक संपादन केला, त्याप्रमाणेच संस्थेचे चिटणीस म्हणून त्यांनी शैक्षणिक क्षेत्राचा व्याप खूपच वाढविला.

विविध प्रवृत्तीच्या विद्यार्थ्यांतील चांगुलपणा हेरून त्यांना प्रोत्साहित करण्याच्या कामी प्रा. सोहोनी यांनी फार मोठे कार्य केले आहे. कोठल्याही क्षेत्रातील गरजू विद्यार्थ्याला प्रा. सोहोनी यांचेकडे मुक्तद्वार असले तरी विद्यार्थ्यांच्या गैर वर्तनाबद्दल किंवा अव्यवहार्य मागण्याबद्दल ते त्यांची कान उघाडणी केल्याशिवाय राहात नसत. नव्या पिढीला समजून घेण्याची उदारता प्रा. सोहोनी त्यांच्याजवळ होती. दोन पिढ्यांना सांधु शकणाऱ्या दुव्यासारखे त्यांचे व्यक्तिमत्व होते. त्यामुळेच इतर शैक्षणिक संस्थात उद्‌भवतात तशा प्रकारचे संघर्ष त्यांच्या कारकीर्दीत कधीही घडून आले नाहीत. तरुणवर्ग हे त्यांचे आशास्थान होते. म्हणून युवकांच्या अनेक चळवळीत ते सहभागी होत व युवकांना विधायक कार्याची प्रेरणा देत.

प्रा. सोहोनी यांचे कार्य केवळ गोखले एज्युकेशन सोसायटी पुरते मर्यादित नव्हते. नासिकमधील अनेक सांस्कृतिक, सामाजिक व शैक्षणिक कार्याशी ते निगडीत होते. सार्वजनिक वाचनालय, लोकहितवादी मंडळ, रोटरी क्लब व नासिकमधील अनेक शिक्षण संस्थांचे केवळ सल्लागारच नव्हे, तर ते आधारस्तंभ होते.

प्रा सोहोनी यांचा नासिक येथील विश्वकोशाशी घनिष्ट संबंध होता व त्यासाठी त्यांनी काही लिखाणही केलेले आहे. त्याशिवाय लोकशाही विकेंद्रीकरण, मानवी हक्क, समाजवाद, आंतरराष्ट्रीय संबंध, इ. अनेक ग्रंथ त्यांनी लिहिले असून ते मान्यता पावले आहेत. आणखीही काही ग्रंथांचे त्यांचे लेखन चालू होते; परंतु त्यांच्या मृत्यूमुळे ते आता कायमचेच अपुरे राहणार आहे.

प्रा. सोहोनी यांच्या निधनामुळे झालेल्या दुःखात "नवी क्षितिजे" सहभागी आहे.

—संपादक

अनुक्रमणिका

# आभार

पहिले आभार अर्थातच विमा मुद्रक व प्रकाशकाचे सौजन्यशील व्यवस्थापक श्री. स. कृ. जोशी आणि नागरिक प्रेसचे व्यवस्थापक श्री. ना. दा. चावरे यांचे आहेत प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे श्री. स. कृ. जोशींना गतवर्षी "नवी क्षितिजे"कडे नेहमीमारखे लक्ष देता आले नाही. पण त्याची उणीव नागरिक प्रेसकार श्री. ना. दा चावरे ह्यांनी भरून काढली. "नवी क्षितिजे"च्या पहिल्या दोन अंकांची प्रत्येकी ८० पृष्ठे व शेवटचा संपूर्ण अंकच त्यांच्या छापखान्यात छापून तयार झाला आहे. श्री. ना. दा. चावरे आयत्या वेळी "नवी क्षितिजे"च्या साह्यास येते ना, तर अंक प्रसिद्ध व्हावयास आणखी किती विलंब लागता ते सांगता येत नाही. विमा छापखाना व नागरिक छापखाना यातील इतर मित्र व कामगारबंधू यांचेही आम्ही अत्यंत आभारी आहोत. अंक बाहेर निघण्यास त्यांचेही मोलाचे सहकार्य झाले आहे.

"नवी क्षितिजेच्या" मुद्रितशोधनाचे काम नेहमीप्रमाणे श्रीमती विमलाबाई गुर्जर यानीच केले आहे. सध्या त्या कायम वास्तवासाठी सातारा सोडून मुंबईत राहिल्या आहेत. तरिही इतक्या दुरून "नवी क्षितिजेवरील" लोभातून त्यांनी हे काम केले म्हणून आम्ही त्यांचे अत्यंत ऋणी आहोत.

पामार्टचे श्री भाऊसाहेब परचुरे व वापूसाहेब मायदेव यांनी "नवीक्षितिजे"चे मुखपृष्ठ व आतील मजकुराच्या मांडणीबद्दल साहाय्य केले.

श्री. फँक व सौ. एलनॉर केलमन आणि झुरिक येथील डॉ. मेर्टन यानी 'नवी क्षितिजे'ला अनेक ग्रंथ व नियतकालिके भेट म्हणून पाठविली.

श्रीमती दुर्गाबाई भागवत, श्रीमती कुसुम वझे, श्री. स. पु. लिमये यांनी वेळात वेळ काढून "नवी क्षितिजे"साठी लिहिले. श्री. स. हृ. मोडक यांनी अन्य अनेक प्रकारची मदत दिली.

"नवी क्षितिजे"चा योगक्षेम ठाकठीक चालावा म्हणून ज्या काही कळकळीच्या व्यक्तींचे साह्य आम्हास झाले त्यात श्री. शि. श्री. तथा दादासाहेब वझे आणि नरेंद्र आशर या दोघांची नावे आवर्जून घ्यावी लागतील. आम्ही त्यांचे व इतरांचे फारफार आभारी आहोत. इतरही अनेक मित्रांनी अर्थसाहाय्य केले. अशी नियतकालिके असल्या निरपेक्ष व उदार मदतीवाचून चालू शकत नाहीत. आम्ही त्या सर्वांचे त्यांनी दाखविलेल्या जिव्हाळ्यासाठी ऋणी आहोत.

या वर्षीची मनाला अतिशय खंत निर्माण करणारी दुर्घटना म्हणजे हंसराज प्रागजी ठाकरसी महाविद्यालयाचे विद्यार्थीप्रिय प्राचार्य श्री. श्री. प. सोहोनी यांचे अकाली निधन. प्राचार्य सोहोनींच्या निधनामुळे त्यांच्या कुटुंबियांची तर कधीही न भरून येऊ शकणारी हानी झाली आहेच, पण "नवी क्षितिजे"चा वाचक-संपादकवर्गही एका चांगल्या स्नेह्यास व साक्षेपी लेखकास मुकला आहे. आम्ही त्यांच्या कुटुंबियांच्या दुःखात सहभागी आहोत.

—संपादक

अनुक्रमणिका

# समाज आणि संस्कृती

## नाटयोपपत्तीच्या संबंधातील एक संकल्पना :

● लेखक : जेम्स लेव्हर

अनुवाद : माधव मनोहर

जेव्हा आपण थिएटर किंवा नाटचगृह हा शब्द वापरतो, तेव्हा एका विशेष प्रकारच्या रंजनाचे संकल्पन एक तर आपल्या मनात असते किंवा शासनाने एक विशेष परवाना दिलेली अशी एक विशेष वास्तू आपल्या डोळयांसमोर येते की ज्या वास्तूत उपर्युक्त रंजनविशेषाचा आस्वाद घेता येतो. अशा वेळी आपल्या मनात उद्देश असतो तो हा की काही थोडा वेळ मजेत घालवावा, एखाद्या करमणुकीत मन रमवावे; शक्य असेल, तर मनाला गुदगुल्या करण्याची गंमत अनुभवावी, रोजच्या उद्योगधंद्यातल्या वैतागापासून काही काळ मुक्तता शोधावी किंवा करुणाभयाच्या भावनांनी मन शुद्ध करण्याची एक साधारणमानाने असंभव अशी पर्वणी साधावी. आज नाटचगृहात जेव्हा आपण प्रवेश करतो, तेव्हा आपला मनोगत हेतू इतक्यापुरताच मर्यादित असतो. यापेक्षा कोणतीही अधिक अपेक्षा आपल्या मनात नसते. देवाची पूजा करण्यासाठी, म्हणजेच होमहवनासाठी आपल्या शत्रूंचा बंदोवस्त, नायनाट करण्यासाठी, आपल्या आवारशिवारातल्या भाजीपाल्याची वाढ अखंडित व्हावी म्हणून, किंवा आपल्या वायकांची गर्भधारणा सुखेनैव व्हावी म्हणून किंवा असलाच कसलाच तरी एखादा उद्देश मनात वागवून आज आपण नाटक बघायला थिएटरमध्ये जात नाही. समजा, उपर्युक्त उद्देशांपैकी एकही उद्देश नुकत्याच पाहिलेल्या नाटकाच्या परिणामी सफल झाला नाही म्हणून एखाद्या प्रेक्षकाने नाटकवाल्याकडून तिकिटासाठी मोजलेले पैसे परत मागितले, तर आज अशा माणसाची गणना वेडचातच होईल नव्हे काय ?

— आणि एवढेच केवळ नव्हे, तर उपर्युक्त उद्देशांच्या सफलतेसाठी म्हणून एका काळी रंगभूमी राबवली जात होती, असा युक्तिवाद आज कोणी केला तर अविश्वासनीय अशा आश्चर्यानेच लोक कदाचित तो ऐकून घेतील. हे सर्व खरे असले, तरी हेही तितकेच खरे आहे की हा युक्तिवाद नव्हे; तर हा इतिहास आहे. ही तर गोष्ट खरीच की सर्वच कलांचा उगम जादूत आहे आणि रंगभूमी हीच



अनुक्रमणिका



सर्व कलांची जन्मदात्री आहे. येथे जादू हा शब्द नेहमीच्या रूढ अर्थाने योजिलेला नाही, तर एका विशेष अर्थाने योजिलेला आहे. जादू म्हणजे इच्छाशक्तीच्या बळावर जे इच्छित ते प्रत्यक्षात घडवून आणण्याचा यत्न. संकल्पनालाच वस्तुरूप देण्याचा यत्न.

अलीकडच्या काळात जादू या शब्दाला देखील एक नवे महत्त्व प्राप्त झाले आहे. आजचे बहुतेक मानवेतिहासशास्त्रज्ञ सर जेम्स फ्रेझरचे देणे काहीही लागत असोत, पण त्यांच्यापैकी कोणीही आज जादू म्हणजे फक्त 'चुकलेले शास्त्र' या त्याच्या निश्चित मताचा पुनरुच्चार करीत नाही आणि फ्रेझरच्या संबंधातील वस्तुस्थिती काय ती अवश्य माहीत करून घ्यावयास हवी. मनोविश्लेशणगत संशोधनाच्या परिणामी आदिमानवाच्या विचारसरणीच्या संबंधातील पूर्वापारपासून चालत आलेल्या सर्व कल्पनात आज बदल घडून आला आहे आणि या बदलाच्या पूर्वकाळातील फ्रेझरचे सर्व संशोधन आहे. एकोणिसाव्या शतकातील बुद्धिवादावरचा जोर आज सर्वस्वी ओसरला आहे. या घटनेचे कारण निःसंशय हेच असणार की ज्याचा शोध घ्यावयाचा, त्या शोधाचीच सर्व साधने नष्ट करण्यासाठी बुद्धिवाद अखंड झटत होता.

युंगच्या परिभाषेत बोलावयाचे, तर 'गोळीबंद बुद्धी'च्या जगात जादू काम करीत नाही. व्यक्तिगत मनाचे अलग वेगळेपण आज आपण गृहीत धरतो. पण व्यक्तिगत मनाच्या अलग वेगळेपणाचे भान हे खरे म्हणजे तुलनेने अर्वाचीन काळाचे देणे आहे. सामुदायिक नेणिवेची जाणीव या प्रश्नाकडे बघण्याचा एक नवा दृष्टिकोन आपणास प्राप्त करून देते.

अर्थातच सामुदायिक नेणिवेचे अस्तित्व मुळातच कोणी कदाचित नाकारील. कारण ते तसे सिद्ध करता येण्यासारखे नाही. पण जाणीवेची सामुदायिक नेणीव गृहीत धरली, तरच प्राण्यांच्या किंवा तत्सदृश आदिमानवाच्या जीवनातील कित्येक घटनांचा अन्वयार्थ लागू शकतो. मेटरलिन्क म्हणतो त्याप्रमाणे मधमाशांचे सर्व वर्तन 'मोहोळ-तत्त्वा'च्या जाणीवेतून निष्पन्न होत असते आणि हे लक्षात घ्या की मेटरलिन्क हा काही शास्त्रज्ञ नव्हे; तर तो कवी आहे. कवीच्या स्वाभाविक अन्तःप्रेरणेने भारलेला. स्थलांतर करणाऱ्या पक्ष्यांचे वर्तन अशा भावनेने भारलेले असते की जणू काही त्या सर्व असंख्य पक्ष्यांची मिळून एक प्रेरणा आहे, एक धारणा आहे; एक दिशादर्शक मन आहे. असे म्हटले जाते की काही जंगली जमातीतील माणसे सचेत बुद्धीच्या अतीत अशा एका पातळीवर परस्परांशी संवाद साधू शकतात आणि अशा या विशेष पातळीवर स्वतःचे विचार आणि स्वतःच्या भावना यांचे संस्कार अन्य कोणावर उमटविणे शक्यतेच्या कोटीतील आहे.



अनुक्रमणिका

स्वत. स्वत:तच क्रोधाची वा भयाची भावना अनुभवणे म्हणजेच निकटच्या माणसाला क्रोधाविष्ट वा भयग्रस्त करणे. आणि हे तर अगदी आजच्या माणसाच्या संबंधातही खरे आहे. एखादी प्रबळ भावना स्वत:च्या अन्तर्यामात निर्माण करून त्या भावनेचा अंमल निकटवर्तीयांवर आपण सहज गाजवू शकतो आणि आपण स्वत: जर भावनाधीन नसलो, तर त्या भावनेचा प्रभाव अधिकच परिणामकारक ठरतो. कारण आपली स्वत:ची इच्छाशक्ती या प्रक्रियेत अबाधित, सचेत राहिलेली असते. सर्व जादूचे अर्करूप रहस्य हेच आहे. आणि तेच अभिनयाचेही. जादू एखाद्या प्रक्षेपक शस्त्रासारखी आहे. संभव आहे की माणूस दगड फेकायला मागाहून शिकला. तत्पूर्वीही जादूचा प्रक्षेपक उपयोग त्याला कळला असावा. कदाचित जादू हेच मानवप्राण्याचे पहिले प्रक्षेपक शस्त्र असावे.

दूरच्या अंतरावरून माणसाच्या मनावर संस्कार घडविण्याच्या द्विविध रीती असू शकतात. पहिली म्हणजे अनुनयाची आणि दुसरी भयोत्सर्गाची. अनुनय आणि भय. नंतरच्या काळात याच भावनांना आशीर्वाद–शापांचे रूप प्राप्त होते. ही अवस्था बायबलमध्ये बालामच्या कथेत प्रकट होते. कॉर्नफोर्डने 'दि ओरिजिन ऑफ ॲटिक कॉमेडी'नामक ग्रंथात म्हटले आहे: 'ॲरिस्टॉटलने प्राथमिक काव्याचे दोन भाग केले आहेत. स्तुतिपर आणि निंदाव्यंजक. यासंबंधी प्रोफेसर मार्गोलिउथने म्हटले आहे की अरबी काव्याची मजल यापलिकडे केव्हाच गेली नाही. आणि मग तो म्हणतो,—जे काय म्हणतो, ते अर्थातच ॲरिस्टॉटलला अज्ञात होते;—की उभयविध काव्याचा जन्म आशीर्वाद–शापांच्या प्रक्षेपक शब्दोच्चारात आहे. म्हणजेच जादूत आहे.' आणि पुढे तो म्हणतो: 'स्तुतिनिंदा हे ओल्ड कॉमेडीचे जे अविभाज्य विशेष आहेत, ते लिंगयात्रांच्या जादूने भरलेल्या गैरवापरातून सरळ निष्पन्न झालेले आहेत.' पण येथवर आताच जाऊन पोचण्याची काहीएक आवश्यकता नव्हती. ही जरा घाईच झाली. तेव्हा आता फिरून मागे वळणे प्राप्त आहे.

स्वत:चे विचार आणि स्वत:च्या भावना स्वत:बाहेरच्या वस्तूंवर लादता येतात, ही प्राचीन काळातील जंगली कल्पना केवळ माणसांपुरतीच मर्यादित नाही. जादूचा प्रक्षेप अन्य प्राण्यांवर तर करता येतोच, पण ज्यांना आपण निश्चेतन वस्तू समजतो, त्यांच्यावरही जादूचा प्रक्षेप करता येतो. सचेत जीव म्हणजे काय याविषयी आज आपल्या ज्या कल्पना आहेत, त्यापेक्षा प्राचीन जंगली आदिवासींच्या कल्पना फार वेगळ्या होत्या. प्राचीन काळातील रानटी माणसाला, जे हलते ते सचेत, असेच वाटत असे. बायबलमध्ये 'लिव्हिंग वॉटर' ( म्हणजेच हलते पाणी ) असा जो वाक्प्रचार आहे, त्यात सांकेतिक कल्पनेचा

अवशेष आहे. ख्रिश्चन प्रार्थनाग्रंथातही हलते आणि मरते, म्हणजे सचेत आणि निष्प्राण असा भेद केलेला आढळतो. ज्या वस्तू अगदी निश्चल आहेत, अशा वस्तूतही अगोचर आत्म्यांचे अस्तित्व असू शकते.

अन्य वस्तूंवर स्वतःचा संस्कार उमटविणे म्हणजे त्या वस्तूशी सुसंवाद साधणे. म्हणजेच त्या जे काय करीत असतील, तेच आपण स्वतः बुद्धिपुरःसर करणे. म्हणजेच अनुकरण करणे. ही अनुकरणप्रवृत्ती आपल्या रक्तात सहजप्रेरणारूप पावलेली असते. अनुकरणप्रवृत्तीचे प्रत्यंतर हवे असेल, तर कोणत्याही बॉक्सिग बाउटच्या किंवा फूटबॉल मॅचच्या प्रेक्षकांकडे एकवार नजर टाका; म्हणजे झाले. मुष्टियुद्धाचे प्रेक्षक स्वतःच मुष्टियुद्ध करीत असतात. आणि फूटबॉलचे प्रेक्षक काल्पनिक फूटबॉलला लाथा हाणीत असतात. बॉक्सिगच्या चॅम्पिअनने प्रतिस्पर्ध्याला एक ठोसा हाणला की प्रेक्षकांमध्ये तसेच असंख्य नकली ठोसे लगावले जातात आणि फूटबॉलचे शौकीन प्रेक्षक फूटबॉलला गोलच्या दिशेने दवडवण्यात कायम मग्न असतात.

अनावर भावनेच्या मुक्ततेसाठी जो नकली आविर्भाव केला जातो, तो आजही थेट पहिल्यासारखाच अस्तित्वात आहे. पण बॉक्सिग चॅम्पियनचा किंवा होम टीमचा धुव्वा उडाला, तर आजच काही जगबूड होत नाही—जरी उत्साही प्रेक्षकांचे वर्तन तदनुसारी असले, तरी ! पण प्राचीन काळात मात्र असे नव्हते. रानरेडा ठार झाला नाही किंवा पाऊस कोसळला नाही, तर अशा वेळी जगबूड ठेवलेलीच ! !

ही जी अनुकरणनिष्पन्न जादू आहे, ती नेहमीच समुदायात अधिक प्रभावी ठरते. एकाकीपणातील जादू तशी कमजोरच. कारण उघड आहे. भावनेच्या दृष्टीने समुदायाची एकत्रित शक्ति ही त्याच समुदायातील घटकाच्या प्रत्येकी अलग अशा शक्तीपेक्षा कितीतरी अधिक असते. तमाम जमात एकाच एक अनुकृतिनिष्पन्न आविर्भावाचा आविष्कार एकसमयावच्छेद करते. हा आविर्भाव आणि त्याचा सामुदायिक आविष्कार नंतर काही एका तालाच्या ठेक्यात प्रकट होतो. म्हणजेच त्याचे पर्यवसान नृत्यात होते आणि या प्रक्रियेत जो परिणाम साधतो, तो दुप्पट असतो. हॅम्बेल 'ट्रायबल डान्सिग अॅन्ड सोशल डिव्हेलपमेन्ट'नामक आपल्या ग्रंथात म्हणतो : 'नृत्याच्या परिणामी अशी एक अवस्था प्राप्त होते की ज्या अवस्थेत एकता, एकमेळ आणि सामुदायिक सुसंवाद यांचे दर्शन पराकाष्ठेचे घडते. जीवनातील प्रत्येक निर्वाणीच्या प्रसंगी प्राचीन माणसास नृत्य केवळ अटळ वाटत असे.' आर. आर. मॅरेटचे मत तर असे आहे की प्राथमिक अवस्थेत धर्म म्हणजे मूलतः नृत्याविष्टच होता.



अनुक्रमणिका

धर्म म्हणजे देवांच्या संबंधातील श्रद्धांची एक पद्धती, अशी व्याख्या मान्य केली, तर असे आढळून येते की धर्मकल्पना जमातमनात जागृत होण्यापूर्वीच जमातीच्या जीवनात नृत्याचे स्थान अनन्यसाधारण महत्त्वाचे होते आणि ही जमातनृत्ये, ज्यांची शिकार करावयाची ते प्राणी समोर यावेत, पाऊस पडावा किंवा थांबावा आणि वायकांना मुले व्हावीत अशा अनेक आणि अनेकविध उद्देशांच्या परिपूर्तीसाठी नाचली जात असत. पण अनुकरण हे केवळ आविर्भाव किंवा शरीरावस्था यापुरतेच मर्यादित नसे. (ऑस्ट्रेलियातील आदिवासी उडी मारण्या-पूर्वीचा कांगारूचा आविर्भाव आणि त्याची झेप यांची नकल आजही सही सही नृत्यात उठवतात.) यावरून असे ध्यानात येते की इतिहासपूर्व काळातील आदि-मानव हा ज्या प्राण्यावर किंवा वस्तूवर काही एक अपेक्षित परिणाम घडविण्याचा यत्न करीत असेल, त्या प्राण्याशी वा वस्तूशी शक्य तितकी एकरूपता साधण्याच्या यत्नात मग्न असे.

सहानुभूतिजन्य जादूचे संपूर्ण अधिष्ठान म्हणजे हेच होय. ज्या वस्तू परस्परांचे अनुकरण करतात, त्या वस्तू परस्परांवर इष्ट तो परिणाम घडवून आणतात. किंबहुना त्या वस्तू एकरूप होतात. पाऊस पाडण्याची जादू करणाऱ्या जादूगाराच्या मडक्यातील पाणी हे केवळ पावसाचे प्रतीकरूप असते असे नव्हे; तर ते पाणी म्हणजेच पाऊस असतो. रानरेडा आघाताच्या टप्प्यात यावा म्हणून रानरेड्याच्या हालचालीचे अनुकरण जो माणूस करतो, तो स्वतः रानरेडाच असतो. आजच्या आपल्या नाटकाच्या परिभाषेत बोलावयाचे, तर हा माणूस कोणत्याही एका पात्राची भूमिका वठवावी म्हणून त्या पात्रातच कायाप्रवेश करीत असे. नटच पात्र होत असे. अभिनयांच्या संबंधातील इंग्रजी परिभाषा तर नट पात्राच्या त्वचेत प्रवेश करतो, अशीच आहे.

प्राचीन काळात हा त्वचाप्रवेश साक्षात वठवला जात असे. ज्या प्राण्याची शिकार केली त्या प्राण्याचे कातडे शिकारी सोलून काढीत असे आणि ते कातडेच स्वतः पांघरीत असे. किंवा त्या कातडीच्या वेशभूषेत तो स्वतःला नटवीत असे. मारलेल्या प्राण्याच्या मस्तकातही शिरायला त्याला आवडले असते. पण टॅक्सिडर्मीच्या—म्हणजेच कातडे कमावण्याच्या—कलेत आजच्या इतका तो निष्णात नव्हता. तेव्हा मारलेल्या प्राण्याच्या मस्तकात प्रवेश करणे त्याला शक्यच नव्हते. म्हणून लाकडाला किंवा वनस्पतीच्या सालीला मस्तकाचा आकार देण्यास तो शिकला आणि मग या मुखवटयात तो स्वतःचे मस्तक दडपून वसवू लागला. मुखवटयाची जन्मकथा ही अशी आहे.

मुखवटयाचा शोध : 'मास्कस् ऑफ दि वर्ल्ड' नामक आपल्या विचारप्रवर्तक

उद्बोधक ग्रंथात जोसेफ ग्रेगॉरने मुखवटयांविषयी बरेच काही लिहिले असले, तरी मुखवटयाचा संपूर्ण अन्वयार्थ आजही आपल्याला समजला आहे असे दिसत नाही प्रस्तुत संबंधात ग्रेगॉरने म्हटले आहे: 'या एका मुखवटयात मनुष्यजातीचे सर्व भयंकर अनुभव आणि संकल्पक विचार दडलेले आहेत. तुटून पडलेली मस्तके छिन्नविछिन्न केली जात असत, आणि मस्तकातील गर प्राशन केला जात असे. त्या काळात प्राण्यांचे प्रभुत्व वादातीत आणि म्हणून मुखवटयांचे अस्तित्व सर्वंकष होते. मुखवटयांचे जबडे ग्रास घेण्यासाठी वासलेले असत. सर्व दिशातून भयकंपित करणाऱ्या डोळयांच्या नजरा माणसाला विद्ध करीत असत. ज्या क्षणाला अन्य वस्तूंना अपेक्षित तो आकार देण्याची, कोरण्याची, रंगविण्याची इच्छा त्याच्या मनात उत्पन्न झाली, त्या क्षणापासून त्याने स्वतःला निश्चयपूर्वक मुक्त केले. आणि ज्या क्षणाला त्याने या कला आत्मसात केल्या, त्या क्षणाला नाटकाचा जन्म झाला. त्याच क्षणाला त्याने स्वतःच्या मनोगत संकल्पनावर स्वामित्व प्रस्थापित केले संकल्पनाचे स्वामित्व तो मान्य करीत होता, तोपर्यंत तो मुखवटयाचा गुलाम होता. नंतर मुखवटा म्हणजे एक क्रीडावस्तू झाली. माणसावरील मुखवटयाचे संस्कार त्याच्या सर्जनशक्तीच्या उत्कर्षाचे द्योतक आहेत. आपल्या जन्मकथेचे रहस्य या मुखवटयाला ज्ञात आहे. या मुखवटयाच्या किल्लीने आपल्या मृतकाळातील रहस्यमय अशा इतिहासाचे दरवाजे आपल्याला सहज लीलेने खोलता येतील.

ज्या प्राण्याची शिकार करावयाची, त्या प्राण्याला स्वतःच्या दृष्टिपथात आणण्यास आणि पर्यायाने स्वतःच्याच हत्येस प्रवृत्त करावे, या हेतूने माणूस त्या प्राण्याचे कातडे स्वतःच्या अंगाभोवती लपेटू लागला. शिकारीचे लक्ष्य असलेला प्राणी आणि शिकारी यांच्यातील विलक्षण परस्परसंबंधाचे भान त्या काळातील मानवाला सहज प्राप्त होते. मध्यंतरीच्या काळात हे भान व तत्संबद्ध ज्ञान सर्वथा लुप्त झालेले होते. आणि अगदी अलीकडच्या काळात फ्रॉइडने पुन्हा एकदा त्या भानाचे ज्ञान—किंवा ज्ञानाचे भान—माणसाला प्राप्त करून दिले आहे. ज्या प्राण्याला ठार मारावयाचे, त्या प्राण्याशी स्वतःची एकरूपता इतकी साधावयाची की तो प्राणी म्हणजे आपणच,—हे भान मोठे विलक्षण आहे. म्हणजे तो प्राणी हा त्याचा बळीही आहेत आणि त्याचा सर्वोत्तम मित्र पण. आणि म्हणून शिकार संपल्यानंतरचा आनंदोन्माद हा नेहमीच अपराधभावनेचा सहचर असतो.*
अशा रीतीने मनधरणीचा एक घटक आणि पश्चात्तापाचा एक घटक असे दोन

* उदाहरणार्थ पाहा : हेमिंग्वचे 'ओल्ड मॅन ॲन्ड दि सी' —अनुवादक.



अनुक्रमणिका



घटक या प्राचीन जादूच्या नाटकात अंगभूत असतात. येथे नाटक हा शब्द मुद्दामच योजिला. कारण नाटक म्हणजे तरी काय ? ज्या क्षणाला माणूस अन्य कोणाचा तरी वेश परिधान करतो आणि जे स्वत:चे नव्हे, असे व्यक्तित्व आपलेच आहे, असे समजतो, त्याच क्षणाला नाटकाचा जन्म होतो.

मनधरणी आणि प्रायश्चित्त या भावनांचा संबंध पूर्वजांशींही पोचतो. आणि म्हणून प्राचीन काळात ही भावनाही नृत्यान्वित होत असे. पिशाच्चनृत्याचा अन्वयार्थ प्रस्तुतच्या धावत्या समालोचनाच्या कक्षेतील नव्हे. तेव्हा येथे एवढे म्हटले म्हणजे पुरे की अन्य कोणाचे तरी व्यक्तित्व स्वत:चेच समजणे हे नाट्यविषयक प्रगतिपथावरील पुढचे पाऊल होय. तदनंतर गोष्टीचा प्रादुर्भाव होतो. तत्पूर्वी फक्त अनुकरणनिष्पन्न असा आविर्भाव काय तो होता. तर आता मंत्रविधीतून कथा निष्पन्न झाली. नंतरच्या काळातील ग्रीक थिएटरमध्ये व्यक्त होणारे या घटकाचे महत्त्व लक्षणीय आहे. पण हा कथाभाग फार नंतरचा आहे. प्रवास इतका जलद करून भागण्यासारखे नाही.

पण या प्रवासातील जो एक पल्ला आपण गाठला आहे, तोही काही कमी महत्त्वाचा नव्हे. पशूतून उत्क्रांन्त अशा प्राथमिक मानवाच्या इतिहासावस्थेतच काही एक नाट्यान्वित विधी आकारास आला आणि नाट्यगत वेशान्तराची पहिली चाहूलही आपल्याला समजली. लॉर्ड रॅग्लानने 'दि हीरो' नामक आपल्या सुप्रसिद्ध ग्रंथात म्हटले आहे की, 'जगात सर्वत्र कोठेही, कोणत्याही समारंभासाठी अनुरूप असा वेश परिधान करणे आवश्यक असते आणि समारंभोचित वेशाशिवाय समारंभात कोठेही प्रवेश मिळत नाही, असे म्हटले तर त्यात अतिशयोक्तीचा अंशमात्रही नाही'. –स्थानबद्ध अशा नाट्यगृहापेक्षा समारंभोचित वेशविशेष निश्चितच पुराणा आहे.

माणसे केवळ शिकारीवर उपजीविका करीत, ही इतिहासावस्था संपुष्टात आली आणि पूर्वकाळात शिकार करणारी माणसे नंतरच्या काळात धनगर-गुराखी बनली; तेव्हा अर्थातच पूर्वकाळात जो एक अमर्याद नाट्योत्साह होता, तोही काहीं अल्प काळ लुप्तप्राय झाला. कारण धनगर-गुराखी नेहमीच एकाकी असतात. गुराखी आणि धनगर म्हणजे जगातील पहिले ज्योतिषी. कारण रात्रीच्या आभाळाचे भान त्यांनाच प्रथम झाले. पृथ्वीतळावरचे देव सोडून आकाशस्थ देवांकडे त्यांनीच प्रथम धाव घेतली. जगातीतलावरील तेच पहिले गूढवादी द्रष्टे आणि कदाचित पहिलेच कवीही. पण ते काही कोणी नट वा नाटककार नव्हेत. स्थगित नाट्याला गतिमान करण्यासाठी धनगर वा गुराखी यांचा काही एक उपयोग नव्हता. जेव्हा तेच गुराखी व धनगर, शेतकरी झाले, तेव्हाच स्थगित नाटकाचा प्रवास पुन्हा एकदा प्रगतीच्या दिशेने चालू झाला.



अनुक्रमणिका

प्रगतीची ही दिशा अर्थातच पूर्वनिश्चित नव्हती. पण जगातील पहिल्या शेतकऱ्यांनी नाटकाला जे वळण लावले, ते आजतागायत तसेच अबाधित आहे त्या काळातील नाटक म्हणजे एक जादूचाच प्रकार होता. नाटकाचा उद्देश म्हणजे अर्थातच सर्व जमातीसाठी अन्न उपलब्ध करून देण्याचा. पूर्वकाळात हाच उद्देश प्राण्याना दृष्टिपथात आणण्यास व त्यांना आत्महत्येस उद्युक्त करण्यात सफल होत असे. तर नंतरच्या अवस्थेत धान्याची वाढ हेच एकमेव उद्दिष्ट बनले. अनुकरणात्मक वशीकरण हेच अद्यापपर्यंत नाटकाचे माध्यम होते. धान्याचे रोप उंच वाढावे म्हणून माणसे हवेत उंच उड्या मारीत आणि तेव्हा समजूत अशी होती की शेतात स्त्रीपुरुष संभोग घडला, तर धान्याचे बी गर्भधारणेसाठी उपकारक ठरेल. शेतात रक्त सांडणे आणि पावसाच्या पाण्याप्रमाणे रक्ताने जमीन भिजविणे यातही हेतू तोच होता. कारण त्या लोकांच्या लेखी रक्त हेच जीवन होते. येथे प्रस्तुत संदर्भातील आणखी एका महत्त्वाच्या घटनेची–अणि घटकाची पण–नोंद घ्यावयास हवी. अखिल जमातीची प्रजोत्पादनक्षमता आणि उत्कर्षावस्था तदनंतर एकाच पवित्र माणसाच्या ठायी केंद्रीत झाली.

येथेच दैवी राजाचा वादग्रस्त प्रश्न अपरिहार्य ठरतो. पण या प्रश्नाचा शोध घेण्याचे सोंग करण्यात प्रस्तुत लेखकाला रस नाही. कारण प्रस्तुत लेखनाचे उद्दिष्ट म्हणजे काही दैवी राजाचे प्रतिष्ठापन नव्हे पण पृथ्वीतलावरील सर्व प्राचीन शेतकरी जमातीत हा दैवी राजा अवतीर्ण झाला आणि आपल्या जमातीतील सर्व घटकांच्या इच्छाकांक्षांचा तो एकमेव प्रतिनिधी बनला, याविषयी मात्र काही एक शंका नाही. अखिल जमातीच्या प्रजोत्पादनाशी तर त्याचा अति निकटचा संबंध होता. अखिल जमातीचे लिंगप्रतीक म्हणजेच हा दैवी राजा आणि त्याच्या या कर्तव्याचे आणि कर्तृत्वाचे अवशेप अगदी आजच्या राज्यारोहण समारंभातही प्रतीकरूपाने दृष्टोत्पत्तीस येतात येतात. प्राचीन काळात अशी एक समजूत दृढ होती की जोपर्यंत राजा सुखरूप आहे, तोपर्यंत शेतातील पीकही सुखरूप आहे. म्हणून राजाचे आरोग्य सर्वाधिक महत्त्वाचे. वार्धक्याच्या परिणामी तो निःशक्त झाला की त्याला ठार मारणे प्राप्तच होते. प्राथमिक काळात तर असे दिसते की राजा बहुतकरून दर वर्षीच ठार मारला जात असे. तदनंतर अर्थातच विधीपूर्वक नव्या राजाची प्रतिष्ठापना केली जात असे. अर्थातच या अशा वेळी जे विधी आणि समारंभ आयोजित केले जात असत, त्यातून निष्पन्न होणारे नाटक विलक्षण भव्य आणि परिणामकारक असले पाहिजे. धर्माचा इतिहास आणि नाटकाचा इतिहास या उभयविध इतिहासांशी या विधिनाटयाचा संबंध अतिशय निकटचा आहे.

ी झोडपणी होत असेल, ते खळे म्हणजेच बहुतकरून
ान असावे. नाटचस्थान मुद्दामच म्हटले. कारण नाटचगृह
ातही दृष्टिपथात येत नाही. खळे हीच रंगभूमी असेल,
व्हा राजाला तेथच भूमिगत करणे यथोचित नव्हे काय ?
हंगामातच राजहत्या अपरिहार्य असावी. अर्थातच
धिकार अप्रतिहत होताच. खळ्यांचा आकार गोल असतो.
राजाची समाधी असणार. म्हणजे इतिहासास ज्ञात
थीएटरचा हा मूलभूत आराखडाच होय. या विधानासाठी
: उपलब्ध नसेलही. पण तदनंतरच्या घटना उपर्युक्त
तील अशाच आहेत. कारण प्रस्तुत संबंधात रॅग्लान
धिनाटचाचे नेपथ्य म्हणजे बहुतकरून कोणत्या तरी
ार्ग असतो. या नेपथ्यविशेषाचे कारण असे दिसते कीं
ात राजवाड्यात किंवा समाधिमंदिरात केले जात असे
जाची समाधी बहुतकरून एकच असे. नंतरच्या काळात
ध संप्रदाय निर्माण झाले. कालांतराने राजाची आणि
ा झाली. राजपद लौकिक पातळीवर उतरले आणि मग
यसंस्थेचा विकास होत गेला. ही देवालये म्हणजे
म्हणून योजिलेल्या राजगृहांच्या आणि समाधींच्या
राजगृहे किंवा राजांच्या समाधी म्हणजे पूर्वकाळातील
होय. हे तर आपण पाहिलेच. गर्भगृह गर्भगृहाच्या
ी बंदिस्त.–बंदिस्त अशासाठी की अनधिकारीं प्रेक्षकांना
तू म्हणजे नंतरच्या काळातील देवालयाची, सिनेगॉव्ची,
ष्ठांच्या प्रार्थनालयांची आणि नाटचगृहांचीहि वास्तू
ंटिक (म्हणजेच प्राचीन ग्रीक) ट्रॅजिडीतील प्रारंभिक
गडते. या प्रवेशाचे नेपथ्य म्हणजे नेहमीच राजवाड्याचे
ासते आणि ज्या प्राथमिक संवादाने रूढ कथानकाची
द द्वाररक्षकांच्या संबंधातीलच असावा हे सहज

ज्ञात येते की नाटकाने आणखी दोन पावले पुढे टाकली
स्वतःचे असे घर मिळाले आहे आणि नाटचगृहातील
ले आहे. नाटकात काम करणारे नट आणि नाटक
मर्यादरेषा येथे प्रथमच उमटलेली दिसते. अर्थात हे



अनुक्रमणिका

नाटक म्हणजे आजचे नाटक नव्हे. हे नाटक म्हणजे आजच्या नाटकाचे पूर्वरूप होय. धर्मपूर्व मंत्रनाटयात प्रत्येकजण नट असतो आणि जग म्हणजेच रंगमंच. तर आता धर्मनाटयात सहभागी आणि प्रेक्षक यांच्यात अंतर आहे आणि रंगभूमी म्हणजे एक पवित्र वेदी आहे. पण, या काळातही जे प्रेक्षक म्हणून येथे उपस्थित आहेत, ते सर्व रंगमंचावरील घटनांशी तादात्म्यभावनेने संवाद साधणारे आहेत.

प्राचीन लोकनाटयातील कोरस म्हणजे नाटकात भाग घेणारे आणि नाटक बघणारे यांच्यातील दुवा होय. आणि कोरससंस्थेचा ऱ्हास म्हणजेच तदनंतरच्या लौकिक नाटकाचा आरंभ होय. कोरस अदृश्य झाला. तत्क्षणी नट आणि प्रेक्षक यांच्यात एक गूढ असा अंतराय उत्पन्न झाला. आणि नंतरच्या काळात जणू काय आंतरिक अपरिहार्यतेच्या परिणामी हा अंतराय ऑर्केस्ट्रा-पिट आणि रंगमंचावरील दर्शनी कमान यांच्या द्वारा व्यक्त होऊ लागला. खरे तर नाटकाचा इतिहास म्हणजे नटाच्या किंवा खरे तर सहकारी प्रेक्षकांच्या निवृत्तीचाच इतिहास होय. निवृत्त झाले ते प्रेक्षक. कारण येथे असे दिसते की प्रेक्षकांनी नटाचा निरोप घेतला; पण त्यांच्यापासून फार दूर मात्र ते गेले नाहीत. रंगमंच त्यांनी दृष्टीच्या टप्प्यात ठेवला. एवढेच केवळ नाही, तर वेदीवरील त्यांचे स्वामित्व अबाधित राहिले. आणि वेदीवरील विधीस अनुसरून धर्मकृत्ये करीत रहाण्याचा त्यांचा अधिकारही अबाधित राहिला. नाटकाच्या इतिहासात या स्थित्यंतराचा आलेख स्पष्ट उमटलेला आढळतो. नंतरच्या काळातील नाटक मंत्रानुसारी किंवा धर्मानुसारी राहिले नाही. ते केवळ रंजनानुसारी होत गेले. नाटयाच्या या उत्क्रांत रूपातही पुन्हा एक आंतरिक संगतीचा परिक्रम प्रत्ययास येतो. आरंभ-काळातील नाटकांचा संबंध देवांशी होता. नंतर तो दैवतांशी जडला. नंतर लोकनेत्यांशी. नंतर महाजनांशी आणि अगदी शेवटी तुमच्याआमच्यासारख्या लोकांशी. या घटनेचा इत्यर्थ असा की नाटयगत व्यक्तित्वे स्वर्गीय किंवा ऐहिक पातळ्यांवर एका ठिकाणी स्थिर नाहीत. त्यांचा सतत अधःपात होत आहे. आणि या अधःपाताची जाणीव मनात बाळगून देखील आजही आपण कोणत्याही नाटकाच्या नायकाला 'हीरो'च म्हणतो-हीरोइझम्‌चा अंशमात्रही त्याच्या ठायी नसताना. जरी त्याच्या हातात मद्यचषक किंवा चहाचा कप असला तरीही.

नाटकाचा इतिहास आणि त्याचा अन्वयार्थ यथार्थ समजून घ्यावयाचा असेल, तर हा सर्व नाटयेतिहास अन्य कलांच्या आणि तत्संबद्ध भूमिकेच्या संबंधातच समजून घेणेच इष्ट ठरेल. कारण रंगमंच हाच मूलभूत कंद आहे.



अनुक्रमणिका



आणि सर्व कला म्हणजे या कंदोद्भव वृक्षाच्या शाखा आहेत कंदाचे मूळ आहे मंत्र. तेव्हा नाटकाच्या आणि नाटचोद्भव सर्व कलांच्या अपरिहार्य विकाससंबंधातील एकूण उपपत्ती शक्य तर आपण वर्गीकरणाच्या सूत्रात अनुसरून शोधू या. नाटकात एकूण सात स्थित्यंतरे प्रत्ययास येतात. त्यातील तीन प्रमुख आहेत. तीन प्रमुख स्थित्यंतरांचा दुवा सांधणारी, म्हणजेच मध्यावस्थ आहेत आणि अंतिम स्थित्यंतर जे आहे, ते खरे तर आदिपूर्व प्रारंभिक अवस्थेचे द्योतक आहे. ही स्थित्यंतरे येणेप्रमाणे:

मंत्रनाटच

धर्मनाटच (मध्यावस्था)

नेपथ्य नाटच

साहित्यनाटच (मध्यावस्था)

शास्त्रनाटच

मानसशास्त्रनाटच (मध्यावस्था)

मंत्रनाटच.

म्हणजे उपर्युक्त अनुक्रम असा ठरतो. मंत्रानुसारी नाटक; धर्मानुसारी नाटक; नेपथ्यानुसारी नाटक; साहित्यानुसारी नाटक; शास्त्रानुसारी नाटक; मानसशास्त्रानुसारी नाटक; आणि अगदी शेवटी पुनश्च मंत्रानुसारी नाटक.

उपर्युक्त वर्गीकरणात जो नाटचविकासाचा आलेख अनुस्यूत आहे, त्यात धर्मनाटच मध्यावस्थ कल्पिले आहे. हे संकल्पनवैशिष्टच कदाचित आश्चर्यकारक वाटण्याचा संभव आहे. पण धर्मप्रेरित कलेचा सर्व इतिहासच धर्मनाटचाची मध्यावस्था सिद्ध करणारा आहे. सर्व धर्मनाटच म्हणजे मंत्र आणि नेपथ्य यांचे लग्न असते. धर्मनाटचाच्या पूर्वावस्थेवर मंत्राचा प्रभाव आहे. तसाच तो बिझान्टाइन मॅडोनाच्या सांकेतिक भित्तिचित्रात रेखलेला स्पष्ट दिसतो. तर सिमाबूच्या मॅडोनात मंत्रधर्माचा समवाय आढळतो. तर तदनंतरच्या काळातील रूबेन्सची मॅडोना म्हणजे शुद्ध नेपथ्याची आविष्कृती आहे. जनमानसावरील अधिसत्ता धर्माला अबाधित राखावयाची असेल, तर तो धर्मही मंत्राधिष्टतच हवा. मंत्राचा संबंध संपूर्ण तुटला की धर्माचे आकर्षणही संपले. ज्या धर्मावर अद्यापपर्यंत मंत्राचा प्रभाव आहे, तेच धर्म आजवर टिकून राहिलेले आहेत.

उदयानंतरच्या काळात केव्हा तरी शोभेच्या म्हणजेच नेपथ्याच्या दिशेने धर्म



अनुक्रमणिका

वाटचाल करू लागतो. ही धर्मावस्था जगातील सर्व बॅरोक * कलेत प्रतिबिम्बित झालेली आढळते. बॅरोक कलाविशेष नाट्यविकासक्रमातील पुष्पावस्थेचा द्योतक आहे.

बॅरोक म्हणजेच नाटकी. हे नाटकीपण जीवनाच्या प्रत्येक अंगोपांगावर आक्रमण करणारे असू शकते. शेवटी कलाचक्र म्हणजे जीवनचक्राचेच प्रतिबिम्ब होय. जीवनाभावी कलेला ना अर्थ, ना अस्तित्व. या सत्याचा विसर म्हणजे सर्व कलेतील निरर्थाचा आणि वैफल्याचा वाचक होय.

नेपथ्यनाट्य तदनंतर साहित्यनाट्याच्या दिशेने वाटचाल करू लागते. साहित्यनाट्य मध्यावस्थच आहे. कित्येकांना हे विधान चमत्कृतिजनक किंवहुना असमंजस वाटण्याचा संभव आहे. हे कित्येक कोण ? तर ज्यांची अशी समजूत असते की नाटक ही अभ्यासिकेत बसून वाचण्याची वस्तू आहे. मुळातच हे खरे नव्हे. कारण नाटक ही करण्याची आणि बघण्याची वस्तू आहे. ते दृश्य काव्य आहे. साहित्यनाट्य हे नेपथ्यनाट्य आणि शास्त्रनाट्य यात मध्यावस्थ आहे. या अर्थाने शेक्सपीअर हा बॅरोक नाटककार ठरतो. वाटल्यास असे म्हणावे की बॅरोकचा अन्त तो सुचवतो. शेक्सपीअरला गुंतागुंतीच्या आकृतिबंधात रस आहे. अर्थातच केवळ आकृतिबंधातच आहे असे नाही. तरी पण आहे आणि या आकृतिबंधाचा संबंध अंतर्गत रचनेशी निगडित असतोच असे नाही.

---

* बॅरोक ही एका कलाविशेषातील कलेसाठी आणि विशेषेकरून वास्तुशिल्पासाठी योजिलेली संज्ञा आहे. या वास्तुशिल्पविशेषाचा उद्गम प्रथम इटलीत इ. स. १५०० च्या आगेमागे झाला. तदनंतरच्या दोन शतकातील वास्तुशिल्पावर या बॅरोक विशेषाचा नितांत प्रभाव आहे. इ. स. १७०० च्या सुमारास यूरोपमधील वास्तुशिल्प पुनश्च अभिजात आदर्शांना अनुसरू लागले. बॅरोकचे मूळ पोर्च्युगीज भाषेतील 'बारोको' या शब्दात आहे. बारोको म्हणजे विशोभित आकाराचे मौक्तिक. अर्थातच बॅरोक ही नंतरच्या काळातील संज्ञा उपहासावहेलनावाचक आहे. उपहासाचे, अवहेलनेचे कारण वेगळे आहे. बॅरोक वास्तुशिल्पात आकृतिबंधाची विलक्षण गुंतागुंत असते. आकृती चित्रविचित्र असते. चित्रणात अलंकरणाचे प्राबल्य असते. उच्चतेकडे, जडतेकडे, वक्रतेकडे, अतिशयोक्तीकडे बॅरोक वास्तुशिल्पाचे अवधान सतत खिळलेले असे. भव्यतेचा गूढ आभास हे बॅरोक वास्तुशिल्पाचे आद्यलक्ष्य होते. थोडक्यात म्हणजे संस्कृत साहित्यशास्त्रातील दंडीनिर्देशित गौडी रीतीचाच हा पाश्चात्य शिल्पाविष्कार होय.

—अनुवादक







ललित साहित्य हे मूलतः रोमॅन्टिकच असते. साहित्यातील उत्तरकालीन नवी अभिजातता केवळ आभासात्मक आहे. साहित्यातील रोमॅन्टिक प्रवृत्तीचे अस्तित्व संपुष्टात केव्हा येते ? तर ते जेव्हा वास्तवाचे प्रामाणिक दर्शन घडवण्याचा यत्न करते, तेव्हाच. आणि वास्तववादी साहित्य केव्हा निष्पन्न होते ? तर ते शास्त्रप्रवृत्तीला अनुसरते तेव्हा. पण साहित्यातील शास्त्रानुकरणालाही काही एक मर्यादा असते आणि या मर्यादेपर्यंत साहित्य पोचले की तत्क्षणी त्याची वाटचाल दुसऱ्याच कोणत्या तरी दिशेने प्रवर्तित होते. ही दिशा कोणती ?

चित्रकलेत कोर्बेतसारख्या माणसाचा वास्तववाद (त्यातही पुन्हा रोमान्सची छटा आहेच ! ) सस्कारवादीयांच्या वास्तववादात परिणत होतो. संस्कारवादी वस्तूचे वस्तुत्व कॅमेऱ्याच्या डोळ्यातून नेटके टिपण्याचा (अर्थात संपूर्णपणे असफल) यत्न करतात. पण वस्तू म्हणजे तरी काय ? तर वस्तूंचे वस्तुत्व गणितागत शास्त्रपद्धतीनं मोजता येते. म्हणून चित्रकलेतील नंतरची अवस्था म्हणजे ॲब्स्ट्रॅक्ट† चित्रणाची. म्हणजेच ॲनॅलिटिकल् विश्लेषणाची. क्युबिझम * वगैरे कलाप्रकारांचा समावेश या चित्रणपद्धतीत होतो.

---

†ॲब्स्ट्रॅक्ट आर्ट ही चालू शतकातील पहिल्या दशकाची निर्मिती आहे ॲब्स्ट्रॅक्ट आर्ट ही वस्तुनिष्ठ चित्रणपद्धतीचीच एक तीव्र प्रतिक्रिया होय. अर्थातच या कलेने वास्तववाद संपूर्णपणे नाकारला आहे आणि आकाराच्या मूलभूत घटकावयवांच्या रेखनचित्रणात लक्ष गुंतवले आहे. कान्डिन्स्कीसारखे कलाकार तर केवळ मूलभूत पोत, रंग इत्यादींचेच शुद्ध चित्र काढतात. सृष्टिसिद्ध आकारमानाशी त्याचा काही एक संबंध नसतो. तर ब्राक आणि पिकासोसारख्या काही कलाकारांच्या चित्रणाकृतोत मूळ वस्तूचे भान अबाधित, अविच्छिन्न असल्याचे आढळते. सेझान हा ॲब्स्ट्रॅक्ट आर्टचा जनक समजला जातो. त्याने या कलाविशेषाला गती आणि मान्यता प्राप्त करून दिली ही गोष्ट तर खरीच; पण ॲब्स्ट्रॅक्ट आर्टचे मूलभूत सिद्धान्त मात्र तदनंतरच्या काळात ग्रथित करण्यात आले.

* क्यूबिझम् : क्यूबिझम् ही संस्कारवादा (इम्प्रेशनिझम) ची प्रतिक्रिया होय खरे तर संस्कारवादाचीच क्यूबिझम ही एक अपरिहार्य परिणती आहे.. क्यूबिझम्ला अनुसरणाऱ्या चित्रणात भूमितीतील आकृतिबंध वस्तूचा मूलभूत पोत आणि वस्तुगत मूलभूत रंग आविष्कृत झालेले दिसतात. पिकासो आणि ब्राक हे क्यूबिझमचे जनक होत. चालू शतकाचे दुसरे दशक म्हणजे क्यूबिझमचा मध्यान्ह

( पुढील पानावर चालू

—आणि आता या नव्या घरातील झाडलोट संपलेली आहे. हे नवे घर सुशोभित झालेले आहे. आणि आता बायबलमधील तत्सदृश घराची जी अवस्था झालेली दिसते, त्याच अवस्थेच्या प्रतीक्षेत तूर्त हे घर उभे आहे. या घरातील सैतानाला धक्के मारून बाहेर काढण्यात आले आहे ते प्रवेशद्वारातून. पण तत्क्षणी आणखी सात सैतान या घरात प्रवेश करतात ते खिडक्यातून, सरळ धुराड्यातून खाली आणि भूमिगत ड्रेन पाइपमधून वर. उपर्युक्त कथेतील आध्यात्मिक रुपक प्रस्तुत अप्रस्तुत आहे. येथे एवढेच सुचवावयाचे आहे की वस्तूच्या दृष्टिगत आकृतीचे चित्रण करण्यात मग्न असलेला वास्तववाद अपरिहार्यपणे असंतुष्ट होतो आणि वस्तूच्या बहिरंगाच्या आत दडलेल्या अंतरंगाचा शोध घेऊ पाहतो. थोडक्यात म्हणजे वास्तववादाची परिणती अतिवास्तववादात होते.

चित्रकलेत ज्याचा निर्देश अतिवास्तववाद म्हणून करण्यात येतो, त्यालाच पेंटरच्या परिभाषेत आविष्कारवाद (एक्स्प्रेशनिझम्) म्हणतात. अतिवास्तववाद काय किंवा एक्स्प्रेनिझम काय, त्याचे उद्दिष्ट एकच असते. वर्तनास प्रेरणा देणाऱ्या हेतूंची समजूत आणि अभिव्यक्ती ज्या क्षणी मानसशास्त्रोक्त मन, इच्छा, भावना इत्यादि ठराविक सोंगट्यांच्या खेळात संपुष्टात आली, तत्क्षणी अपरिहार्यपणे मानसशास्त्राची परिणती मनोविश्लेषणशास्त्रात झाली. म्हणजेच पुनश्च मंत्रराज्यात म्हणजे मग पुन्हा एकदा मंत्रद्रष्टे जादूगार आले; कल्पित राक्षसापासून मुक्तता आली; भुताखेतांनी झपाटलेली झाडे आली. मनोविकृती आल्या; आणि मनोविकृतीपासून मुक्तता करणारे मंत्र पण आले. थोडक्यात म्हणजे पुन्हा एकदा पुराण आले फरक एवढाच की हे नवे पुराण केवळ अलंकारिक किंवा रूपकात्मक नाही.

प्राचीन काळातील मंत्राविष्ट वशीकरणाला आजच्या काळात द्विविध रूप

---

मागिल पानावरून )

होय. वॉन ग्रिस, मार्सेल द्यू चॅम्प हे आणखी काही प्रमुख क्यूबिस्ट कलाकार. क्यूबिस्ट कलेची मूळ प्रेरणा आफ्रिकेतील नीग्रो शिल्प-विकृतीची आहे. सेझानने आपल्या चित्रणाच्या संबंधात म्हटले होते की आपले चित्र म्हणजे क्यूब्ज् स्फीअर्स आणि सिलिन्डर्स या आकृतिविशेषांचा समवाय होय. उपर्युक्त विधानातील क्यूबवरून क्यूबिझम हा चित्रविशेषण अस्तित्वात आला. इ. स. १९२० मध्ये क्यूबिझम जवळपास संपुष्टात आला. तरीही तदनंतर सर्व देशातील अर्वाचीन चित्रकलेवर क्यूबिझमचा संस्कार स्पष्टास्पष्ट उमटलेला दिसतो.

प्राप्त झाले आहे. एकीकडे मनोविश्लेपणाचे आणि एकीकडे प्रचाराचे. आधुनिक प्रचारात जादूचा उपयोग केवढया मोठया प्रमाणात केला जातो, त्याची कल्पनाही प्रचाराचा बळी झालेल्या माणसाला करता येणे अशक्यप्राय आहे. जाहिरातीचे आवाहन जाणीवयुक्त बुद्धीला असते, ही समजूत निखालस चुकीची आहे प्रचारगत युक्तिवादाच्या परिणामी आजवर कोणाचे कधी मतान्तर घडलेले नाही. किंबहुना प्रचाराचा युक्तिवादाशी कसला म्हणून यत्किंचितही संबंध नाही. प्रचाराचा अवघा भर ठाम विधानावर असतो. कारण पुनःपुनरुक्त विधानाचा परिणाम वशीकरणात होणे अपरिहार्य असते. प्रतिस्पर्ध्याच्या चिलखतातील तुटणाऱ्या कच्च्या दुव्यावर जाहिरातीतील सूचनांचा सर्व भडिमार असतो आणि तुटणारा दुवा नेमका कोठे असतो? तर जेथे जाणीव आणि नेणीव एकत्र भेटतात तेथे. जाहिरातीतील घोषणा म्हणजे शब्दांची एक जादू असते. पक्षाचे बोधचिन्ह म्हणजे जादूने भारलेले एक दृश्य लक्षण, पुढे केलेला हात, हाताची वळलेली मूठ, जोडलेले हात हे सर्व मंत्रतंत्रातील आविर्भाव होत. मंत्र काय किंवा जाहिरात काय, उभयतांचे उद्दिष्ट शेवटी एकच असते. दुसऱ्यांच्या मनोगतावर आघात करण्याचे. म्हणजेच वशीकरणाचे.

तात्पर्य : उपर्युक्त सैद्धान्तिक विवेचन जर साधार असेल, तर नाटकाचा आणि पर्यायाने सर्व कलांचा हा स्वाभाविक इतिहास होय. एखाद्या वनस्पतीच्या विकासाशी त्याची तुलना करता येईल. एवढेच केवळ नव्हे, तर अशा यत्नातील अपरिहार्य धोका पत्करूनही खालीलप्रमाणे एखादा आराखडा आपण व्यवस्थित आखू शकतो.

| | | |
|---|---|---|
| मंत्र | पठन | कंद |
| धर्म | प्रतीक | पर्ण |
| नेपथ्य | अलंकरण | पुष्प |
| साहित्य | काव्यांकन | फल |
| शास्त्र | वस्तुदर्शन | कवच |
| मानसशास्त्र | आन्तरशोधन | बीज |
| मंत्र | { मनोविश्लेषण<br>प्रचार | { बीजारोपण<br>कंद |

आता यावर स्वाभाविकच असा आक्षेप संभावतो की कलेचा मंत्रदृष्टया, धर्मदृष्टया आणि शास्त्रदृष्टया येथे विचार आहे. पण कलेचा कलादृष्टया विचार येथे मुळीच नाही. तर असे का? उत्तर उघड आहे. कला म्हणून कला ही विचारणा केवळ एखाद्या वनस्पतीसंग्रहासारखी सामान्यत. आहे. म्हणजेच



अनुक्रमणिका

मनोत्पादनाच्या अनुषंगाने महजच उत्पन्न होणारे असे हे एक गौण उपोत्पादन आहे. एखाद्या नीरस. निष्फळ विकृतीमारखे. शुद्ध कला, कलेसाठी कला हे एक शुद्ध थोतांड आहे. सांकेतिक आकृतिबंध हा एक अर्थशून्य वाक्यप्रयोग आहे. स्वतःला अति बुद्धिमान समजणाऱ्यांचा हा एक भ्रम आहे. जेव्हा कला शास्त्राशी संबंध प्रस्थापित करण्याच्या निरर्थक प्रयत्नात मग्न असते, तेव्हा निष्पन्न होणारी ही एक अपरिहार्य प्रतिक्रिया आहे. कलेच्या इतिहासात ठाण मांडून बसणारा हा शुष्क कलावाद गंभीरपणाने विचार करण्याच्याही योग्यतेचा नाही. कला मंत्रसंभव आहे. आणि मूळ मंत्राकडेच कलेला परत धाव घ्यावी लागते.

नाटक जेव्हा दृश्य स्वरूपात व्यक्त होते, तेव्हा कलाचक्राच्या गतीत नटाची निर्मिती गृहीतच असते. अति प्राचीन काळात प्रत्येक मनुष्य हा नट होता. नट आणि प्रेक्षक असा भेदभाव तेव्हा अस्तित्वातच नव्हता. त्या काळात सर्व धरती म्हणजेच एक विश्वव्यापी रंगभूमी होती.

तदनंतरच्या अवस्थेत रंगमंचावर पवित्र वेदींची स्थापना झाली. या समारंभप्रसंगी जे उपस्थित होते, त्यांच्यात समारंभाचे प्रवर्तक आणि समारंभाचे प्रेक्षक असे एक विभाजन निश्चित झाले. तदनंतरच्या तृतीयावस्थेत व्यासपीठावरच रंगमंच थाटला गेला आणि नट व प्रेक्षक यांच्यात एक मानसिक असे दूरान्तर निर्माण झाले. अखेरच्या अवस्थेत नट हा त्याच्या प्रेक्षकांपासून हजारो योजने दूर गेला. हे झाले स्थलान्तर. पण कालान्तरही काही कमी नव्हते. कदाचित कित्येक महिन्यांचे; कदाचित् वर्षांचे; कदाचित शतकांचे देखील.

पण या अन्तिम अवस्थेचे प्राथमिक अवस्थेशी एक विलक्षण कुतूहलजनक असे साम्य आहे. आता पुन्हा एकदा रंगमंच म्हणजे अखिल धरती आहे. रंगमंचावरील दृश्य दर्पणातील प्रतिबिंबाचे आहे आणि तरीही नटनटी प्रेक्षकांना इतके निकटवर्ती आहेत, की पडद्यावर उमटलेला चुंबनाचा भव्याकृत क्लोजअप म्हणजे जवळपास प्रेक्षकांनी अनुभवलेल्या चुंबनाचाच तो एक आविष्कार ठरतो. आजचे युवक नाटयगृहापेक्षा सिनेमागृह अधिक पसंत करतात. या पसंतीचे एक कारण म्हणजे सिनेमाच्या थिएटरमध्ये प्रत्ययास येणारी जवळीक. म्हणजे येथे पुन्हा नट आणि प्रेक्षक यांच्यातील विभाजनरेषा पुसली गेली आहे. नट आणि प्रेक्षक प्रायशः एकरूप झाले आहेत. त्यांच्यात भावनेची एकतानता साधली आहे. म्हणजे पुन्हा एकदा चक्राचा फेरा पुरा झाला आहे. दुर्दैव असे की सिनेमाही त्याच्या साधनांनी बांधला गेलेला आहे. आणि अत्यल्प अपवाद वगळता आजचा सिनेमा हा पूर्वीच्या रंगमंचावर आविष्कृत झालेल्या वास्तवाचे सांकेतिक दर्शन पुनश्च घडवीत आहे असंस्कृत मनोव्यापारदर्शन आणि भडक प्रचार हे आजच्या

सिनेमाचे स्थायीभाव आहेत. त्यांच्या पकडीतून स्वतःची सुटका करून घ्यावयाची असेल आणि अभिनव मंत्रतंत्र सिनेमाने आत्मसात करावयाचे असेल, तर नाटकाच्या संपूर्ण इतिहासात आजवर प्रकट झालेल्या नाट्यगत आवाहनाच्या सर्व शक्यता सिनेमाने जाणीवपूर्वक अभ्यासून आत्मसात करणे अत्यावश्यक आहे.

संभव आहे की कदाचित्त या सर्व प्राथमिक विवेचनात जो काय संक्षिप्त नाट्येतिहास ग्रथित करण्यात आला आहे, त्याची प्रवृत्ती अतिशयित सोपेपणाकडे झुकलेली आहे. येथे जे एक चित्र म्हणून काढण्यात आले आहे, ते वस्तुतः एका सचेत वस्तुजाताचे आहे. पण चित्रच. सर्वच सादृश्य निर्देशनात काही एक भय असते. सहेतुक सादृश्य निर्देशनात नेहमीच असत्यसंभवाचा धोका असतो. जे काय सहेतुक विवेचन येथे सादर करण्यात आले आहे. ते ऐतिहासिक सत्याचे चित्र म्हणून नव्हे; तर विचारप्रवर्तनाचे एक साधन म्हणून. गेल्या शतकाच्या अखेरीस अशी एक समजूत दृढ झालेली होती की शतकानुशतकांच्या यातनामय संघर्षानंतर नाटक हे अखेरीस वस्तुजाताचे प्रामाणिक चित्र दाखविण्यात यशस्वी झाले आहे. आणि वस्तुजाताला आरसा दाखविण्याव्यतिरिक्त अन्य कोणते म्हणून नाट्यप्रयोजन संभवतच नाही. आणि वस्तुजात तरी कोणते? तर पाश्चात्यच धनाढ्य वर्गाने मर्यादित केलेले. अर्थातच ही समजूत आरपार चुकलेली आहे. आणि या समजुतीच्या निराकरणासाठी प्रस्तुतचा लेखनप्रपंच योजिलेला आहे. सृष्टीला आरसा दाखवते ते नाटक, ही कल्पनाच मुळात प्रासादिक आहे; मूलभूत नाट्यप्रयोजनाशी सर्वथा विसंगत अशी आहे. नाट्यप्रयोजन याव्यतिरिक्त अन्यत्र आहे. ते उच्चतर, भव्यतर, अधिक व्यापक आणि अधिक अर्थान्वेषक असे आहे. आपण नाट्यगृहात प्रवेश करतो तो काही आपल्या सामाजिक वास्तवाच्या संदर्भातील क्षुद्र तपशिलात स्वतःला शोधण्यासाठी नव्हे. आपण नाटक बघतो ते अथांग आत्म्याचा ठाव घेण्यासाठी, हास्याने स्वतःला उल्हसित करण्यासाठी. भयाने आणि करुणेने स्वतःचे मनोगत शुद्ध करण्यासाठी. करुणाभयाच्या भावनेपासून स्वतःला मुक्त करण्यासाठी. स्टायनरने म्हटले आहे की 'रंगमंचावर हीरोची पुनश्च प्रतिष्ठापना केल्याखेरीज नाटकाला आवश्यक ती आवाहनक्षमता आणि उदात्तता प्राप्त होणार नाही आणि हीरोची प्रतिष्ठापना म्हणजे तरी काय? तर देवसदृश मानवाच्या मूर्तीची प्रतिष्ठापना. मूर्ती अशा देवमाणसाची की ज्याला वस्तुजाताच्या क्रॉसवर ताणण्यात आले आहे. असा देवमाणूस की जो आपल्यातील प्रत्येकाच्या अंतरंगात तेवणारा चैतन्यमय स्फुल्लिंग आहे. असा देवमाणूस की जो मानवतेचाच मूर्तिमंत आविष्कार आहे.

[ जेम्स लेव्हरच्या 'ड्रामा : इटस् कॉस्टयूम ॲन्ड डेकॉर ' या ग्रंथातील प्रास्ताविक प्रकरण. ]

# प्रासंगिक टिपणे

## विद्येच्या वाटेवर

• दुर्गा भागवत

विद्येचे मला उपजत वेड. कारण माझी चौकसबुद्धी फार अवखळ आणि तीव्र होती. साधारण तीन वर्षांपासूनची आठवण मला आहे; तेव्हा पासून वडील माणसे जे–जे करतील ते–ते आपण करायचेच, नव्हे केलेच पाहिजे अशी प्रेरणा माझ्या मनात असे. आगकाडी पेटविणे ही पहिली विद्या; त्याबरोबरच चुलीतल्या कोळिनांशी खेळ, पीठ चोरून पळवून पाण्यात कालवून भाकरी करून ती चुलीत टाकणे ही नंतरची पायरी, भाजी चिरणे ही एक महत्वाकांक्षा. चाकू, कात्री, विळा ही मुलांची खेळणी नव्हेत, असे वडील माणसे बोलत आणि ती तसे बोलत म्हणूनच त्यात त्यांच्या मोठेपणाचे रहस्य भरलेले आहे असे माझ्या बाल-मनाला वाटायचे. नेमकी तीच हत्यारे नि कोलिते माझ्या जिज्ञासेने जपली. ती वापरणे सोपे नव्हते म्हणून यात शिकूनच कौशल्य मिळवावे लागते हे मला उमगले नि मी सर्व गोष्टीतले कौशल्य टिपू लागले. शेवटी कौशल्य नाही अशी गोष्टच व्यवहारात दिसेना, आणि म्हणूनच मी जे–जे मला सहज करता येत नव्हते, ते–ते करण्याचा सपाटा लावला.

ज्ञानाचा बाबतीत एक मौज असते ती अशी की त्यात शिळेपणा नसतो नि नित्य नूतन असे नेहमीच अभ्यासू मनाला शिकायला मिळते. ' पदे पदे यन्नवता–मुपैति । तदेव रूपं रमणीयतायाः (पावलोपावली ज्याला नवता प्राप्त होत असते, तेच नवता पावणारे सौंदर्याचे रूप आहे) अशी सौंदर्याची व्याख्या आहे. ज्ञान व सौंदर्य दोन नाहीत. विद्येचा नवनूतनपणा फार विलोभनीय असतो; कुतूहल नवलाची भावना हा या रमणीयतेचा पाया असतो. जिज्ञासा नेहमी सत्याला हुडकत असते; विद्येच्या वाटेवर सत्याचा प्रकाश असतो, तसाच गूढ अंधारही असतो. पहाटेला सामोरा जाणाऱ्या रात्रीसारखा तेजोगर्भ हा अंधार असतो. सत्य कुणाच्याच सहसा हाती लागत नाही; पण त्याच्या तिरिपातिरिपातून प्रवासी वाटचाल करीतच राहातो. ठरलेल्या टप्प्यावर आले की सत्य गवसेल असे वाटते. पण त्या टप्प्यावर आल्यानंतर ते पूर्वीसारखेच अप्राप्य आहे असे







दिसून येते. वाटसराची जिज्ञासा, भ्रम, आशा व निराशा यातून गुरफटल्याच शिवाय नाही. 'का, कसे आणि केव्हा' या तीन प्रश्नांच्या विचारणेची, स्वतःच्या अनुभवावर आधारलेली, इतरांच्या अनुभवाने संस्कारलेली पण मर्यादित दृष्टी घेऊनच तो निघालेला असतो. या प्रश्नात सर्व अडथळ्यांची गर्दी झालेली असते हे उघडच आहे.

अक्षरओळख कधी झाली ते आठवत नाहीं. माझ्यापेक्षा चार वर्षांनीच मोठा असा माझा एक काका होता. तो नेहमी आजारी असायचा. त्याला शिकवायला मास्तर येत. तिथे मी बसून राहायची. तिथेच मीही बसून बसून अक्षरे शिकले. पाढे शिकले. कविता शिकले. माझ्यापेक्षा वरच्या वर्गातला बराच अभ्यास मला असा पाहून पाहून माहीत झाला होता. त्यामुळे प्रत्यक्ष न शिकताच मी लिहायला नि वाचायला शिकले. माझा काका वसंत गावदेवीच्या मुलांच्या मराठी शाळेत जायचा. आमचे घर तिथून जवळच डामर गल्लीत होते. रोज गड्याबरोबर ती शाळा मी पाहायची. आपण देखील त्याच्याबरोबर शाळेत जावे असे मला वाटे. पण वय पुरे सहा झाले नव्हते म्हणून घरची माणसे शाळेत पाठविनात. मी शाळेत जायचा हट्ट धरला. खाऊ, खेळणी कशाने माझे समाधान होईना. आईशी रोज खटके उडू लागले. वडिलांशी, आजीशी भुणभुण सुरू झाली. 'पुढच्या दसऱ्याला तुला शाळेत घालू' हे आजीचे आश्वासन अपुरे वाटू लागले. घरी सारखी पाटी नि पहिले पुस्तक घेऊन बसू लागले. दसरा तर खूप लांब होता. माझा धीर सुटत चालला. शाळेत गेलेच पाहिजे, गेलेच पाहिजे असा छंद मनाने घेतला. एक दिवस दुपारी जेवून सारी माणसे झोपलेली असताना मी घरातून धूम ठोकली आणि शाळेत गेले. त्यावेळी मुलांची आणि मुलींची शाळा एकाच इमारतीत होती. मुलींची संख्या थोडीच होती. वाडीत आम्ही तीन घरची वीस–पंचवीस मुली व मुले एकत्र खेळत असू. त्यामुळे शाळेत मुला–मुलींचे वर्ग वेगळे असतात हे माहीत नव्हते. मी शाळेत गेले खरी. पण तिथे शाळा म्हणजे एक मोठे मुलांमुलींनी भरलेले दालन असते, ही माझी कल्पना खोटी ठरली. मुलांची शाळा खाली नि मुलींची वरच्या मजल्यावर होती. मी प्रथम मुलांच्या शाळेत गेले. शिपायाने विचारले "तुला कोण हवं?" "मी वसंत भागवतची पुतणी. मला शाळेत नाव घालायचंय." तो हसला– "तू एकटीच आलीस?"

"हो."

"नाव घालायला मोठं माणूस कुणीच कसं नाही? तुझा वयाचा दाखला कुठं आहे?"

दाखला—बिखला काय प्रकरण आहे, वडील माणूस आपले नाव घालायला कशाला लागते ते मला कळेना मी भांबावले. मग त्या शिपायाने मला मुलींच्या शाळेत मोठ्या बाईंच्या समोर नेऊन उभे केले. "ही मुलगी एकटीच शाळेत नाव घालायला आली आहे" असे म्हणून तो गेला.

"तुझं नाव काय ?" मी संपूर्ण नाव सांगितले नि म्हटले "मला शिकायचंय. मला शाळेत घ्या."

"शाळेत असं घेता येत नाही. तुझ्या वडिलांची सही हवी."

मी गोंधळले. बाई—त्यांचे नाव शेगुलाबाई जोजेफ—म्हणाल्या "तू पळून आलीस ?"

मी 'हो' म्हटले.

"का ?"

"मला घरांतली माणसं शाळेत पाठवत नव्हती म्हणून एकटीच आले."

"तुझे वडील काय करतात ?"

"माहीत नाही."

बाई आतां चक्रावल्या. त्या म्हणल्या "पण तुझा पत्ता काय ?

मी पत्ता सांगितला. त्या गप्पच होत्या. मग मी म्हटले "माझा काका वसंत खालच्या शाळेत जातो."

"कितवीत आहे ?"

"चौथीत."

"तू बस इथेच." बाईंनी मला पाटीवर बाराखड्या काढायला सांगितल्या. एका पुस्तकातला धडा वाचायला सांगितला. मी तो घडघड वाचला. बाराखड्या लवकर संपल्या.

तासाभरात काका वर आला. तो संतापून म्हणाला "तू इथं कशाला एकटी आलास ? आता थांब घरी सांगतो म्हणजे कळेल कसं काय ते."

बाईंनी त्याला प्रश्न विचारले. त्याने दिलेल्या उत्तरांनी त्यांचे समाधान झाले. एक चिठ्ठी लिहून त्यांनी त्याच्याजवळ दिली. "शाळा सुटल्यावर इथे येऊन हिला तुझ्याबरोबर घरी घेऊन जा" असे सांगितले. माझा धीर चेपला होता. मी बाईंना म्हटले "मला चौथीत बसायचं आहे." बाई हसल्या, पण काही बोलल्या नाहीत.

इकडे घरी मी नाही असे पाहून मोठा कल्लोळ माजला होता. मी मुळचीच आडदांड होते. त्यामुळे ही विहिरीत पडली; का कुठे गाडीखाली सापडली या चिंतेने घरची माणसे बेजार झाली होती. माणसे चारी दिशांनी

शोधीत होती. पाच वाजता आमची स्वारी काकाबरोबर हर्षोत्फुल्ल होऊन घरी आली. आईला ' मी शाळेत नाव घालून आले ' असे सांगायची अगदी घाई झाली होती. पण घरचा देखावा पाहून उत्साह पळाला. आईने मनगट धरले. " काय ग, कुठे गेली होतीस ? " म्हणून दरडावले. हात वर झाला. इतक्यात माझा मोठा काका पुढे झाला. त्याने आईकडून मला ओढून घेतली आणि उचलून धूम ठोकली—आजीच्या जवळ मला देऊन तो म्हणाला, " आई, वहिनीला दुर्गाला मारू देऊ नकोस. ती काही कुठे खराब काम करायला गेली नव्हती.

आजीचे माझ्यावर फार प्रेम होते. ती स्वतः फार बुद्धिमान आणि विद्येची चहाती होती. शिकलेलीही होती. तिने मला म्हटले " दुर्गे, तुझ्या खोड्या थांबणार तरी कधी ? काय जीव टांगणीला लावलास ग ? "

आता माझे अवसान वाढले. मी रुसून तिला म्हटले " मग मला तू शाळेत का नाही घातलंस ? "

तितक्यात आजोबा आले. ते म्हणाले " हो, चूक आमचीच. जाऊ दे ग ही पीडा उद्यापासून शाळेत. म्हणजे निश्चित एका जागी तरी बसेल. उत्पात नकोत " ' उद्यापासून शाळेत जायचे ' हे ऐकून माझा आनंद गगनात मावेना. मी त्यांच्याकडे गेले नि म्हणाले " बाबा, मला शिकवा. मी शाळेत जाईन. "

मात्र दुसऱ्या दिवशी रीतसर शाळेत जाणे झाले. दोन दिवस हट्ट करून मी चौथीत बसले. पण समजूतदार शेगुलाबाईंनी मला गोडीगुलाबीने तिसऱ्या दिवशी पहिलीत बसविले. मी तक्रार न करता बसले. अशा रीतीने शालेय जीवनात माझा प्रवेश झाला आणि अभ्यास सुरळीत चालू झाला. मुलींशी माझी कधीं भांडणे झाली नाहीत. सर्वांशी मिळूनमिसळून वागणारी मुलगी म्हणून मला शाळेत ओळखत. मराठी चौथीपर्यंत शाळेतले शिक्षण मुंबईत झाले. मध्यंतरी आई वारली आणि आम्ही दोघी बहिणी आत्या नाशिक, नगर इथे मुलींच्या इंग्रजी माध्यमिक शाळेवर मुख्याध्यापिका होती, तिच्याजवळ राहून, मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण तिच्याजवळच घेतले.

मराठी म्युनिसिपालिटीच्या शाळेतली पहिली दोन वर्षे फार सुखाची गेली. सर्वांना एकच शिक्षण होते. एकच तऱ्हेची जाणीव होती. ही मुलगी हिंदू, ती ख्रिस्ती असा भेद या शाळेत नव्हता.

पण तिसरीत आल्यावर आम्हा मुलींना सेंट कोलंबोत घालण्यात आले. ही शाळा उत्तमच. पण तिथे आल्यावर बाळपण मावळू लागले हे खरे. निदान माझ्या संवेदनाशील मनाला खूप बौद्धिक संघर्ष या जगात आहे याची चांगलीच जाणीव या शाळेत झाली. महापालिकेच्या शाळेत प्रार्थना असे. पण ती आमच्या सर्वांच्या

परिचयाची. पण या ख्रिस्ती शाळेत नवी ख्रिस्ती प्रार्थना झाली. बायबलचे वर्ग सुरू झाले. आजपर्यंतची माझी धर्मधारणा पुराणे नि महाभारत–रामायणातल्या कथावर, देवळातल्या देवांवर, आजींच्या देवघरातल्या देवांवर आधारलेली होती. अनेक अभंग, स्तोत्रे, आरत्या नि पदे यांनी त्या धारणेभोवती भावनांचे नाजूक वलय निर्माण केले होते. ईश्वराचा प्रखर न्याय व कोवळे वात्सल्य संवेदनेत साकारले होते. पण ख्रिस्ती शाळेतल्या प्रार्थनेने अनेक विचार मनात उमटू लागले. अनेक परिवर्तने घडली. त्यांचे वर्णन 'पैस' मधल्या 'ख्रिस्त–संगत' या लेखात मी केले आहे. परंतु त्यातला काही भाग मिशनरी शाळेतल्या ख्रिस्ती संस्कारांचा आहे, तो इथे पुनरुद्धृत करण्यास हरकत नाही. कारण परकी धर्म-शिक्षण पद्धती आणि माझ्या वैयक्तिक क्रिया व प्रतिक्रिया त्यात मूर्त झालेल्या आहेत.

"येशूची शाळेत ओळख झाली. 'तारक' देवाबद्दल प्रथम ऐकले. पापाचे भय तिथून उत्पन्न झाले. मानवांच्या पापाकरता स्वत: मरून देवाजवळ क्षमा मागणारा येशू श्रवणी आला आणि मग पापाच्या जाणिवेची मुळे मनभर पसरली. पापावर उपाय काय ? कसले भयंकर पाप ? भावंडांशी भांडण, मित्रमैत्रिणींबरोबर मारामारी, मफरचंद वगैरे चोरून खाणे, वडीलधाऱ्यांना दुरुत्तरे करणे, वर्गात अभ्यास चालला असताना दुर्लक्ष करणे, कॉपी आजोबाकडून लिहून घेणे, लंगड्या–आंधळ्या भिकाऱ्यांची टिंगल करणे इत्यादि पापांची जंत्री शाळेच्या प्रार्थनेच्या वेळी उभी राही. प्रार्थना मला आठवते ती अशासारखी: " हे आमच्या आकाशातील बापा ...... जसे स्वर्गात तसे पृथ्वीवरही तुझे राज्य येवो ! आमची आजची भाकर आज आम्हाला दे " इत्यादि.

"मला स्वत:ला माझा पृथ्वीवरचा बापच फार आवडत असल्यामुळे आकाशात किंवा स्वर्गात कुणी बाप असेलसे कधी मनातून वाटायचेच नाही. इथे येशू, त्याचा बाप व मी यांच्यामध्ये अंतर उत्पन्न झाले. पापांचे भय मनात वळवळत असताना, बाई पवित्र शास्त्रातल्या गोष्टी सांगत, त्या आठवत आणि इतक्यात 'भाकरी' आली की हिचं काय काम असे आकाशातल्या देवाच्या प्रार्थनेत वाटायचे; पण घरच्या देवाचा नैवेद्यही मग आठवे. देव व अन्न जवळ जवळच असायचे हा संकेत मग मनात उमटला.

"मात्र शाळेतली प्रार्थना संपली की हायसे वाटे. पण रात्रीं झोपण्याची वेळ झाली की मग फिरून प्रार्थनेचे कर्तव्य आठवे. ती प्रार्थना शाळेतली नव्हती. माझीच होती. पण निवेदनात्मक होती. ती एक बोलकी दैनंदिनी होती. एका अनामिक, दयाळू पण पापाची दखल घेणाऱ्या देवाला सांगितलेली. "

ही झाली प्रत्यक्ष धर्म-संस्कारांची एक छोटी कहाणी. पण समग्र इंग्रजी राज्यातल्या शिक्षणामुळेच कुठेही पाहा शिक्षितांवर झालेले संस्कार ख्रिस्तीच आहेत. हा विषय फार उद्बोधक आणि अभ्यासनीय आहे. परंतु तो फारच मोठा असल्याने त्याचा केवळ उल्लेखच करून तो सोडलेला बरा.

परंतु ख्रिस्ती धर्मशिक्षणाच्या बाबतीत एक गोष्ट अवश्य सांगावीशी वाटते. ती म्हणजे आमच्यासारख्यांच्या घरी राष्ट्रीय भावना जागृत असल्यामुळे माझ्या अख्रिस्ती मनाला येशू आवडलेला असला तरी ब्रिटिश साम्राज्यशाहीशी त्याचे अतूट नाते असलेले पाहून माझे बाढीस लागलेले मन बंड करून उठले. साम्राज्यशाहीची कट्टर वैरी मी बाळपणापासूनच होते आणि म्हणून ख्रिस्त या साम्राज्याचा धर्म-प्रतिनिधी बनलेला पाहिला नि मनाला मोठा धक्का बसला. या धक्क्याने मला सावध ठेवले. तेव्हापासून धर्मभावना पारखायची प्रवृत्ती निर्माण झाली.

*　　　*　　　*

एवढाच परिणाम दोन भिन्न धर्मातली स्वाभाविक प्रतिक्रिया म्हणून होता, तरी हरकत नव्हती. परंतु टिळकांच्या मृत्यूनंतर एकोणीसशे एकोणीस-पासून भारतातल्या राष्ट्रीय राजकारणाने क्रियाशील दिशा धारण केली. 'क्रॉनिकल' पत्र मुंबईत निघाले. आमच्या घरात 'टाइम्स' बंद झाला. स्वदेशीची चळवळ घरात शिरली. आमची आई एकोणीसमध्ये वारली. तेव्हापासून वडिलांनी आम्हाला विलायती कपडे मिळणार नाहीत असे सांगितले. फटाके बंद झाले. तोपर्यंत आम्ही विलायती मलमलचे सुंदर फॅशनेबल कपडे वापरीत होतो. सुरेख मोजे, बूट, रिबिनी आम्ही मुली वापरीत असू. एका दिवसात ही सारी ऐट गेली. जुने कपडे फाटायला वेळ किती लागणार? मी तर कपडे जबर फाडणारी. तेव्हा गिरण्यात तरी चांगले कापड कुठे निघत असे. वडिलांनी मांजरपाटाचे ताग घरात आणून टाकले. आम्ही मांजरपाटाचे स्वदेशी कपडे घालू लागलो. मँचेस्टरच्या कपड्यात आमच्या शेजारची मुले वावरत होती. सेंट कोलंबोतल्या मुली तर उघड 'उच्च' मध्यमवर्गीय. त्या कशा वाईट कपडे घालतील? शाळेत आम्ही बहिणीच कपड्यांच्या बाबतीत अपवाद ठरतो. मुली हिणवीत, टोचून बोलत. पण आम्हाला त्याचे काही वाटले नाही. कारण गांधींवर आजोबांचा लोभ जडला होता. 'क्रॉनिकल'ने धर्मपोथीचे रूप घेतले होते. आम्ही नवधर्म शिकत होतो. त्यामुळे आजूबाजूच्यांचे टोचून बोलणे म्हणजे आमच्या श्रद्धांना मिळणारे खतपाणी होत गेले. मात्र त्यामुळे राजकारणी संघर्षाची जाणीव शाळेत



अनुक्रमणिका

होत राहिली आणि ख्रिस्ती शाळा राजकारणी शत्रूंच्या शाळा वाटू लागल्या. सेंट कोलंबात मन रमेना. पण परिस्थितीनेच तिथून आम्हाला बाहेर काढले आणि मुंबई महानगराच्यापासून दूर असलेल्या, गांवढयाने वेढलेल्या लघुनगरात पाठवले. पण इथे या राजकीय दुभंगाला विराम मिळाला नाही. वेगळया दिशेने पण अधिक तीव्र रूपाने तो वावरतच राहिला. नव्हे तेव्हा पासून सुरू झालेली हो आपल्या राजकीय अस्तित्वाची जाणीव या ना त्या रूपाने पुढे सतत वाढतच गेली; राकीजय अस्तित्वाच्या जाणीवेत संघर्ष आपोआपच येतो. कारण त्यात पूर्वेतिहास, धर्मसंप्रदाय, जातीपाती, राजकीय पक्षकारण, आंतरराष्ट्रीय राजकारण सारे काही येते. ही सारी दुभंग असलेली दालने आम्हाला शाळेतच खुली झाली. सामाजिक असमाधान त्यातून वाढीस लागले आणि आत्मसंतुष्टता कायमची गाडली गेली आमच्या कृती, भावना यांना मर्यादा होत्या. यशही अगदीच नव्हते असे नाही. पण राष्ट्रीय चळवळीमुळे आणि गांधींच्या नेतृत्वामुळे आत्मसंतुष्टता मात्र वाढू शकली नाही, हा माझा सर्वांत मोठा लाभ झाला. पण त्यामुळे मन सतत अस्वस्थ राहिले. शंकित राहिले. स्वतःला छेडीत, चिरीत राहिले आणि अखेर ही अस्वस्थता स्वभावाचा एक स्थायी भाव होऊन बसली.

* * *

आमची शाळा सरकारी होती. शिक्षकवर्ग खरोखरच चांगला होता. विद्यार्थिनी उत्साही पण परंपरेला जखडलेल्या होत्या. जातीचा अभिमान प्रत्येकीला उदंड होता. जात कळत नव्हती आम्हाला— मंबईत सुधारक वळणात वाढलेल्यांना. नगरला शाळेचे दोन शिपाई होते. एक ब्राह्मण नि दुसरा मुसलमान. त्यात मुसलमान शिपाई फार चांगला होता. शाळेत आमचा डबा तो घेऊन यायचा. पाण्याची पिशवीही आणायचा. प्रथम मुसलमान शिवलेले अन्न आमच्याबरोबर मुली टाळात. नावे ठेवीत. पण पुढे त्याही रुळल्या. शाळेतली रोटीबंदी साफ तुटली. त्यामुळे शाळेत आमचा वेळ आनंदात जाई.

नगरच्या शाळेत एक नवे मास्तर आले. डोकीला पागोटे, पघळ कोट नि मांगळ धोतर नेसणारे. डोळयाना चष्मा नि वर पाहात चालणारे. तोंडात अभद्र शिव्या. वर पाहून चालताना रोज कुणा तरी मुलीवर आदळायचे नि मग तिला शिव्या द्यायचे. मनाचे फार कनवाळू पण शिकवण्यात ढिले. त्यांचा तास अघळ-पघळ गप्पांचा असे. बायको फार सुग्रण आहे. रोज नवे नवे खमंग पदार्थ करते. सुगृहिणी आहे, पण त्यामुळे आपले पोट कसे बिघडते वगैरे गोष्टी ते गावरान भाषेत सांगत. ते ऐकून आम्ही खो खो हसून वर्ग डोकीवर घ्यायचा. मग आत्या यायची नि मुलींना दम भरून जायची. चुकून मास्तरांना कविता शिकवण्याची





लहर यायची. मग कठीण शब्दांचे अर्थ ते विचारीत. आम्हाला मोरोपंतांचे सावित्रीआख्यान होते. मास्तर शिकवीत होते.

'फल मूलार्थ निघे पति त्यासि म्हणे मजसि सत्तमा न्या हो'

ही ओळ आली. मास्तर मला म्हणाले "भागवत, सत्तमा याचा अर्थ काय ?" मी सांगितले, "उत्तमोत्तमा" अर्थ कोशाप्रमाणे बरोबर होता. पण तो इतका काटेकोर बरोबर होता म्हणूनच मास्तर भडकले. "अग कार्टे, वकिली करून मला अर्थात पकडू पाहातेस काय ? पुष्कळ अर्थ बरोबर असले तरी खरे नसतात आणि खरे असले तरी उचित नसतात. सांग नवऱ्याशी कसं बोलायचं असतं ?'

"मला काय ठाऊक."

"अग कारटे, एवढी घोडी झालीस तर अजून तुला साधी रीतीभातीची गोष्ट माहीत नाही ? सांग काल्यांची भाजी कशी करतात ?"

"मला नाही येत."

"हं काल्र्याची भाजी येत नाही ना. मग वधूपरीक्षेत कसली उतरतेस. ीत लावायला घरांत आहेच कोण—आई मेलेली नि आत्याबाई तर नोकरी करणाऱ्या" मास्तरानी आत्याच्या अविवाहितपणाचा उल्लेख नाखुशीने टाळला होता हे मला कळले. वर्गातला हशा थांबला आणि वातावरण स्तब्ध झाले. मास्तरानी दोन्ही हात गालावर टेकले. ते म्हणाले, "मुलींनो, आमच्या वेळी तुमच्या एवढ्या पोरींना पोरं होत असत. आता तर तुमच्या लग्नांना पत्ता नाही. आचारच बिघडलाय. पण पोरींची जात, अग लग्न तर व्हायलाच पाहिजे ना. असं पहा लग्न केल्यावर सासू सासरे राहिले, पण नवऱ्याचा तर मान राखता आला पाहिजे ? मला फार फार काळजी वाटते तुमची. मीही मुलीचा बाप आहे. नुकतीच तिला उजवून मोकळा झालो, पण चाल कशी आहे तिची. बघावं नि तोंडात बोट घालावं. पण तुमच्या पुढे कशाला सारं सांगायचं. गाढव गेलं तीर्था म्हणतं कालचा गोंधळ बरा होता. रहावत नाही. सावित्रीचं आख्यान आहे म्हणून सांगतो. सांगा नवऱ्याशी कसं बोलावं मुलीने ?" आता वर्गात फिरून अवखळ वातावरण आले. मुली फिसफिसल्या. आम्ही म्हणालो "सांगा ना मास्तर नवऱ्यापाशी कसं बोलायचं ते."

मास्तरांनाही आता स्फुरण आले होते. ते म्हणाले "ऐका वाया नाही जायचं ऐकलेलं. सावित्री सत्यवानाला म्हणाली, "ऐकले कां गडे आपल्याबरोबर मलाही आज वनांत न्यायची होती. पण तुमच्यासारख्या कारट्या काय म्हणतील ठाऊक आहे ? त्या म्हणतील "अहो चला, आज स्वैपाकाचा कंटाळा आला आहे.

"चला सिनेमाला जाऊ नि खानावळीत जेऊ." आता मुलींचा हंशा अनावर झाला. वर्गातल्या आरडाओरडझाला सुमार राहिला नाही. आत्या नेहमीप्रमाणे आत आल्या. मास्तरांकडे तिने नमते पाहिले. मुलींना खूप रागावली नि मला उभं राहाण्याची शिक्षा देऊन निघून गेली.

मास्तर खूप वरसले नि चिडले. ते म्हणाले, "काय कारट्यांचा गोंधळ तरी, योग्य ते शिकायला नको. वक शिकून का सुमार होतो? बस ग काट खाली. नसता कल्लोळ करता. शिकव पण देत नाहीत शिच्या. काय रीत लावायची तुम्हाला? ब्रह्मदेव सुद्धा पुरायचा नाही अशा पोरट्यांना आळा घालायला," मुली फिरून फिसफिसू लागल्या. "एकल का गडू" एकल का गडू एक सुरात पण खालच्या आवाजात चालू झाले. मास्तर भडकून उठले नि म्हणाले मरा, मरा कारट्यांनो, तुमची ममणवट त्या कापऱ्यात आहे. इतक्यात घंटा झाली. आम्ही त्या त्या हमत बाहेर पडलो.

घरी आल्यावर आत्याने मला विचारले त्या मास्तरांच्या तासाला वर्ग डोक्यावर घेणं तुम्हाला शोभतं का?

मग मी सारी हकिगत सांगितली. तशी तीही पोट धरून हसू लागली. पुढे मास्तरांची बदली नाशिकला झाली. ती मुलांच्या शाळेत. सहावीत मी नाशिक हायस्कूलमध्ये गेल्यावर मास्तर एकदा मला सांगू लागले, "काय ग सोन्यासारख्या पोरी होता तुम्ही. नाही तर ही नाशिकची भिकार कारटी, दुनियेत अशी पोरं पाहिली नाहीत कुठं."

मास्तरांचे हे चित्रण मी उगीच हंशा पिकवण्यासाठी दिलेले नाही कारण त्यांचे उद्गार व त्यांचा 'उपवर' मुलींकडे पाहाण्याच्या दृष्टिकोन वैयक्तिक नसून प्रातिनिधिक स्वरूपाचा होता. मुलगी व प्रौढ स्त्री यातला फरक पन्नास वर्षापूर्वीचा समाज जाणत नसे. 'कन्या धन परक्याचे' ही जाणीव आईबापांच्या हृदयात मुलीच्या जन्माबरोबरच सहस्र सूर्यांनी पोळली जात असे आणि समाज ते गोंदण जाजवीत असे. अजूनही जाजवायचं थांबलेला नाही. 'ज्याच्या पदरी लेकी त्याच्या घरी पाप' ही म्हण घरी कुणी उच्चारली नसली, तरी आम्हा मुलींनी शेजारी–पाजारी, आले–गेले यांच्या तोंडून सहस्र वेळा ऐकलेली आहे. मुलीचं वाढतं वय ही घोर आपदा होती. त्यामुळे मुलगी ही मुलगी म्हणून नव्हे तर आचापुढे टिकाव धरू शकणारी सून म्हणूनच जणू जन्माला यायची. तिला पोरपण नसे; व्यक्तित्वही नसे; मग व्यक्तिमत्व तर राहिलच. जन्मत:च ती कुणातरी 'वरा'ची सावली गणली जायची. मास्तरांप्रमाणेच वधूपरीक्षकरताच तिचे गुण, तिचे कौशल्य असे. किती तरी जणांनी आम्हाला विचारावे, 'तुम्हाला



अनुक्रमणिका

भात तरी करता येतो कां ? ' एकानी विचारले ' श्रीखंड पातळ झाले नि पाहुणे दारी आले आहेत तर काय कराल ? ' पण कुणी असे विचारले नाही की तुम्हाला शिवण किती येते ? गाणे येते का ? चित्रकला येते का ? वाचनाची कितपत आवड आहे ? व्यायाम करता का ? मीठ, मिरची, मेतकूट, साखरभात, पुरणपोळी, लोणचे, पापड यांच्याबद्दलचेच सारे प्रश्न. हे प्रश्न उघड वधूपरीक्षेतले होते. कुणी तर त्याच्याही पुढे जाऊन विचारीत. " सुधारक, जातपात मानीत नाही. पण महिन्याच्या महिन्याला बसता तरी का ? विटाळ तुम्ही पाळीत नाही म्हणून विचारले." आता या चौकसपणाला काय म्हणावे ? अशा प्रश्नांचे नाशिक हे आगर. सनातनी, क्षेत्राचे गाव. तिथल्या स्थायिक मंडळींना सोयीचे. पण बाहेरून आलेल्या आमच्यासारख्या हंगामी निवाऱ्यांना एकंदरीत तापदायकच.

याचा परिणाम एकच झाला की गृहकृत्यात आपण दक्ष असावे हा संदेश आम्हाला आमच्या आत्याने दिला. ' मुलींनो चाळीला आणि पोळीला कुणाला महाग होऊ नका ', असे ती वारंवार म्हणायची. अकराव्या वर्षापासून स्वतःचे कपडे जुन्या कपड्यावरून स्वतः हाताने शिवायला ती लावायची. आठवड्यातून एकदा स्वयंपाक करावा लागे. पंधरा दिवसातून एकदा आपापले धुणे धुवून वाळत घालायचे नि महिन्यातून एकदा भांडी घासायची अशी तिची शिस्त होती. आम्ही म्हणायच्या, "सिताबाई, आमच्या बरोबरच्या मुली हुंदडतात नि तू मात्र आम्हाला स्वयंपाक करायला लावतेस ना." ती गंभीरपणे म्हणायची, "अग तुम्हाला आज समजत नाही. पण उद्या तुम्ही लग्न करून सासरी गेलात आणि काम नीट करता आले नाही, तर सासरची माणसं म्हणतील ना की आत्याने स्वतः लग्न केले नाही नि भाच्यांना उनाड ठेवले. सवय ठेवली तर कामाचा कंटाळा येत नाही. उरक येतो. स्वयंपाक तुम्ही वाटेल तो करा. बदामाचा शिरा करा नाही तर भाकऱ्या करा. पण सारं काही करता आलं पाहिजे. घरकामसुद्धा विद्याच असते, बरं " आणि सांगायचा मुद्दा असा की चवदाव्या वर्षी मी पुरणावरणाचा स्वयंपाक व शिवण चांगले करू लागले.

नाशिकला प्रथम माझी आत्या गेली, त्यावेळी आजोबा व आम्ही फिरायला जात असू. प्रौढ पदवीधर कुमारिका नाशिक गावाला अपरिचितच वस्तू होती. बायकांनी फिरायला जाणे तर त्याहून अप्रशस्त समजले जात असे. त्यामुळे अनेक सनातन्यांनी आमच्या घरावर कृतकोटीमार्फत बहिष्कार घालायचे ठरवून एक पत्रकही तयार केले होते. पण कृतकोटींनी अखेर सही दिली नाही, तेव्हा पत्रक व बहिष्कार स्थगित झाला.

माझ्या आत्याने आम्हाला संसारकृत्यात दक्ष केले, त्या बद्दल तिचे मानावे





अनुक्रमणिका

तेवढे उपकार थोडेच होतील. तरी पण आता मागे वळून पाहता यांतल्या बऱ्याच गोष्टी माणसाच्या चारित्र्याच्या घडणीला कारणीभूत असल्या तरी त्या मागची तीव्र व्यथा आता समजते. आत्याचे बोल त्या वेळी साधे वाटले. पण आता तिच्यासारख्या रूप, विद्या, गुण, कर्तृत्व या दृष्टीने शेकडो पुरुषांपेक्षा श्रेष्ठ असलेल्या स्त्रीला, ती केवळ स्त्री व त्यातल्या त्यात अविवाहित म्हणून एक प्रकारे सामाजिक दडपणामुळे जो मुका मार सहन करावा लागला त्याची ती साक्षच वाटते. त्यानंतर पन्नास वर्षे उलटली. अविवाहित कर्तबगार स्त्रियांची संख्याही वाढली. तरी समाजाच्या दृष्टीत फारसा फरक पडलेला नाही, हे मलाही भल्या भल्या तार्किकांची अविवाहितपणावरची भाष्ये जी ऐकायला मिळाली आहेत त्या वरून सहज कळून येते. सासुरवाशिणीपेक्षाही सासुरवाशीण होऊन सर्व बाजूंनी केवळ कष्टांचा डोंगर उचलीत, अनेक सहज सुखांचाही त्याग करून, समाजाला आपल्या सच्चारित्र्याची प्रकट ग्वाही देत सीताबाईसारखीला जगावे लागले याची खंत मला होते. नीति–अनीतीचा दारुण संघर्ष तिच्या मनात सतत चालू असावा असे तिच्या एका उद्गारावरून मला वाटते. ती म्हणायची, "आपण चांगलं वाटतं ते कितीही कसोशीने आचरणात आणलं, तरी देवाच्या दृष्टीने ते चांगलं असेल कां ?" अत्यंत क्षुद्र गोष्टीही फार तत्परतेने करण्यात सीताबाईसारख्या स्त्रीची मोलाची शक्ती, चारित्र्यपालनाबद्दल स्त्रीच्या, कुमारीकेच्या संदर्भात समाजाने अनुदार दृष्टी बाळगल्याने वाया गेली असे मला वाटते. हे नैतिक, विशेषतः मानीव नैतिक ताण असे असतात की त्यांच्याबद्दल उघड बोलताही येत नाही, मग त्यांच्याशी मुकाबला करणे तर दूरच राहिले. पक्ष्यावर घारीची सदा दृष्टी, तशीच समाजाची अशा स्त्रियांवर असते. त्यांच्या कपाळावर पतितेचा छाप मारायची खूप उत्सुकता त्याला असते. तो आला नाही तर अशा स्त्रिया 'नीरस' ठरतात. पुरुषाच्या भोगाला ज्या स्त्रिचा उपयोग नसतो, तिला जणू समाजात मानाने जगण्याचा हक्कच नसतो. बुद्धिमती, शीलवान स्त्रिचे स्वतंत्र व्यक्तिमत्त्व हो अत्यंत रक्षणीय नि वांछनीय वस्तू असते. अद्यापही स्त्रियांच्या शिक्षणात नि चारित्र्यसंवर्धनात स्वतंत्र व्यक्तिमत्वाचे तेज हवे तसे उदित झालेले नाही. बहुतेक स्त्रियांची शक्ती नको त्या क्षुद्र गोष्टींशी झगडण्यातच खर्ची पडते.

* * *

राष्ट्रीयतेच्या जाणीवेचा आंतरिक ताण आणि तिच्याबरोबर सरकारी यंत्रणेशी जुळवून घेण्याचा दुसरा ताण यातून एक मानसिक संघर्ष आमच्या पिढीत अनेकांनी अनेक तऱ्हेने भोगलेला आहे. शाळेत त्याचाही प्रत्यय आला. माधव



अनुक्रमणिका



ज्यूलियन यांची 'दोन विभूती' ही कविता प्रथम मला वाटते 'ज्ञानप्रकाशा'त छापून आली होती. आत्याने ती कविता आम्हा वहिणींना दाखवून तिची फार स्तुती केली.

तो ठाकूर रवींद्रनाथ चढला साहित्य सम्राट्पदा
गांधी मोहनदास तो अनुभवो येशूपरी आपदा

या दोन ओळींनी मला मंत्रमुग्ध केले. मी ती कविता लिहून काढून पाठ करून टाकली. त्याच वेळी गांधी फार मोठी शिक्षा होऊन कारागृहात होते. प्रभातफेरीत रोज कुणी तरी म्हणायचे,

'खादि वापरा देश उद्धरा फकिरी देशासाठि करा
कारागृहि गांधी महात्मा सांगुनि गेला मंत्र वरा.
देशाचे ऋण फेडायाला मार्ग असे हा अजि साधा'
इत्यादि.

सावरकरांचे घरच नाशिकला होते. नाशकात त्याच्याबद्दल अतीच भक्ती होती. लोकमान्य टिळक गेल्यानंतर जहाल गटातल्या राजकारण्यांचे प्रीतिस्थान व आशास्थान सावरकरच होते. सावरकरांचे 'कमला' काव्य, त्यांचा सिंहगडचा पोवाडा मला फार आवडत. पोवाडा काकाने नकलून बंगलोरहून पाठवला होता. आक्षिप्त वाङमयात त्याची सरकारने नोंद केल्यामुळे आम्हाला तो गीतेसारखा वाटायचा. सावरकरांच्या कविता मी मुखोद्गत केल्या होत्या. पण पोवाडा त्यात सर्वात सरस वाटायचा. कारण हरि नारायण आपटयांच्या कादंबऱ्यातले शिवाजी–तानाजी–जिजाबाई त्या पोवाडयात सजीव होऊन उठले होते. म्हणूनही तानाजी जिवंतकळेचे वीरप्रतीक ठरला होता. गाऊन आनंद व्यक्त करता येतो त्याप्रमाणेच गाऊन क्षोभ व राष्ट्रक्षोभही व्यक्त करता येतो. हे मी तो पोवाडा गाता–गाता शिकले. देशभक्तीचे रोमँटिक वलय सावरकरांच्या कवितांनी मनात निर्माण केले. **एक महान् रोमँटिक राष्ट्रभक्तीपर कादंबरीच गाण्यांच्या रूपात मनात निनादू लागली.** पण गांधी रोकडे, रुक्ष सत्य घेऊन आले आणि **ही कल्पिताची मोहिनी उतरली.** गांधींची खादी, त्यांचा झाडू, त्यांचा तो केवळ नग्नता झाकण्यापुरताच असलेला पोशाख, स्वतःला भंगी म्हणून घेणे, चित्तरंजनदास, मोतीलाल, टागोर, राजाजी इत्यादि देशभरच्या बुद्धिवंत बलिष्ठांना आपल्या विचारधारेत खुशीने सामील करून घेणे; स्वैपाक करणे, धुणे, भांडी घासणे शुश्रूषा करणे, सुंदर लिहिणे, देवाने दिलेल्या वेळेचा क्षणही फुकट न घालवणे, प्रार्थनेला आणि प्रार्थनेप्रमाणेच विनोदाला जपणे, भारतातल्या सात लाख खेडयांकडे लोकाचे लक्ष वेधणे, प्रिन्स ऑफ वेल्सच्या स्वागतावर जाहीर

बहिष्कार घालणे, प्रतिपक्षाबद्दल लिहिताबोलताना संयमपूर्ण व आदरयुक्त भाषा वापरणे; स्त्रियांना उघडपणे राजकारणात भाग घ्यायला लावणे, थोडक्यात म्हणजे सुशिक्षितांनी वेडगळ मानलेल्या 'अहिंसे'सारख्या वेडगळ गोष्टी मान्य करणे आणि त्या वेडाचा जादूसारखा उपयोग करून भल्या-भल्यांना वेड करणे हे अति झाळम वेडपण गांधींच्या रोजच्या वागण्यातून, करण्यातून आम्ही रोज पाहात होतो. आता आम्ही गांधीमयच झालो होतो.

प्रिन्स ऑफ वेल्स एडवर्ड भारतात आले, त्यावेळी गांधींनी त्यांच्यावर बहिष्कार टाकला हे वर्तमानपत्रात त्या दिवशी आलेच. पण बहिष्काराविषयीच्या वार्ता अगोदर पासूनच येत होत्या. आमच्या नगरच्या शाळेत त्या दिवशी खाऊ आणि चांदीची पदके वाटण्यात येणार होती. आम्ही मुली शाळेच्या आवारात जमलो. आत्याला ब्रिटिश साम्राज्याच्या प्रशस्तीचे, प्रिं युवराजांच्या शुभागमनाच्या संबंधाचे भाषण करावेच लागले. केवळ पाच मिनिटांत तिने हे कृत्य आटपले. तिचा चेहरा सुकला होता. बापुडवाणा झाला होता. आम्हाला खाऊच्या पुड्या दिल्या. पदके दिले. मला आठवते की तो पेडा मी आणि दुसऱ्या काही मुलींनी तिथेच मातीत पायाखाली तुडवला. पदक फेकून दिले. एखाद्या अपवित्र वस्तूच्या विटाळातून सुटल्याचा आनंद क्षणभर झाला. पण मनाला समाधान झाले नाही. घरच्यांची आशाळभूत भेटेना. घरी आल्यावर पाहिले तर आत्या गप्पगप्पच होती. तिच्या उदासिनतेचे कारण स्वतःच्या नाडीवर बोट ठेवून सुद्धा समजत होते. आमच्या व्यथा एकच होत्या.

नगरच्या ख्रिस्ती शाळेत एक गाणे त्यावेळी खूप लोकप्रीय झाले होते.

'प्रभाचे राज्य नांदो हे मंगल हो.
साम्राज्याच्या कांतिसुमाचे
विकसन हो जन सुखि राहो.,,
मंगल हो ; ,, इत्यादि.

मुलींना त्याची चाल आवडे. त्या नेहमी ते गुणगुणत. पण ते गाणे मला चिथवून वाटले आणि त्यावर उतारा म्हणून 'वंदे मातरम्'चे संस्कृत भाषांतर 'वन्दे त्वां देवी मातृभूमिरम्' हे गाणे पाठ करून टाकले. नगरला ख्रिस्ती व मुसलमान समाज मोठा असल्यामुळे राष्ट्रीय उद्रेक तीव्र नव्हता. पण नाशिकला आलो तर वातावरण एकदम तप्त होते.

सावरकर मुक्त झाले त्या दिवशी नाशिकची जनता आनंदात डुंबली. त्या





दिवशी थिएटरात त्यांच्या फोटोचा सत्कार झाला. आत्या स्वत: सरकारी नोकर असल्याने येऊ शकली नाही, परंतु तिने आम्हाला जायला सांगितले. त्या दिवशी मला पुन्हा तिच्यातला तो विषाद फार जाणवला.

एकदा नाशिकलाच गांधींची सभा घाटावर होती. भाषण झाल्यावर कस्तुरबा लोकांत फिरल्या व त्यांनी दागिन्यांची मागणी केली. दागिन्यांचा त्याग केलेल्या त्या सौभाग्यमंडित वृद्धेला नाही म्हणवेना. मी हातातल्या दोन बांगड्या व सर्वांत धाकट्या बहिणीने अंगठी त्यांना दिली. हसून शाबासकी देऊन कस्तुरबा गेल्या. ती शाबासकी आम्हाला धन्यतेची वाटली. इतक्यात तिथे असलेल्या शाळेतल्या एका बाईंना हे कृत्य आवडले नाही. त्यांनी मना केले तरी आम्ही त्यांना जुमानले नाही. त्यांनी घरी येऊन आत्याला सांगितले.

आत्या गप्प होती. बाबा (आमचे आजोबा) काय म्हणतील याची काळजी तिला होती. ती म्हणाली, "जे तुम्ही दिले ते तुमचे नव्हेत. बाबांना विचारून द्यायला पाहिजे होते."

आजोबा म्हणाले "हलवायाच्या घरावर तुळशीपत्र." इथेच सारे थांबले. पण त्या दिवसापासून आपले दागिने नव्हेत हे कळले नि दागिन्यांबद्दल एक प्रकारे उबग आला. जे आपले नाही ते घालेच नये असा विचार बळावत चालला. तेव्हापासून अलंकरणाबद्दलची उदासीनता एक स्वभावधर्मच बनून गेली. आर्थिक स्वातंत्र्याच्या जाणिवेचा पाया या घटनेने पडला.

राष्ट्रीय आंदोलनामुळे झालेल्या द्विधा मन:स्थितीचे एक उदाहरण आठवते. स्काऊटची संस्था जुनी झाली होती. पण गर्ल गाईड मला वाटते तेवीसनंतरच निघाली असावी. निदान नाशिक-नगरच्या नव्याने काढलेल्या मुलींच्या शाळेत गर्ल गाईड सुरू करण्याची कल्पना आमच्या डोळ्यांदेखतच सुरू झाली. प्रथम शिक्षकांना ट्रेनिंग देण्यात आले. माझ्या आत्याला त्या कँपला जावे लागले. ती परत आली ती उदास होऊनच. शाळेत वर्ष उलटायला आले तरी तिने गर्ल गाईड सुरू केले नाही. इन्स्पेक्टरनी जाब विचारला. त्यावर तिने उत्तर दिले की, "कोटकसरीची शिकस्त करूनही मला कपड्यांचा खर्च चाळीस रुपयांवर आला. मुलींची चार आणे फी द्यायला सुद्धा पालक नाखुष असतात. फी भरू न शकणाऱ्या मुली पुष्कळ आहेत. तेव्हा मी मुलींना एवढा खर्च करा, असे कसे सांगू?" थोडे दिवस गेले नि फिरून तगादा सुरू झाला. इन्स्पेक्टरसमोर माझी आत्या म्हणाली, "गर्ल गाईडची शपथ घेताना मुलींना मला असत्य शिकवणे प्राप्त होईल. ते मला नको."

इन्स्पेक्टरनी चमकून विचारले, "कुठले असत्य?"



अनुक्रमणिका

आत्या म्हणाली, 'मी माझ्या राजाशी व देशाशी इमानी राहीन' अशी शपथ घ्यावी लागते. ब्रिटनमध्ये ही शपथ ठीक आहे. पण हिंदुस्थानसारख्या देशात एकतर माणसाला राजाशी तरी एकनिष्ठ राहाता येईल किंवा देशाशी. दोहोंशी एकनिष्ठ राहाता येणार नाही. म्हणून मुलींना जी शपथ मोडण्यासाठीच आहे ती मी कशी घ्यायला लावू?"

हे उत्तर ऐकल्यावर सरकारी गोटात फार क्षोभ माजला. तिच्यावर सरकारची गैरमर्जी झाली. तिच्या प्रमोशनवर गदा आली. या कुचंबणेत वर्षे निघून गेली मुंबईच्या शिक्षणखात्यात आता तिला मुख्य पर्यवेक्षिकेची जागा मिळायची होती. ज्येष्ठतेत तिचा अग्रक्रम होता. तो डावलण्यासाठी सरकारने एक लृप्ती योजली आणि आधीच्या सरकारी नोकरीतल्या शिक्षिकांना समग्रपणे बाजूला सारून श्रीमंत पारशी घराण्यातल्या व विलायतवारी करून आलेल्या नव्याच मिस एमी रुस्तुमजी यांना ती जागा बहुमानाने देऊन टाकली माझ्या आत्याला हा अपमान जाणवल्याशिवाय राहिला नाही.

घरात तिची आजोबांबरोबर बोलणी होत. त्यावरून ती अगोदरच सरकारी नोकरीला फार कंटाळली होती. राष्ट्रीय चळवळीपासून अस्वस्थ झाली होती. साधे पांढरे पातळ आणि पांढरा पोलका हा तिचा पेहराव असे. तो पक्का स्वदेशीच असे.

त्या वेळी माझे वडील बेकार होते. घरातली आर्थिक परिस्थिती तंग होती. त्यामुळे सीताबाईवरच खर्चाची पुष्कळ मदार असे. त्यामुळे नोकरी सोडणेही कठीण होते. एकदा ती अशीच फार अस्वस्थ झालेली असताना आजोबा तिला म्हणाले, "सीता, तू उगीच मनात कुढू नको. सरकारी नोकरी खरंच वाईट असते. तुला त्रास होतो ती नोकरी हवीच कशाला ? तू सोड. आपण दुसरं काही करू."

पण यानंतर ती फार जगलीच नाही. एकोणतीस साली विषमज्वराने ती वारली नि घर पोरके झाले. सीताबाई गेल्यापासून राष्ट्रीय चळवळीत आम्ही सक्रिय रस घेऊ लागलो. कॉंग्रेस हॉस्पिटलमध्ये गोळीबारात, लाठीमारात जखमी झालेल्यांचा सेवाशुश्रूषा करणे, स्वैपाक करणे, पिकेटिंग करणे, सूत–कताई, सभा, मिरवणुका यात आम्ही भाग घेऊ लागलो. सर्वात धाकटी बहीण तुरुंगात गेली. वर्षभर आम्ही कॉलेज पण सोडले होते. ती वेडाच्या झपाटयाची वर्षे अजूनही मंतराच्यासारखी वाटतात. गांधींच्या त्या चळवळीत ज्यांनी काही ना काही भाग घेतला असेल, त्यानांच गांधींच्या राष्ट्रीय प्रेरणेचे हृद्‌गत कळेल. गांधींना या गरीब नि परतंत्र देशाला सर्वात मोठी देणगी दिली, ती देणगी

अस्मितेची आहे. भारतीय राष्ट्राला स्वतःचे राष्ट्रपण आहे ही जाणीव त्यांच्यामुळेच जगभर उत्पन्न झाली. आम्ही गुलाम नाही, तर आम्ही स्वतःची संस्कृती असलेले नागरिक आहोत ही जाणीव त्यांनी राष्ट्रातल्या लहानथोरांना दिली. भारतीयांना भारतीयत्वाची जाणीव त्यांनी दिली. एवढेच नव्हेतर भारत एक राष्ट्र आहे आणि त्या राष्ट्रातला प्रत्येक नागरिक प्रथम भारतीय व नंतर आणखी काही आहे ही ओळख त्यांनी जगालाही करून दिली. जगाच्या विराट राष्ट्र-संसारात गरीब नि परतंत्र भारत ही राष्ट्र म्हणून उभा केला गांधींनीच. याच जाणिवेला अस्मिता म्हणतात. अस्मितेच्या या देणगीसारखी अन्य देणगी कुठलीच असत नाही. भगीरथाने गंगा पृथ्वीवर आणली तशीच अस्मितेची ही विशाल धारा गांधींमुळे शतमुखांनी या देशात वाहू लागली यात शंका नाही.



राष्ट्रीयतेच्या भावनेला दुसरा एक संकुचित अर्थही प्राप्त झालेला होता. तो म्हणजे 'आर्यत्वा'चा अभिमान; ब्राह्मणत्वाचा अभिमान; क्षत्रियत्वाचा अभिमान; सरंजामशाहीचा अभिमान; जातीजातीतला दुराभिमान. हिंदू संस्कृतीच्या नावाने साचत जाणारी थिल्लरे. नाशिकला मुलांच्या शाळेत असतानाची गोष्ट. नकलाकार भोंडे शाळेत आले होते. त्यांच्या कार्यक्रमात त्यांनी एका भिक्षुकाचे विडंबन केले. ते पाहून आम्ही विद्यार्थ्यांनी टाळ्यांचा कडकडाट केला. नक्कल खरेच अप्रतिम होती. सत्यनारायणच्या पूजेचा फार्स होता तो. दुसऱ्या दिवशी पदार्थविज्ञानाचा प्रयोग करते वेळी विज्ञानाचे शिक्षक फार क्रुद्ध होऊन वर्गात शिरले. हे शिकवीत अप्रतिम; पण विज्ञानाचा, आधुनिकतेचा नि आचारांचा प्रत्यक्ष काही संबंध असतो. हे त्यांच्या गावीही नव्हते. मुली शाळेत गेल्या की बिघडतात म्हणून आपल्या मुलीला मराठी शाळा संपल्यावर त्यांनी कायमची घरीच ठेवली. अत्यंत सनातनी असे हे मास्तर होते. वर्गात आल्यावर ते कडाडले, "मॅट्रिकच्या वर्गातले विद्यार्थी तुम्ही; पण तुम्हाला आपल्या संस्कृतीचा जराही अभिमान नाही. याची लाज वाटायला हवी तुम्हाला. सत्यनारायण म्हणजे चेष्टा आहे की काय?" आम्ही गालातल्या गालात हसू लागलो. या कुचेष्टेने ते आणखी संतापले. "लोकमान्य टिळक ज्या संस्कृतीचा आदर करीत तिची तुम्ही चेष्टा करता ? धर्माची चेष्टा करता ? " सर्व मुले मरूपणे बसलेली होती. हे पाहून कालच्या 'टारगट 'पणाबद्दल दिलगिरी कुणी तरी व्यक्त करील ही आशाच त्यांना राहिली नाही. ते जमदग्नीसारखे उसळले. "याला कारण हे भावनाशून्य सुधारक. यांना जात नाही, रीत नाही, लाज नाही. या भागवतलाच

विचारा घरी काय चालतं ते. कुणाच्याही हातचं खातात. खरं की नाही ?"

मी 'हो' म्हणाले.

मास्तर म्हणाले "हो ऽ. हो ऽ. हो ऽ. काही वाटतं तरी का बोलायला. ? समज उद्या तुला भूक लागली तर शेजारच्या महाराच्या घरी जाऊन चटणी-भाकरी आणशील की नाही ? "

आता मलाही अवसान आले. मी म्हटले "सर, महाराची चटणीभाकरी आम्ही खातोच. पण भूक लागलीं तर दुसऱ्याच्या घरची भाकरी मागून आणणार नाही."

"मग काय स्वतः करणार ? तोंड तर पाहा करणारणीचं. घरात नोकरांशिवाय स्वैंपाक होत नाही. मग नोकर नसला की काय करणार ? "

"स्वतः करणार."

मास्तरांनी हेकाटपणाने म्हटले "मला थापा मारू नकोस. मला सांगायचं ते हे की भंग्याच्याघरचं सुद्धा खायला तुम्ही मंडळी कमी करणार नाही."

"भंगी माणसं नव्हेत. ? "

असली तरी वेगळया संस्कृतीची. म्हणूनच भंगी झाली. अशांच्या घरचं खाणं म्हणजे आपल्या भावना घालवून बसणं. भावना नाहीत ते माणूस कसलं ?" इत्यादि.

मास्तरांत नि आमच्यात भरून न येणारी दरी होती, हे तेव्हाच उमगले. थोडयाच वेळात अभ्यास सुरू झाला नि वादळ बाजूला झाले.

* * *

नाशिकच्या हायस्कुलातलीच सहावीत असतानाची गोष्ट. ह्या वेळी सरकारी शाळात संमेलन दरसाल होत नसे. कधी तरी चार-दोन वर्षांनी व्हायचे. पण या वर्षी संमेलन होते. इंग्रजी पाठांतर किंवा काही नाट्यमय भाग निवडण्यात आले. या भागाचे चालकत्व नेने मास्तरांकडे होते. मला त्यांनी एक ग्रीक कथा पाठ म्हणण्यासाठी दिली. एक ग्रीक पुजारीण असते. फार मोठा मान असतो तिला. एकदा एका मंदिरात तिला समारंभासाठी जायचे असते. अंतर खूप होते. त्या दिवशी तिच्या रथाचे घोडे काही कारणाने नव्हते. इतक्या दूर ठरलेल्या वेळात चालत जाणे शक्य नव्हते नि जाणे तर जरूर होते. तिला दोन मुलगे होते. त्या मुलांनी घोडयांऐवजी स्वतःला रथाला जुंपले व आईला ठरल्या वेळात इष्ट स्थळी पोचविले. तिचे काम झाले. समारंभ पार पडला. पण धावून

थकलेले ते मुलगे अतिश्रमाने मरण पावले. मातृभक्तीचे उदाहरण म्हणून मास्तरांनी ही गोष्ट पसंत केली होती. मी ती नकलून घेतली: पाठ करू लागले. पण ती गळी उतरेना. दुसऱ्या दिवशी मी मास्तरांना सांगितले "ही गोष्ट मला पाठ होणार नाहीं. दुसरं काही द्या."

"मी ती उत्कृष्ट गोष्ट म्हणून तुम्हाला दिली. पाठ करायला सोपीच आहे."

"सोपी आहे पण मला तीं म्हणता येणार नाहीं."

"का"

"कारण त्यात मुलांची मातृभक्ती उत्कृष्ट आहे ही गोष्ट खरी. पण त्या गोष्टीत आईचं काळीज नाही. मुलानीं ओढलेल्या गाडीत आई बसेलच कशी ? सर तुम्ही पुरुषाच्या दृष्टीने पाहिलत गोष्टीकडे. आईच्या दृष्टीने पाहिलत नाही. मी मुलगी आहे ना ?"

मास्तर गंभीर झाले. ते म्हणाले "खरं आहे, तुम्हीं म्हणता ते. माझ्या ते लक्षातच आलं नाही. तुमचं हे स्पिरिट मला फार आवडल. ते घालवू नका. मी तुम्हाला दुसरं काम देतो."

पुढे लेडी मॅक्बेथचे स्वागत त्यानी मला दिले. तो भाग मी चांगला वठवला.

* * * *

पुण्याला पाचवीत हुजुरपागेत एक वर्ष होते. तिथली एक घटना सांगण्यासारखी आहे. नगरला माध्यमिक शाळा असल्याने चौथीपुढे वर्ग नव्हते. आमचे बिऱ्हाड मुंबईचा खर्च पेलत नसल्याने एक वर्ष पुण्यास होते. अर्थात मी त्यावेळी पुण्यास आले. जूनमध्ये शाळेत नाव घातले. शाळेतले अभ्यास मार्चमध्ये परीक्षा झाल्यानंतर लगेच सुरू झाले होते. त्यावेळी पाचवीला बीजगणित, भूमिती व पदार्थविज्ञान ही तीन विषय सुरू होत असत, मध्यंतरी शाळेत खंड पडल्यामुळे हे विषय मला येत नव्हते. माझ्या आधीच्या दोन मुली नगरहून हुजुरपागेत गेल्या होत्या. त्या वार्षिक परिक्षेत नापास झाल्या होत्या. तेव्हा मला 'तू चौथीत बस' असे सांगण्यात आले. पण मी 'मला तीन महिन्यांचा अवधी द्या. मी सारे भरून काढते' असे सांगितले व ते मान्य करण्यात आले. आठवड्याच्या परीक्षात मराठी, संस्कृत, इंग्रजी, भूगोल, इतिहास या साऱ्या विषयात मी पहिली, दुसरी अशी आले. त्यामुळे वर्गशिक्षकेला तक्रार करायला जागा नव्हती. गणितात मला पन्नासपैकी पंधरा व पदार्थविज्ञानात सतरा गुण मिळाले होते. या दोन



अनुक्रमणिका

विषयात मी नापास झाले होते. गणिताचे मास्तर शिकवीत तेव्हा वर्गात दरारा असे. छडी लागे छम छम या वृत्तीचे ते होते. मुलींना समजावून सांगण्यापेक्षां टोंचून बोलून घायाळ करणे त्यांना आवडे. गणितात आपली शाळा नामांकित झाली पाहिजे हा त्यांचा दावा होता. वर्गाबाहेरही मुलींना शिकवण्यात ते कसूर करीत नसत. पण चूक कशी ती खपायची नाही. त्यांचे बोलणे फार लागट असे. एका विद्यार्थिनीने तर जीव दिला होता असे मुली सांगत खरे–खोटे देव जाणे. विशेष–करून गरीब घरातल्या मुलीं ते फार टोचीत. मला ते सपाटून बोलले. " डोकं नाही, तर भांडी घासा. बापाचे पैसे खराब करू नका " इत्यादि. मी उठले व म्हटले " सर, शाळा बदलल्यामुळे माझा अभ्यास बुडाला आहे, मी प्रयत्न करते आहे. पुढच्या परीक्षेत असे व्हायचे नाही. " तरी त्यांची सरबत्ती चालूच राहिली. जीव तोडून अभ्यास करीत राहायचे एवढेच माझ्या हातात होते. त्यावेळी अशी मौज झाली की पदार्थविज्ञानाची दुसरी परीक्षा पहिल्या परीक्षे-नंतर पंधराच दिवसांनी आली. मला पन्नासापैकी सत्तेचाळीस गुण मिळाले. विज्ञानशिक्षक म्हणाले, " गेल्या परीक्षेत नापास होणारी ही नवी मुलगी दुसऱ्याच परीक्षेत पहिली येते हा मोठा चमत्कार आहे. भागवत मी तुला शाबासकी देतो. " मास्तरांनी केलेल्या कौतुकाने माझा हुरूप वाढला. गणिताच्या परीक्षेतही मी पास झाले. पण मास्तरांचे बोलणे थांबेना. ' पास झालं म्हणजे काही आकाशाला हात पोचत नाहीत. डोकं लागतं. ' मास्तर अद्वातद्वा बोलू लागले. बोलता बोलता माझा बाप त्यांनी काढला. त्याबरोबर माझाही संयम सुटला. मी उठले नि त्याना म्हणाले " सर, गणितात जी चूक झाली ती माझी; पास होऊन ती मी भरून काढली. माझ्या बापाची अक्कल तुम्ही काढलीत. यात त्यांची काही चूक नाही. पण माझा बाप तुम्ही काढलात, तर मी पण तुम्हाला सांगते की हा अन्याय मी सहन करणार नाही. मी आता तुमचं गणित करणार नाही. वर्गात लक्ष पण देणार नाही. "

मास्तर हादरले. मुली भेदरून गेल्या. मला शाळेतून काढून टाकणार असेच त्यांना वाटले. मास्तर क्षणभर थांबले नि नंतर छद्मीपणाने म्हणाले " वर्गात अभ्यास करणार नाही नि परीक्षेत काय शंख करणार ? "

" माझा अभ्यास मी स्वतंत्र करीन. पेपर तुम्हीं कसाही तपासा. "

मास्तर प्रिन्सिपालबाईंकडे गेले नाहीत. कारण माझा अभ्यास, वर्तणूक चांगली होती नि मला बोलण्यात चूक त्यांचीच होती. पण इतके मात्र खरे की मास्तरांची न्यायबुद्धी चांगलीच असल्यामुळे त्यांनी माझ्याविरुद्ध कारवाई केली नाही. क्षुद्र मनाचा माणूस असता तर तो तेही केल्याशिवाय राहाताना. इतकेच

काय पण यानंतर मास्तरात व माझ्यात एक स्नेहभाव निर्माण झाला. मी वर्गात पुस्तक वाचीत असे. वाटले तर गणिताचा अभ्यास करायची, वाटले तर नाही. पण मास्तर त्यानंतर माझ्याशी हसूनखेळून वागू लागले. मास्तर हसले हा एक चमत्कारच होता.

पुढे वार्षिक परीक्षा आली नि गेली. मुली म्हणाल्या "मास्तरांना तूच विचार मार्कांचे."

मी विचारले "सर, आमच्या पेपराचं काय झालं ?" मास्तर हंसले नि म्हणाले "भागवत, पास आहात बुवा तुम्ही." एकप्रकारे ते अभिनंदनच होते. सहावीत आमचे पुण्याचे बिऱ्हाड मोडून आम्ही मुंबईला आलो. मी नाशिक हायस्कुलात जाऊ लागले.

एकदा पुण्याचे गणित–शिक्षक नाशिकला आले. आमच्या शिक्षकाना विचारू लागले, "भागवतच गणित कसं आहे ?"

"चांगलं आहे की ?"

"त्या शिक्षकाना राहवले नाही. मला गाठून ते म्हणाले." माझ्या हातून सुटलात म्हणून फुशारून जाऊ नका. सहावीत तुम्ही नक्की गणितात नापास होणार"

मी सहावी पास झाले. त्यावेळी पुण्याहून मास्तरांचा खास निरोप आला की "तुम्ही मॅट्रिकमधे नक्की नापास होणार" मी मॅट्रिक पास झाले, तेव्हा निरोप आला की "तुम्ही कॉलेजात पहिल्या वर्षात गणितात नापास झाल्याशिवाय राहात नाही." ही वाणी मात्र फलद्रूप होण्याच्या मार्गावर होती. मी झेवियर कॉलेजात होते. पहिल्या टर्ममधे इन्फ्लुएन्झाने खूप आजारी पडले. खोकला जाईना. आमचे कुटुंब–डॉक्टर म्हणाले, "हिची आई याच वयात फ्लूचं दुखणं क्षयावर गेल्यामुळे गेली. हिला जपा."

महिनाभर मी नाशिकला हवेसाठी गेले व बरी होऊन आले. पण गणिताचा अभ्यास फार पुढे गेला होता. विषय समजेना. वडील व काका यांच्याकडे गणित व विज्ञान मी शिकत होते. पण आत्मविश्वास गेला होता.

त्या वर्षी भरीत भर अशी पडली की कॉलेजात पहिल्या वर्षाच्या प्रश्नपत्रिका व तपासणीचे काम गणिताच्या बाबतीत भारतीय प्राध्यापकाकडून काढून युरोपियन प्राध्यापकांकडे सोपविण्यात आले होते. फादर राफेल हे प्रख्यात गणितज्ञ आमचे परीक्षक होते. ही वार्ता ऐकूनच मुलींचे अवसान गळाले होते. बीजगणिताची प्रश्नपत्रिका पाहिली. शंभर मार्कांच्या बाकीच्या प्रश्नांचा खरा पेपर होता. पण त्यात पस्तीस मार्कांचे एक उदाहरण मुद्दाम विद्यार्थ्यांची परीक्षा

घेण्याकरता ठेवले होते. हा खास प्रश्नच मी पहिल्याने सोडवायला घेतला. तो सोडवताना फार आनंद मला झाला. माझ्या कानात कुणीतरी गुणगुणत सांगत होते की आता असं लिही, तसं लिही म्हणून. हा भास असला तरी तो फार स्फुरण देणारा होता. माझे उत्तर शेवटी कुठे तरी चुकले. बाकीचा पेपर सुद्धा याच धुंद परिस्थितीत मी दिला. पेपरात एक छपाईची चूक राहिली होती. तीही दुरुस्त करून मी पेपर संपवला. परीक्षा झाली तरी गणितात पास होईन याची मुतराम् खात्री नव्हती. मात्र एकाच विषयात गेले तर त्या विषयात पुन्हा परीक्षा घेऊन मला वरच्या वर्गात जायला मिळेल ही आशा होती. मी आमचे मानलेले चुलते प्रा. ग. ना. भागवत होते त्यांना म्हटले, " मी उद्या गावाला जाते आहे. गणितात काय झाले आहे ते विचारून येशील ? म्हणजे बरोबर पुस्तके घेऊन जाते नि परीक्षेचा अभ्यास करते.

रामूकाका परत आला तो तोंडात बोट घालून " काय चमत्कार आहे तरी. फादर राकेल म्हणतो की साऱ्या वर्गात गणिती डोकं असणारी ही एकच मुलगी आहे. छान पास झालीस तू."

माझा जीव भांड्यात पडला. या नंतर पुण्याचे गणित–शिक्षक मला पुण्याला भेटले. ते म्हणाले " भागवत जिकलंत तुम्ही. मी हरलो." मी म्हटले " सर, नाही तुम्हीच जिंकलात. तुम्हाला मूड घ्यायचा असता, तर शाळेतच माझं शिक्षण संपलं असतं. तुमचे शब्द मनात घोळत, म्हणून तर मी अभ्यास मन लावून केला."

* * * *

नाशिकला मॅट्रिकच्या वर्गातली गोष्ट. वर्गशिक्षक उटगीकर सुप्रसिद्ध संस्कृत पंडित, भांडारकर इन्स्टिट्यूटमधले सभापर्वाचे संपादक. फार कडक. काही केलेले त्यांना पसंतच पडायचे नाही. यांचे शब्दचित्र मी 'मास्तर' या मथळ्याखाली दिलेले आहे. मला घडवणारे हे शिक्षक "भावमुद्रा" त्या शब्दचित्रातला म्हणूनच काही भाग इथे फिरून सांगते. प्रिलिम झाली. संस्कृतमधे मला सपाटून मार्क मिळाले होते. पण मास्तर संतापले होते. कारण भाषांतराचा भाग सर्वांचाच कच्चा होता. "वयं जग्मु" लिहिणारी मी होते. संस्कृत भाषांतराचा फारच कंटाळा आम्ही करायचा हे खरे. मास्तर बोलले तेव्हा मी उठले नि त्यांना म्हणाले " सर संस्कृतमध्ये भाषांतर चांगले कसं करायचं हे आम्हाला कुणी अजूनपर्यंत शिकवलंच नाही. आम्ही तरी काय करावं ?" मास्तर चपापले. "खरं आहे तुमचं म्हणणं. सर्व भाषांची ही जननी. पण तिचं शिक्षण फार वाईट दिलं जातं. दोष आमचाच. सारं शिक्षणखातंच या अनास्थेने भरलेलं आहे. पण शिकवलं तर शिकाल ? वेळ थोडा आहे. पंधरा दिवसांचा."



अनुक्रमणिका



मी "जरूर शिकू" असे म्हटले आणि त्यानंतर मास्तरांनी भाषांतर, लेखन, शब्दांचा अचूक वापर याबद्दल अविस्मरणीय असं प्रवचन आम्हाला दिले. माझे संस्कृत खूपच सुधारले. आज माझ्या लिहिण्याच्या शैलीची घडण त्यांच्यामुळेच झाली ही जाणीव मला उशीरा झाली. त्यावेळी मास्तर दिवंगत झाले होते.

नाशिकला काही अचकट-विचकट पत्रे मला शाळेच्या पत्त्यावर यायची. मास्तरांनी मला खूप छेडले. पण त्या प्रकारात माझा हात नाही अशी खात्री होताच मला संरक्षण द्यायला ते धावून आले. ती नॉडपेड पत्रे ते पैसे भरून घेऊ लागले. त्यांना किती भुर्दंड पडला ते त्यांचे त्यानाच माहीत. त्यांची उतराई होणे मला शक्य नाही.

* * *

शिक्षणखात्याने घेतलेल्या काही निर्णयांमुळे विद्यार्थ्यांच्या मनात काही वेळा विलक्षण न्यूनगंड निर्माण होतो आणि तो जन्मभर त्याचा पिच्छा पुरवतो. बाहेरच्या छळावर नियंत्रण आणता येते; पण या आतल्या भयप्रद दटावणीमुळे माणसाचे सारे अवसानच नष्ट झाल्यासारखे होते. कौशल्य आटते. न कळत तो अपराधाच्या भावनेने ग्रासला जातो. माझे असेच झाले. एकोणीसशे चोवीस-पंचवीसच्या सुमाराला मुंबई इलाख्याच्या शिक्षणआयुक्तांनी एक नियम जारी केला. तो असा की इंग्रजी तोपर्यंत 'धावत्या अक्षरात' लिहीत असत, ती धावती लिपी काढून टाकायची; कारण तीन तीन लिप्या वाचताना, विशेषतः हस्ताक्षरात लिहिलेले वाचताना, मुलांचा घोटाळा होतो. छापलेली तुटक लिपी–रोमन लिपी–हीच एक लिपी जारी केली, तर वाचणे–लिहिणे एकाच तऱ्हेचे होईल आणि मुलांची मानसिक व शारीरिक शक्ती वाचेल. सरकारी शाळात हा नियम सक्तीने लागू करण्यात आला होता. प्रथम वर्षभर जरा ढिलाई होती. वर्षानंतर विद्यार्थी व शिक्षक यांना क्षमा नव्हती. आता ज्या वेळी हा बदल अमलात आला त्यावेळी मी इंग्रजी सहावीत म्हणजे मॅट्रिकच्या आधीच्या वर्गात होते. आमचे शिक्षणाचे माध्यम इंग्रजी होते आणि त्या वर्गात अभ्यास भरपूर असे. लहानपणापासून कित्ते गिरवले ते बाळबोध, मोडी नि धावत्या लिपीच्या इंग्रजीचे नि आता हे 'प्रिंट' अक्षर आले. कॉपी गिरवायला वेळ नाही. मुळातलेच अक्षर फारसे चांगळे नव्हते. कारण आजोबांचे अक्षर उत्तम होते, त्यांच्याकडून आम्ही तिघी नाती आपल्या कॉप्या लिहून घेत असू. शाळेची वेळ येईपावेतोपर्यंत कित्ते तसेच ठेवायचे. नि मग आमची ठरवून केलेली रडारड

चालू व्हायची. आजोबा मदतीला आले की आम्ही निश्चित. हे मराठी शाळेत चाले. इंग्रजी शाळेत आल्याच मुख्याध्यापिका असल्याने तिने आमचे 'वंड' मोडून काढले आणि मग आम्ही कॉप्या नीट गिरवू लागलो होतो. अक्षर 'बरे' म्हणण्या इतपत सुधारले होते. पण आता हा नवा प्रसंग गुदरला आणि सुटे प्रिंट अक्षर भराभर नेटके काढता येईना. त्याच्यामागे कुठलीच तपश्चर्या नव्हती. अक्षरात काही अक्षरे धावती येत, काही सुटी. प्रिंट अक्षरे हस्ताक्षरात वाचायची सवय नव्हती. हात व डोळे यांची संगत बसेना. आणि गिरवून शिकस्तीने आत्मसात केलेले 'आपले' अक्षर हरवले असे वाचून मनाला चरका बसला; काही तरी बुद्धांच्या गाभ्यातले हाताच्या कसबातले कायमचे कुणीतरी ओरवाडून काढून फेकून दिले होते. बेवारशी जुने हस्ताक्षर मरायची इच्छा नसताना मरत होते. त्याला अश्रू नव्हती, रूप नव्हते. आता मला त्या जुन्या अक्षराच्या वांका-वळणातले, त्यांच्या गोलवट, लांबट डौलदार आकारातले सौंदर्य प्रतीत झाले. प्रेतमुखावर तेज दिसावे तसे. आता त्या जुन्या लिपीतली जाड-बारीक रेषा केवळ कलावंताने पेलावी तशी भासू लागली. मन मुक्याने रडू लागले. संतापाने आक्रंदू लागले. पण त्या दुःखाला वाचा नव्हती. त्याचवेळी शिक्षण-खात्याने केलेला दुसरा एक असाच आमची वर्षे नि मेहनत निष्कारण वाया घालवलेला नियम जाणवला. तो म्हणजे मोडीला बंदी. मराठी शाळेतली ती वर्षे वाया गेली होती. मोडी शिकून, मोडी वाचताही आता येत नव्हते. मराठीची ती लघुलिपी अशीच मनात कुढत होती. तीही बेघर होऊन विजनात भटकत होती. मनात आले, असे का? जे केले त्याचे चीज नाही नि पुढे आहे ते नीट करायला वेळ नि शक्ती नाही. शाळेत आता रोज रोज हस्ताक्षराबद्दल टोमणे ऐकून घ्यावे लागत. मन सतत खट्टू व्हायचे. पण मास्तर तरी काय करणार? वाईट अक्षराला कुणीही वाईटच म्हणणार. मग मनही स्वतःला म्हणू लागले, "तुझे अक्षर मुळात वाईटच होते. ते कधी सुधारणार नाही. मेहनत कर. थोडे तरी दुसऱ्याचे कष्ट वाचताना कमी होतील." आणि काय नवल? इंग्रजीच्या बाबतीत अक्षराची झालेली धमरण मराठी अक्षरातही शिरली. मराठीचे वळण बरे होते तेही बिघडून गेले आणि माझे मन अपराधाने शरमिंदे झाले. बाकीच्यांची अक्षरे इतकी वाईट नव्हती. माझेच असे झाले. त्या अर्थी आपली लायकीच मुळात नाही. डॉइंग आपल्याला अवगत झाले नाही; अक्षरे काढणं चित्रकलेचाच एक भाग; तोही आपल्याला जमायचा नाही, असे मनाने पक्के घेतले. पण शाळेत रोज रोज लिहावे लागे आणि अक्षर नीट काढण्यात सारे मन लागल्याने बाकीचे धरून ठेवण्याचे विचार निसटून जात. आतापर्यंत अभ्यास मला फार आवडत असे;



अनुक्रमणिका



पण आता ती एक भयप्रद क्रिया झाली, नव्या अक्षर-नियमाने एक काटेरी कुंपण माझ्याभोवती निर्माण केले. त्यातून सटकायला पळवाट नव्हती; मन पळवाटा धुंडू लागले. अखेर एक पळवाट सापडली. वाचणे आता खूप वाढले होते. मिळेल ते इंग्रजी पुस्तक वाचीत होते; समजता न समजता. वाचणे ही फॅशन नसून ती स्वतःला झोडपून काढून अक्षराच्या बाबतीतल्या त्रुटीबद्दल स्वतःच स्वतःला शिक्षा करून घेण्याच्या समाधानाचा दैनिक विधी होत चालला होता. त्याच सुमाराला चित्तरंजन दास वारले. मन फार पोळले. जणू काही वोयट अक्षराचा हातोडा मारून मीच त्यांना मारले, इतका आपल्या निष्क्रियतेचा उबग मला आला. विफलता ग्रासून टाकू लागली, आणि त्याच सुमाराला, The Gospal of the Buddha हे पॉल कॅरसचे पुस्तक मी वाचले; धर्मानंद कोसंबींचे 'बुद्ध, धर्म आणि संघ' हे पुस्तकही वाचले तापल्या दुखावर साय धरावी, तसा या वाचनाचा परिणाम झाला. अक्षराचे शल्य आत आत दडले. वरती समाधान आले. शाळेच्या प्रगती पुस्तकात स्वतः वाचलेल्या पुस्तकांची नोंद करावी लागे, विवेकानंदांचे चरित्र व ही पुस्तके मी लिहिलेली पाहून आमचे वर्गशिक्षक चमकले. "भागवत भिक्षुणी भिक्षुणी व्हायचा विचार करताहात का? करू नका. लग्न करा," असा सल्ला त्यांनी मला दिला. आत्या अविवाहीत होती त्यामुळे तर त्याना अधिकच चिंता वाटली. मास्तरांचे बोलणे मी ऐकले न ऐकल्यासारखे केले. कारण लग्नाचा विषय अजून दूर होता. जकळचा टप्पा, शिक्षण, त्यानंतर देशाचे स्वातंत्र्य वगैरे वगैरे. या वाचनानंतर अक्षराबद्दल मला एक उपाय सुचला. अक्षर सुटे सुटे काढावे म्हणजे वाचणाराला अडचण व्हायची नाही. हा प्रयोग बराच सफळ झाला. याचा प्रत्यय दोन प्रसंगी आला. नाशिक हायस्कुलात आमचे भूगोलाचे शिक्षक नेने फार कडक परंतु अतिशय उत्तम शिक्षक होते. इंग्रजी उत्तम, आणि, मानवी भुगोलावर अपार प्रेम होते त्यांचे. नकाशे काढण्याची कला त्यानीच शिकवली. आकाशाचे निरीक्षण, भौगोलिक परिस्थितीचे निरीक्षण हे त्यानी असे काहीं शिकविले की निसर्ग व मानव यांच्यातल्या अतूटपणाचा प्रत्यय मला त्यावेळी नकळत आला. आजच्या माझ्या लेखनातल्या प्रेरणांचा उगम नेने मास्तरांच्या त्या विश्वविशाल भूगोलाच्या शिक्षणातच आहे. पुष्कळ वर्षांनी हे कळले. नेने मास्तर पुण्यास स्थाईक झाले. तीनचार वर्षांपूर्वी त्यांना भेटून मी कृतज्ञता व्यक्त केली. ते म्हणाले "पुष्कळांना शिकवलं. पण तूच एक वेगळी निघालीस." मास्तरांना मी हे सांगितले त्याने माझे मन तुडुंब आनंदाने भरून गेले. पण मी वेगळी का झाले याचे गुपित मात्र मी त्यांना सांगितले नाही; वाईट अक्षरावरचा उतारा म्हणजेच इतर क्षेत्रात गती मिळविणे हा होता; त्याशिवाय गत्यंतरच नव्हते.



अनुक्रमणिका



एकदा आठवड्याच्या परीक्षेत भूगोलाचा पेपर होता. परीक्षक नेने मास्तरच होते. लिहिलेल्या प्रश्नांचा उलगडा सूक्ष्मपणे, गंभीपणे नि खोचकपणे ते करीत. त्या पेपरात मला पन्नासा पैकी बेचाळीस गुण पडले होते. माझा पेपर हाती घेऊन ते इंग्रजीत म्हणाले, " सर्व पेपरात हस्ताक्षराच्या बाबतीत मिस भागवतचे मी अभिनंदन करतो. " हे वाक्य ऐकले आणि माझे अवसान गळाले. आपल्या भिकार अक्षराला हा टोला आहे असे मला वाटले. मी लगबगीने उठले नि म्हणाले " सर, माझे अक्षर फार वाईट आहे हे मला माहीत आहे. सुधारण्याचा प्रयत्न करते पण जुळत नाही." मी अपराधी भावनेने काळवंडून गेले होते. पण मास्तरांनी मला खाली बसण्यास सांगितले. ते म्हणाले " मी टोचून बोललो नाही तुमचे अक्षर घोटलेले नि वळणदार नाही हे खरे आहे. पण ते फार स्वच्छ आहे, सुटे सुटे लिहिलेले आहे. त्यात डाग नाहीत. खोडाखोड नाही. लेखन असेच हवे. म्हणूनच मी त्याला सर्वात चांगले म्हटले. " मी सुटकेचा नि:श्वास टाकला. पण आपले अक्षर चांगले आहे याच्यावर माझा विश्वास बसला नाही.

दुसरा प्रसंग कॉलेजातल्या पहिल्या वर्गाच्या वार्षिक परीक्षेच्या वेळचा. पदार्थविज्ञानाचे जर्नल आमचे प्रिन्सिपॉल फादर ड्यूर हे पहात होते. माझा प्रयोग संपला होता. मी जर्नलमध्ये तो लिहून काढीत होते. माझा मजकूर लिहून होताच त्यांनी जर्नल हातात घेतले आणि ते उद्गारले. " Oh Child, what a beautiful handwriting this is. " ( मुली किती सुंदर हस्ताक्षर आहे हे.) त्या वेळीही मला हे शब्द प्रथम छद्मीच वाटले नि मी घाईघाईने म्हटले " माझे अक्षर फार वाईट आहे. " फादर ड्यूर म्हणाले " नाही. सर्व जर्नल कसे छान लिहिले आहे;" आणि इतर विद्यार्थ्यांना उद्देशून ते म्हणाले " हा आदर्श तुम्ही पुढे ठेवा. " फिरून माझे अभिनंदन करून ते निघून गेले आणि मी आश्चर्यात बुडून गेले. अपराधी मन वर डोके काढीतच होते. तेव्हा त्यांचे बोलणे एक गोड आघात आहे असे समजून मी तो प्रसंग अडगळीत फेकून दिला. पुढे बरीच वर्षे लोटली. सत्तेचाळीस साली मी मिठापूरला माझ्या काकाच्याकडे गेले होते. तिथे खूप आजारी पडले. दुखण्यातून बरी होत असताना काकांच्या कपाटातली पुस्तके मी काढली. त्यात एक इंग्रजी निबंधाचे पुस्तक होते. त्या लेखकाचे नाव मला आठवत नाही नि पुस्तकाचे नावही आठवत नाही. लेखक आयरिश असून त्याचे लंडनमधे एक साप्ताहिक होते. डॉ. क्रॉनिनची ' सिटॅडेल ' ही वैद्यकीय जीवनावर लिहिलेली स्फोटक कादंबरी प्रथम याच साप्ताहिकातून क्रमशः प्रसिद्ध झाली आणि तिचे प्रथम प्रकाशन ही

याच संपादकाने केले. त्या पुस्तकातले दोन लेख आठवतात. एकात मॅडम मॉंटेसरीच्या शिक्षणपद्धतीची चेष्टा केलेली असून वर्ट्रॉण्ड रसेलने काढलेल्या शिशु शाळेची प्रशस्ती होती. दुसरा लेख माझ्या दृष्टीने फार महत्त्वाचा ठरावा. त्या लेखात लेखकाने म्हटले होते की, " गेल्या पंचवीस वर्षांत इंग्लंडच्या नव्या पिढीत कुणाचेही चांगले हस्ताक्षर मी पाहिलेले नाही. मागच्या पिढीपर्यंत अक्षर घोटलेले, सुवाच्य व सुंदर असे. सुंदर अक्षर असणे हे प्रतिष्ठेचे चिन्ह मानले जात असे. पण आता ते राहिलेले नाही. याचे कारण टाइपरायटरचा वाढता उपयोग हे नसून इंग्लंडच्या शिक्षणखात्यातला मोठा प्रमाद आहे. एक सामान्य बुद्धीचा इन्स्पेक्टर शिक्षणखात्यात होता. त्याला डायरेक्टर होण्याची हाव लागली होती आणि जमेची बाजू कमी असल्याने एवढी वढती नि तीही अल्प काळात मिळणे कठीण होते. त्याने एक क्लृप्ती काढली. मुलांना चार लिप्या शिकण्यास त्रास होतो, तो कमी करावा आणि मुलांच्यावरचा मानसिक ताण कमी व्हावा म्हणून त्याने धावत्या अलंकारिक लिपीऐवजी छापील पुस्तकातली लिपी वापरावी अशी योजना तयार केली आणि वशिले जोडीत जोडीत त्याने मंत्र्यापर्यंत ती नेली. शिक्षण क्षेत्रात बुद्धिमत्ता नेताचीच आणि प्राथमिक शिक्षणाकडे लक्ष देताचेच असल्यामुळे एक अभिनव प्रयोग व उपक्रम म्हणून या योजनेला शिक्षणखात्याने अग्रक्रम दिला आणि इन्स्पेक्टरसाहेब डायरेक्टरपदी चढले. या नव्या उपक्रमामुळे जुनी लिपी लिहिणाऱ्या मुलांच्या डोकीत गोंधळ निर्माण तर झालाच, पण नव्या मुलांना धावत्या लिपीचा परिचयही घडला नाही. याच्याबरोबर कॉपी लिहिणे वगैरे प्रकारही उतरणीस लागले. सुंदर हस्तक्षर असणे अगत्याचे आहे, ही जाणीवच नष्ट झाली. इंग्लंडने हस्तक्षर गमावले ते कायमचे. यात युवकांचा दोष नाही. दोष आहे तो आमच्या शिक्षणपद्धतीचा. हे वाचले नि वर्षानुवर्षांचा भार डोकीवरचा उतरला. कुणा देवदूताने स्वर्गातून खाली येऊन आपल्याला शापमुक्त केले असे वाटले. कोंडमारा थांबला. आपल्या लिहिण्यासंबंधीचो अपराधी भावना आता न्यूनगंडात रूपांतर पावली होती. तो गंड आता फुटला. कारण आमच्या अक्षराची अशी पद्धतशीर वाट लावणारी चुकीची पद्धत शिक्षणक्षेत्रात इंग्लंडातून धोपटमार्गाने भारतात आयात झाली आणि तिच्याबद्दल इथल्या शिक्षण-तज्ज्ञ म्हणविणाऱ्यांनीही काहीच प्रतिक्रिया व्यक्त केली नाही आणि ती आमच्या बोकांडी बसली. साथीचे बळी आम्ही झालो, हे आता स्वच्छपणे उमगले. अपराधाचा गंड गेला पण न्यूनाची भावना मात्र गेली नाही.



अनुक्रमणिका

# व्यक्ति आणि विचार

## एका इंग्रजाच्या शब्दात सावरकर

अनुवादक : वि. श्री. जोशी

या शतकाच्या सुरुवातीला भारतीय स्वातंत्र्यासाठी क्रांतिकारक आंदोलन चालविताना प्रकट झालेले स्वातंत्र्यवीर सावरकरांचं व्यक्तिमत्व इतकं उत्कट आणि प्रभावी होत की, ज्यांच्याशी त्यांनी एकदा हस्तांदोलन केल असे काही इग्रज तरुणही त्यांच्या भजनी लागले. त्यातच आजचे प्रख्यात इंग्रज कादंबरीकार आणि लेखक डेव्हिड गार्नेट यांचा समावेश होतो. त्यांनी पुढे चाळीस वर्षांनंतर "दि गोल्डन एको" या नावाच आपलं आत्मचरित्र लिहिल. त्यात चाळीस पानांच्या एका स्वतंत्र प्रकरणात सावरकरांच्या प्रभावाने आपण कसे भारले गेलो होतो आणि त्यामुळे त्यांच्या क्रांतिकारक उलाढालीतही आपण त्यांना कसे साहाय्य केले, त्याचप्रमाणे त्यांच्या सुटकेचाही कसा धाडसी प्रयत्न केला ते सविस्तरपणे सांगितले. त्या वेळीच हा सर्व वाचनीय वृत्तांत बाहेर आला.

गार्नेट यांचे घराणेच क्रांतिकारकांविषयी सहानुभूती वाळणारे होते. लेनिनच्या नेतृत्वाखाली त्या वेळेला युरोपात लढणाऱ्या रशियन क्रांतिकारकांशी त्यांच्या घनिष्ट संबंध होता. त्याचप्रमाणे, सावकरांच्या नेतृत्वाखालच्या हिंदी क्रांतिकारकांशी त्यांची दृढ मैत्री होती. " David Garnett's inheritence as a rebet, nearly landed him in serious trouble when he planned the esclpe of a wellknown Indian Nationalist leader from Brixton prison. " ("एका प्रख्यात हिंदी राष्ट्रभक्ताची ब्रिक्स्टनच्या तुरुंगातून सुटका करण्याची डेव्हिड गार्नेट यांनी जेव्हा योजना आखली, तेव्हा ते जवळजवळ गंभीर संकटात सापडले होते.") असे त्याचे वर्णन इंग्रज लोक आजही करतात. गार्नेट हे एच. जी. वेल्ससारख्या उच्चपदस्थ इंग्रजांत वावरणारे. त्यांनी स्वतः बऱ्याच कादंबऱ्या संपादित पत्रव्यवहार इ. पुस्तके लिहिली आहेत. त्यांच्या प्रस्तुतच्या निवेदनात शामजी कृष्णा वर्मा आणि चतुर्भुज अमीन यांचा महाराष्ट्रीय म्हणून उल्लेख करणारी विधानं चुकीची आहेत. त्यांच्या इतर वृत्तांतात सावरकरांच्या आयुष्यातील काही घटनांवर नवा प्रकाश पडला आहे. सावरकरांच्या प्रभावळीतील क्रांतिकारकांची त्यांची शब्दचित्रेही वाचनीय आहेत.



अनुक्रमणिका



या लेखनामुळे स्वत: सावरकरांची स्मृतीही जागृत झाली होती. त्याचं पुस्तक वाचल्यावर मी गार्नेट यांच्याशी पत्रव्यवहारही केला आणि काही गोष्टींचा उलगडा करून घेतला. गार्नेट आता ८० वर्षांचे आहेत आणि अजून लिहीत आहेत. गार्नेट यांच्याच शब्दात त्याचा हा वृत्तांत वाचा .

ते म्हणतात, लंडन टयुटोरियल कॉलेजच्या तीनचार विद्यार्थ्यांच्या एका वर्गात एक सावळया वर्णाचा तरूण मी प्रथम पाहिला. तो म्हणाला " मी बंगाली आहे." मी त्याला हॅंपस्टेड येथे चहाला बोलाविले, पण मला सर्दी झाली आहे असे पत्र धाडून त्याने मलाच " १४० सिवलेअर रोड येथे चहाला बोलाविले " [1] मी तिथे गेलो तेव्हां दत्त आणि दोन तरुण मला दिसले. निरंजन पाल आणि आशुतोष मित्र. निरंजन किंवा जानु या नावाने त्याला (सर्व हाक मारत.) माझ्याच वयाचा एक देखणा आणि मोहक रीतीभातीचा युवक होता.' एक लहानसे राष्ट्रीय नेते ?' असलेल्या विपिनचंद्र ( पाल ) या वृद्ध गृहस्थांचा तो मुलगा होता. याचं हिंदी " दहशतवाद्यांविषयी ' असं मत होतं की, ते क्षुद्र गोष्टींच्या मागे लागलेले आहेत. टयुटोरिअल कॉलजमध्ये मी आणखी एका हिंदी विद्यार्थ्याला भेटलो. त्याचे नाव राव. या हिंदु तरुणाशी गाठ पडल्यानंतर लवकरच शाकुंतल, भगवद्गीता आणि मला मिळूं शकणारी महाभारत आणि रामायण यांची कोणतीही भाषांतरे वाचण्यासाठी त्यानं माझे मन वळवले. उपनिषदे मी वरवर चाळली. एक दिवस दत्त[2] जेव्हां हॅंपस्टेड येथे माझ्याकडे चहाला आला, तेव्हा एक वृद्ध महाराष्ट्रीय गृहस्थ कृष्णवर्मा जे -पॅरीस येथे राजकीय निर्वासित म्हणून सुरक्षिततेसाठी राहात होते त्यांच्या ' इंडिया हाऊस ' नावाच्या हायगेटमधल्या निवासात राहणाऱ्या काही मित्रांना भेटण्यासाठी मला नेण्याची इच्छा त्यानं प्रकट केली.

' ज्युबिली क्रेसंट ' मधल्या रस्त्यापासून आत असणाऱ्या त्या शांत निवासात आम्ही पोचलो, तेव्हां काळोख पडला होता. दत्त यानं घराच्या आवाराचे फाटक उघडले आणि बागेत उभ्या असलेल्या एका माणसाने आम्हाला अभिवादन केले. त्याच्यावर विश्वास नसल्याने, तो आतल्या बैठकीला असू नये म्हणून त्याला इथे उभे करण्यात आले आहे असे दत्त यांने नंतर मला सांगितले.[3]

---

१. हे कै. निरंजन पाल यांचे लंडनमधले निवासस्थान होते.

२. सुखसागर दत्त सावरकरांनी माझी ' जन्मठेप ' मध्ये उल्लेखिलेल्या उल्हासकर दत्त यांचे हे बंधू. पुढे लंडनला राहिले. पाच-सात वर्षांपूर्वी ते दिवंगत झाले.

३. हा ' इंडिया हाऊस ' मध्ये तळ देऊन राहिलेला गुप्त पोलिसांचा हस्तक कीर्तीकर असावा. (या नावाने त्याला सर्व हाक मारीत)





अनुक्रमणिका

त्या निवासात तीसएक तरुण होते. माझ्या आगमनाचे त्यांना थोडे आश्चर्य वाटले. जानू पुढे आला आणि त्याने माझे स्वागत केले. त्याने विनायक दामोदर सावरकर या तरुणाला थांबविले आणि माझी त्याच्याशी ओळख करून दिली. तो लहान आणि किरकोळ बांध्याचा होता. त्याची गालाची हाडे अतिशय रुंद होती. नाक बाकदार आणि नाजूक, मुखमंडळ भावनोत्कट आणि तरतरीत आणि त्याचा वर्ण अत्यंत गोरापान होता. कपाळावर आणि गालाच्या हाडांवर तो हस्तिदंता-इतका गोरापान होता. गालावर मात्र तो काहीसा कमी शुभ्र कांतीचा होता.

आमच्या आगमनानंतर आम्ही लवकरच भोजनाच्या दालनात गेलो आणि जमलेल्या मंडळीपुढे प्रथम हिंदीत भाषण करून सावरकरांना उभं राहून कांहीतरी मोठ्यानं वाचण्याला प्रारंभ केला. ते काय बोलत होते ते मला कळत नव्हतं. मीं त्यांच्याकडे विशेष लक्ष न देता खोलीतच इकडेतिकडे पाहू लागलो त्या कृष्ण-वर्णाच्या मंडळींपैकी काहीजण एका लांब टेबलाशी बसले होते. दुसरे भिंतीला टेकून उभे होते. पण सर्वजण वक्त्याचा खणखणीत आवाज लक्षपूर्वक ऐकत होते. तो सारा देखावाच मोठा विचित्र होता. दत्त आणि मित्र यांच्यासमवेत ते हिंदी आहेत आणि मी इंग्लिशमन आहे हे मी विसरू शकत असे. पण या बैठकीत मात्र मला एकाकी वाटलं! माझा वंश आणि वर्ग यांच्यामुळे या कृष्णवर्णीय मंडळीत आणि माझ्यात खरोखरच एक, दरी निर्माण केली होती. पण या अंतराच्या जाणी-वेने मी हतबुद्ध झालो नाही; उलट त्या देखाव्यामुळे निर्माण झालेल्या स्वातं-त्र्याच्या वाऱ्यामुळे मी आनंदित झालो. या मंडळीत मी आपला आत्मा शोधू शकत होतो. मला लज्जित झाल्यासारखं वाटण्याचा प्रश्नच नव्हता. मी एका दिव्य आनंदाने भारला गेलो होतो. हा एक नवाच अनुभव मी घेत होतो.

ते किती विचित्र दिसत होते. माझ्या जवळच असणाऱ्या एका वयस्कर गृह-स्थान दाढी राखलेली होती. आणि फेल्ट कॅप घातलेली होती. दुसरे कित्येक शिरो-भूषणाविनाच होते. त्यांचे वळवळलेले कुरळे काळे केस आणि काळे डोळे; त्यांच्यापैकी काहीजण भित्किलपणे आणि जीवनानंदानं ओसंडणारे; दुसरे शुष्क काळ्या ऑलिव्हप्रमाणे भासले. काहीजण नाजूक अवयवांचे, दुसरे धडधाकट, जाडजूड ओठांचे असे होते.

आणि मग मी सावरकरांकडे पाहिलं आणि मला वाटलं, की त्या-खोलीत त्यांचीच मुद्रा सर्वात अधिक भावनाप्रधान आणि तरीही सर्वात अधिक सामर्थ्यशाली होती. आवेशपूर्ण हावभावांनी ते कसे शब्दामागून शब्द बाहेर फेकत होते, ते मी पाहिलं आणि त्यांच्याकडे पाहता पाहतांच मग माझ्या लक्षात आलं की, वस्तुतः ते इंग्रजीतच मोठ्याने बोलत आहेत, हिंदुस्थानीत नव्हे. त्यांचे

शब्दोच्चार आणि त्याच्या खणखणीत वक्तृत्वाची एक न्यारीच लयबद्धता यांनी माझी फसवणूक केली होती. किती अनवधानी मूर्ख मी! पण तरीही जो शीघ्र मला लागला त्यामुळेच एक प्रकारचं हायसं वाटलं मला! मी मग लक्षपूर्वक ऐकू लागलो आणि इंग्रज सेनेने आणि शिखांनी एक हिंदी सेनापती तात्या टोपे यांचा ज्या लढाईत पराभव केलेला होता, अशा एका लढाईचाच वृत्तांत ते वाचत होते, हे लागलीच माझ्या लक्षात आले.

पुढे थोडयाच महिन्यात गुप्तपणे छापल्या गेलेल्या "दि इंडियन वॉर ऑफ इंडिपेंडन्स ऑफ 1857" बाय ॲन इंडियन नॅशनॅलिस्ट, या त्यांच्या अतीव प्रचारकी तिहासाच्या ग्रंथाचे एक प्रकरणच ते तारस्वरात वाचत होते, हे मला त्या वेळी अर्थातच माहीत नव्हतं. जेव्हा त्यानी ते प्रकरण संपवलं, तेव्हा जमलेल्या मंडळींपैकी बरेचसे शेजारच्या एका खोलीत गेले आणि कुणीतरी हिंदी सगीताची एक ध्वनिमुद्रिका तिथे लावली ..

आणखी काही ध्वनिमुद्रिका लावल्या गेल्यावर दत्त मला म्हणाला की, त्यापुढची ध्वनिमुद्रिका 'वंदे मातरम्' ही होती. त्या वेळेला ते गाणं जप्त झालेले होतं.[१] त्यानंतर 'फेझ कॅप' घातलेला तो तरुण आला आणि टिंगलीच्या स्वरात मला उद्देशून म्हणाला, "कॉक ऑफ दि नार्थ ही मुद्रिका लावली पाहिजे, कारण आपलं रानटी संगीत या पाहुण्यांना कसं आवडेल? त्याच नाव A. A. होतं.[२]

मला हे असह्य झालं आणि जवळच्याच एका उंचनिंच शरीरयष्टीच्या अत्यंत उदासीन मुद्रेच्या तरुणाला मी तसं म्हटलं. तो दाराजवळच्या खांबाला टेकून उभा होता. काहीही उत्तर न देता तो ध्वनियंत्राजवळ गेला आणि ती ध्वनिमुद्रिका थांबवून त्याने एक हिंदी ध्वनिमुद्रिका लावली. मी त्याचे आभार मानले.

---

१. गार्नेट यांचे हे विधान खरे नाही. फक्त त्या शब्दांच्या जयघोषाला बंगाल आणि महाराष्ट्रात नाशिकसारख्या ठिकाणी बंदी झाली होती. ते घोष केले म्हणून काहींना शिक्षाही झाल्या होत्या.

२. A. A. म्हणजे असफअली असं मला वाटलं होत. पण पत्रात मी हे खरं काय असं विचारता गार्नेट यांनी ती अद्याक्षरे V. V. S Ayer यांच्यासाठी वापरली होती असं म्हटलं. मग A. A. कशी असं विचारताच मात्र, हे थोडं चुकलं होतं, पण A. A. म्हणजे अय्यरच असं त्यांनी कळवलं.

तो फक्त हसला आणि आपल्या जागेवर जाऊन पुन्हा भिंतीला टेकून उभा राहिला.[1]

इतक्यात सावरकर आत आले. माझ्याशी काही बोलले आणि मग त्या गायनात सहभागी झाले. लवकरच A. A. पुढे आला आणि लुच्च्या मनुष्याच्या मुद्रेने माझ्याशी बोलू लागला. त्याने माझी चेष्टा सुरू करताच, आपण तामिळ आहोत असं त्याने म्हटल्यावर, हिंदी वाङ्मयाच्या बळावर मी बाजू त्याच्याच अंगावर उलटवू शकलो. मी त्याला म्हणालो, "तुम्ही तामिळी लोक रामाचा सहाय्यक असणाऱ्या हनुमानाचे वंशज नाही काय? तुझ्या कुचेष्टाचेच्या संभाषणावरूनही तुझ्या या वानरवंशातल्या जन्माचा पडताळा मी देऊं शकतो." यावर सभोवताली हशांचा हलकल्लोळ उडाला आणि A. A. पुन्हा माझ्या वाटेला गेला नाही!

'इंडिया हाऊस'ला दिलेल्या या भेटीने दुसरी एक ठेंगणी, लठ्ठ काळी, बटबटीत डोळ्यांची, आखूड आणि बऱ्याच आंगठ्या घातलेल्या बोटांची व्यक्ती मला दिसली. ती विशेष हवीहवीशी वाटणारी व्यक्ती नसावी असं ती दिसताच मला वाटलं आणि ते खरं ठरलं. सावरकरांप्रमाणे तोही महाराष्ट्रीय होता. पण तो पोलिसांचा हस्तक होता ही गोष्ट पुढे बाहेर आली.[2] नंतर थोड्याच वेळात मी हॅवर्स्टॉक हीलला परतलो. मीच शोधून काढलेल्या एका नव्या जगात मी प्रवेश केला होता!

एक दिवस सकाळी वृत्तपत्राचा अंक उघडताच इंपिरियल इन्स्टिटयूटमध्ये हिंदी विद्यार्थ्यांच्या सायंकाळच्या सभेच्या वेळी सर कर्झन वायली याचा एका हिंदी तरुणाने-धिंग्राने-वध केल्याचे मी वाचलं. वधकरी आणि त्याचे लक्ष्य यामध्ये पडलेला एक पारशी डॉक्टरही मारला गेला होता. वधानंतर आत्महत्या करण्यापूर्वीच धिंग्रांना पकडण्यात आले होते. धिंग्रा या नावावरून माझ्या काहीच ध्यानात येईना. पण माझ्या परिचितांपैकी कुणी त्यात अडकलेले असतील हे अगदी शक्य आहे असं मला वाटलं. कर्झन वायली हाच लॉर्ड कर्झन असेही त्या विद्यार्थ्याला वाटणे असले शक्य आहे काय?

एडवर्ड (गार्नेट यांचे वडील) एकाएकी हातात वृत्तपत्राचा अंक घेऊन

---

१. हा तरुण म्हणजे मदनलाल धिंग्रा होत. तसा संदर्भ गार्नेट यांनीच पुढे दिला आहे.

२. हा 'इंडिया हाऊस' मधला आचार्य चतुर्भुज अमीन होता. त्याला महाराष्ट्रीय म्हणण्यात गार्नेट यांचीच चूक झाली आहे. तो होता गुजराथी.

भकास आणि भयभीत मुद्रेनं माझ्याजवळ आले. त्यानी विचारलं, "धिंग्रांची आणि तुझी ओळख आहे काय ? तुझा तो मित्र आहे काय ? त्याच्याविषयी किंवा वधाविषयी तुला काही माहिती आहे काय ? ..." मी खरं होतं ते सांगितलं की, मी धिंग्रा हे नांव पूर्वी कधीच ऐकलं नव्हतं आणि मला त्याच्याविषयी काहीही माहिती नव्हती. त्याच दिवशी दुपारी मी लंडनला गेलो, दत्त आणि मित्र यांना भेटताचं सर्व गोष्टी मला कळल्या. धिंग्रा म्हणजे 'इंडिया हाउस' मध्ये त्या दिवशी ध्वनिमुद्रिका थांबवणाराच तरुण होय ! मित्र त्या वधातल्या मूर्खपणाविषयी फार संतापला होता. नानु हा 'इंडिया हाउस'मधे जाणारा म्हणून विपिनचंद्र पाल फार घाबरलेले आणि रागावले होते.[1] दत्त मात्र शांत आणि वस्तुस्थिती ओळखणारा दिसला. तिघांचाही धिंग्राशी निकट परिचय नव्हता ! सावरकर आणि इतर काही त्याचे मित्र होते !

या वधाचा एक परिणाम म्हणजे 'इंडिया हाऊस' बंद होऊन त्यात राहणारे तरुण पांगून गेले. दंडाधिकाऱ्यापुढे येताच एक वक्तव्य वाचण्याची आपल्याला मुभा असावी अशीही धिंग्रांनीं मागणी केली. ती नाकारण्यांत आली. मी यानंतर लवकरच सावरकरांना भेटलो. त्यानी धिंग्रांच्या वक्तव्याची एक प्रत दिली आणि ते प्रसिद्ध करण्याची व्यवस्था मी करू शकेन काय ? अशी पृच्छा केली. ते सोप होतं. माझ्या पहिल्या आणि एकुलता एक गौप्यस्फोटक पराक्रम 'डेली न्यूज' या वृत्तपत्रांत असणाऱ्या रॉबर्ट लिंडकडे मी घेऊन गेलो आणि दुसऱ्या दिवशीं सकाळी त्या पत्रात ते वक्तव्य प्रसिद्ध झाले. सावरकरांना अतिशय आनंद झाला. गंमत अशी की, ते वक्तव्य त्याच्याजवळून काढून घेण्यात आल्यावर तसेच वक्तव्य धिंग्रा करु शकले नाहीत. मला वाटतं त्याना कुणीतरी ते लिहून दिलं असावं.[2] आणि ते पाठ करण्याची यातायात त्यानी केली नसावी. हे खरं तर, त्याचा लेखक कोण याचा तर्क मी केला आणि तो त्यांचा सहाय्यक असावा, हेही माझ्या लक्षात आलं. कालांतराने धिंग्रांवर वधाच्या आरोपावरून अभियोग झाला आणि त्यांना फाशी देण्यात आलं. आपल्या देशावर अत्याचार करणाऱ्यांपैकी

---

१. हे मत रास्त दिसत नाही. विपिनचंद्राकडेच तर सावरकरांची व धिंग्रांची शेवटची भेट झाली. त्यांचे चिरंजीव निरंजन पाल यांनीच धिंग्रांचे वक्तव्य हस्तलिखित करून दिलं होतं. तेव्हा विपिनचंद्रांना याची काहीतरी कल्पना असलीच पाहिजे. ते तर क्रांतिकारक कृत्याचे सहानुभूतिक होते.

२. ते सावरकरांनीच धिंग्रांना लिहून दिलेलं होतं हे प्रसिद्धच आहे.







काला लोळवणाऱ्या त्या हुतात्म्यांची छायाचित्रे असलेली राजद्रोही पत्रकं आणि दाबून टाकण्यात आलेलं ते देशाभिमानी वक्तव्य लंडनमधल्या हिंदी विद्यार्थ्यांना वाटलं जाऊं लागलं. मला असा दाट संशय होता की, लॉर्ड कर्झन याला किंवा वायलीपेक्षा अधिक महत्त्वाच्या व्यक्तीला उडविण्यास धिंग्रांना सांगण्यात आलं होतं. पण माझ्या संशयाला आधार देणारा पुरावा काही मला मिळाला नाही. किंवा तो मिळवण्याचा मी कधी प्रयत्न केला नाही.[1] माझ्या मित्रांवर त्या वेळेपासून स्कॉटलंड यार्डने सूक्ष्म लक्ष ठेवलं आणि त्यांच्या निवासस्थानावर लक्ष टेवण्यासाठी किंवा रस्त्यात त्यांचा पाठलाग करण्यासाठीं गुप्त हेर बहुधा आजूबाजूला वावरत असत. या अनुचरांना भुयारी लोहमार्गावर चुकवणं ही गोष्ट अगदीं सोपी होती.

" इंडिया हाउस " पोलिसांनी बंद केल्यावर सावरकर ' रेड लायन्स पॅसेज ' मधल्या अत्यंत घाणेरड्या अशा एका लहान हिंदी रेस्टोरांमधे राहण्यास गेले. पाल यांच्याशी भांडण झाल्यानंतर दत्तही इथेच राहण्यास गेले. जेकब्स नावाच्या एक धिप्पाड म्हातारा ज्यू त्या रेस्टोरांचे धनी होता. त्याच्याकडे, आठवड्यातून चार शिलिंगांना त्याना पाच दिवस उपाहार मिळण्याची मी व्यवस्था केली. हे पैसे आगाऊ द्यायचे आणि मी परत आलो नाहीतर बुडले असं समजायचं, असं ठरलं होतं.

यामुळे सावरकरांचे वरचसं मला दर्शन घडलं आणि कधीही नव्हतो इतका त्यांच्या वैयक्तिक आकर्षकतेने मी भारला गेलो. या मनुष्याजवळ जाज्वल्य ध्येय-निष्ठा आणि मोठी विचित्र अशी एकाग्र निश्चितता होती आणि ती मला फार आकर्षक वाटली. ज्या घाणरेड्या निवासात ते राहात होते त्यात त्यांची सुसंस्कृता आणि मानवी सहानुभूतीचा आभाव ही दोन्ही उच्च कुळातल्या ब्राह्मणांच्या अंगी असलेली वैशिष्टचे प्रकट झाली. दत्त आणि सावरकर जी खोली वसण्यासाठी वापरत असत तिच्या खिडक्यामधून अरुंद आणि घाणीने भरलेला असा लंडनमधला अत्यंत गलिच्छ वस्त्यांपैकी एक बोळ दिसे. समोरच्या खोलीत आपल्या चार मुलांसह एक कमालीची गवाळी बाई राहात असे. कित्येकदा ती किंचाळत असे. पुष्कळदा दारू पिऊन तर्रर होत असे आणि काही वेळा तर भुईवर बेशुद्धावस्थेत पडलेली एखाद्या उघड्या खिडकीतून दिसत असे.

---

१. ही गोष्ट खरी होती. आधी काही दिवसच कर्झनला मारण्यासाठी धिंग्रा गेले होते. पण ते विलंबाने गेले, सभागृहाचे दरवाजे बंद झाले आणि त्यांना परत यावं लागलं.

दत्त पुष्कळदा तिच्याविषयी किंवा तिच्या मुलांविषयी भीती वाटून किंवा दयाळु होऊन बोले तरी. पण सावरकर तिच्या अस्तित्वाविषयी निश्चित असत. खरं बोलायचं तर आपल्या भोवतालची परिस्थिती त्यांच्या जणू ध्यानातच नसे. ते आपल्या स्वतःच्या ध्येयसृष्टीत गढून गेलेले असत. त्यांचे हे स्वप्न काय असावं ? मला सांगता येत नाहीं. पण मला वाटतं, ते हे असावं. 'हिंदुस्थान हा एक ज्वालामुखी आहे. सत्तावनच्या उत्थानांत तो एकदा भीषणपणे जागृत झाला होता आणि पुन्हा तो तसाच जागृत करता येणं शक्य होतं ! प्रत्येक दहशतवादी कृत्य आणि अत्याचार घडताच आणखी दहशतवादी कृत्ये आणि अत्याचार घडतील ! शेवटी हिंदू लोक पुन्हा आपलं पौरुषत्व आत्मसात् करतील आणि त्यांची मातृभूमी आपलं स्वातंत्र्य पुन्हा मिळवील!' या कार्यात सहन कराव्या लागणाऱ्या सर्व हालअपेष्टा या तिच्यासाठीच करावा लागणारा त्याग ठरेल !

सरतेशेवटीं, इंग्लंड सोडून पॅरिसला जाण्यासाठी सावरकरांचं मन वळविण्यात आलं. कारण, त्यांचा धाकटा भाऊ ज्यात अडकला होता, असा दुसरा वध त्याचं राहण्याचं गांव जे नाशिक तिथे झाला होता.

लवकरच दत्तही ते ठिकाण सोडून गेला. पण तत्पूर्वी परकीय देशांतल्या युद्धातल्या अनुभवासाठी सावरकरांनी दत्त आणि दुसरा एक बंगाली यांची स्पेनविरुद्ध लढणाऱ्या मोरोक्कोच्या अबदुल करीम या योद्धयाला जाऊन मिळण्यासाठी मनं वळवली. कारण, तरुण हिंदुलोकांना युद्धाचा असा अनुभव असणं श्रेयस्कर होतं असं त्यांना वाटे. दत्त याला त्यासाठी मी एक विंचेस्टर रायफल दिली. पण जिब्रॉल्टरलाच ते दोघे त्या रायफलीमुळे अडवले गेले आणि परत आले. मी माझी रायफल मागाहून परत आणली. दत्तने एक ब्राऊनिंग आटोमॅटिक पिस्तुलही मला ठेवण्यासाठी दिलं. त्यापैकी काही हिंदुस्थानात धाडली गेली होती. म्हणून त्याच्यावरचा क्रमांक घासला गेला होता असं तो म्हणाला. पण मी आत पाहातो तो बॅरलवरचा क्रमांक मात्र तसाच होता. या प्रकाराने नव्यनेच क्रांतिकारक बनलेल्याविषयी माझं मन अधिक दक्षतेनं वागूं लागलं.[१]

---

१. नाशिक कटाच्या शोधात झालं ते अगदी हेच. त्या वेळी डी. आय. जी. असलेल्या गायडरनं त्यापैकी एक पिस्तुल उघडून एक कटकरी बाबुराव खरे यांना हा आंतला क्रमांक दाखवत म्हटलं, "हे पाहा तुमचे लोक कसे बावळट आहेत. बाहेरचा क्रमांक त्यांनी घासला. पण बॅरलवरचा आहे तसाच आहे. तिथेहीं तो असतो हे तरी त्यांना माहीत आहे कीं नाहीं कुणाला माहीत."



अनुक्रमणिका

जानेवारीमध्ये मी लंडन मॅट्रिक्युलेशनची परीक्षा उत्तीर्ण झालो आणि महाविद्यालयात जाण्यापूर्वी मी भटकंतीमध्ये वेळ घालवू नये म्हणून आईनं मला लेचवर्थ इथे माझ्या मावशीकडे पाठवलं. एक दिवस सकाळी मी वृत्तपत्र उघडलं आणि फ्रान्सहून व्हिक्टोरिया स्थानकावर येताच सावरकरांना अटक झाल्याचं वृत्त मी वाचलं. मी लगेच लंडनला गेलो आणि नानूला भेटलो. दत्त आणि नानू यांनी सर्व वृत्तांत सांगितला. काही वर्षांपूर्वी सावरकरांच्या थोरल्या भावानं काही राजद्रोही पदं छापली होती आणि कोणा एका मि. जॅक्सननं नाशिकला त्याला मरा वर्षांची[1] शिक्षा ठोठावली होती. सावरकरांनी हिंदुस्थानात पिस्तुलं पाठवली होती आणि एका नाट्यगृहात नाटक पाहात असताना एका हिंदूने जॅक्सनचा वध केला होता. वधकर्त्यांसह बऱ्याचजणांना अटक करण्यात आली होती. सावरकरांचा धाकटा भाऊ कोलाघरात शस्त्रं लपवीत असता पकडला गेला होता.[2] पण मुख्य गोष्ट ही की सावरकरांचा प्रतिनिधी पकडताच राजसाक्षी झाला होता मला 'इंडिया हाऊस'मध्ये जो भेटला होता आणि ज्याच्याविषयी माझ्या मनात तिरस्कार उत्पन्न झाला होता तोच तो लठ्ठ मराठा! सावरकरांनी त्याच्यावर विश्वास ठेवावा याचा मला उद्वेग वाटला.

दत्त म्हणाला, "सावरकरांशी किंवा इतरांशी मला आता काही करायचं नाही आणि लंडनबाहेर तात्पुरतं राहून, घरून पैसे येताच मी पुन्हा अभिनयकलेकडे वळेन!"

त्याच्यासाठी तसा निवास पाहण्याचं आश्वासन देऊन मी जिथे दंडाधिकाऱ्यापुढे सावरकरांना उभं करण्यात आलं होत त्या बो स्ट्रीट न्यायालयात गेलो. मला सावरकर दिसले नाहीत. पण स्कॉटलंड यार्डचा इन्स्पेक्टर पार्कर याच्या प्रश्नाच्यां सरबत्तीत मात्र मी सापडलो. इथे अधिक अक्कल न चालवता, सत्याचीच कास धरली पाहिजे हे ओळखून मी स्पष्टोक्तीच अतिशयोक्तीनं रंगवली. मी म्हटलं, "मी सायन्सचा विद्यार्थी म्हणून हिंदी लोकांना माझ्या वर्गात भेटलो होतो. आणि इंडिया 'हाऊस'ला भेट देताना सावरकरांचा व माझा परिचय झाला होता.

---

१. वास्तविक बाबा सावरकरांना जॅक्सननं नव्हे तर सत्र न्यायाधीशानं जन्मठेपेची शिक्षा ठोठावली होती. जॅक्सननं त्यांचा अभियोग सत्र न्यायालयात वर्ग केला होता.

२. हेही खरं नाही. कोलाघरात आक्षेपार्ह कागदपत्र सापडली, ती बाबांच्या प्रकरणातच; पण ते पकडले गेल्यानंतर आणि ते जॅक्सन वधाच्या आधी.



अनुक्रमणिका

ते संकटात आहेत असं पाहून त्यांना साहाय्य देता येईल का, ते पाहण्यासाठी मी आलो आहे. केव्हा नि कुठे त्यांना मी भेटू शकेन ?"

माझ्या सत्योक्तीपुढं पार्करची शोधकता कोलमडून पडली. शेवटी तो मला म्हणाला, "सावरकर हे कच्च्या कैदेत असल्यामुळे तू त्यांना ब्रिक्स्टन तुरुंगात केव्हाही सकाळी भेटू शकशील." मी 'स्कॉट्लंड यार्ड'मधून बाहेर पडलो, तेव्हा माझी निश्चिति झाली की, मुळीच महत्त्व नसलेला हा एक मूर्ख तरुण आहे अशी माझी पार्करनं गणना केली आहे आणि ते ठीकच होते मी अठरा वर्षांचा आणि खरोखरच सरळहृदयी दिसत होतो.

दुसऱ्या दिवशीं सकाळी मी ब्रिक्स्टनच्या तुरुंगात गेलो. एका बंद बोळकंडीत तो तुरुंग होता. वाहनांसाठी मोठा आणि त्यातच माणसांसाठी लहान असे दोन दरवाजे होते. तिथे येणाऱ्यानं घंटा वाजवली की, एक 'वॉर्डर', तो लहान दरवाजा कुलुप काढून उघडी आणि नवागत आत जाई. लगेच दरवाजा बंद करून येणाऱ्या माणसाची माहिती घेऊन आतल्या पोलादी दरवाज्याचं कुलुप काढण्यासाठी कक्षापाल (वॉर्डर) जाई आणि भेट देणारा मुख्य तुरुंगात प्रविष्ट होई. हे उघड झालं होतं की, 'बाहेरचा आणि आतला दरवाजा हे कुलुप काढून एकदम कधीही उघडले जाऊ दिले जायचे नाहीत. कारण बंदिवान वारंवार आत जात. दोन्ही दरवाजे बंद असले तरी त्यांच्यामध्ये लॉरी किंवा कारागाराची गाडी ( Black Maria ) उभी राहावी इतकी पुरेशी जागा होती.

एका दृष्टिक्षेपात मी हे सर्व पाहून ठेवलं. या मध्ययुगीन पद्धतीचं सामर्थ्य आणि दोष क्षणार्धात माझ्या लक्षात आले आणि दुसऱ्या काहीजणांसह शेजारच्या खोलीत सावरकरांची वाट पाहत असता त्या पद्धतीतल्या दोषांचा मी अधिक विचार केला. बाहेरच्या दरवाज्याच्या पलीकडे वावरणाऱ्या शासनयंत्रणेला कारागारातले कक्षापाल साहाय्य देईपर्यंत जावाच लागणारा वेळ हाच तो दोष होता ! तेवढ्यात उघड्या दालनातो व्यापलेल्या एका वाटेने आम्हाला नेण्यात आलं. या दालनातील उद्वेगानं चिडलेल्या बंदिवानाला आणि त्याला भेटण्यासाठी येणाऱ्या मनुष्याला, लहान झरोक्यांची एक पोलादी जाळी अलग ठेवत असे.

विचलीत मनाच्या त्या प्राण्यांनी कुजबुजीपासून तारस्वरातल्या कलकलाटा-पर्यंत उडवून दिलेल्या गलक्याचा गोंधळ भयंकर होता ! थोड्याच अवधीत, सावरकरांना मी भेटणार होतो त्या दालनाशी मी आलो. ते रिकामं होतं. ती पोलादी तारेची जाळी मी पाहिली. एक-दोन क्षणात ते हलक्या पावलानं चालत आत आले आणि मला पाहून अतिशय आश्चर्यचकित झाले.

ते अगदी शांत आणि स्वस्थ होते. मी त्यांच्या बचावाच्या व्यवस्थेविषयी बोललो आणि त्यासाठी पैसे जमवायलाच काय, तुम्हाला साहाय्य देण्यासाठी काहीही करायला मी सिद्ध आहे, असं मी म्हणालो. पण त्यांना त्यावेळी जे काही सारं हवं होतं ते म्हणजे काही स्वच्छ गळपट्टया ( Collars ) होत. त्यांच्या मानेचा घेर केवळ १३॥–एखाद्या शाळकरी मलाच्या मानेच्या घेराइतका होता.

सरकारच्या दृष्टीनं त्यांची अटक वैशिष्टयपूर्ण आणि सूक्ष्मपणे हाताळली पाहिजे असो होती. नाशिकला घडलेल्या जॅक्सनच्या हत्येविषयी त्यांच्याविरुद्ध पुरावा होता. पण सरकारला त्यांच्यावर तो आरोप ठेवण्याची इच्छा नव्हती. कारण ती हत्या सावरकर इंग्लंडला असताना झालेली नि म्हणून त्यांचा अभियोग लंडनला चालणं आवश्यक होते. ह-येला चिथावणी दिल्याच्या आरोपावरून त्यांच्यावर इंग्लंडांत अभियोग चालता आणि आरोप सिद्ध होता तर त्यांना दोन किंवा तीन वर्षांच्या बंदीवासाची शिक्षा मिळती. हिंदुस्थानांत त्यांचा अभियोग चालता तर गोष्ट निराळी होती. सरकारी अधिकारी त्यामुळेच त्यांची हिंदुस्थानाकडे प्रत्यर्पण (एक्स्ट्रॅडिशन) करण्यासाठी प्रयत्न करीत होते. पण तसं करण्यासाठी सावरकर हिंदुस्तानात असताना झालेल्या अपराधांचा पुरावा खणून काढावा किंवा खोटा बनवावा लागणार होता. आणि हे सर्व त्यांनी लंडनला केलेल्या अपराधांचा संदर्भसुद्धा कटाक्षात टाळून ! परंतु याला वेळ लागला आणि तो पुरावा गोळा होईपर्यंत आठवड्यामागून आठवडे 'बो स्ट्रीट' न्यायालयात सावरकरांना त्याना आणावं लागलं आणि प्रतिभू नाकारून पुन्हा कच्च्या बंदिवासात पाठवावं लागलं.

सरतेशेवटी हिंदी अधिकाऱ्यांनी सावरकरांनी कित्येक वर्षापूर्वी हिंदुस्थानात केलेली भाषणं हुडकून काढली. या भाषणासाठी अभियोग भरायला त्याचवेळी सरकारला पूर्ण मोकळीक होती; पण त्याच पुराव्यावरून आता प्रत्यर्पणाचं आवेदन त्यानी केलं. पुरावा अगदी क्षुल्लक होता. ती भाषणं केली गेली त्या वेळी हिंदुस्तानातलं राजकीय वातावरण अगदी निराळं होतं. त्यावेळी अभियोग भरण्याइतक्या महत्त्वाची न वाटलेली ती भाषणं हिंदुस्थानांतलं अस्वस्थतेचं आंदोलन उग्र होताच राजद्रोही बनली.

या विषयावर मी 'डेली न्यूज' पत्रात एक लहानसं पत्र प्रसिद्ध केलं. ते विगत अपराध ( Past offences ) या मथळ्याखाली. मध्यंतरात बहुधा प्रत्येक आठवड्याला सावरकरांना भेटण्यासाठी मी ब्रिक्स्टनच्या तुरुंगात जात असे आणि तोही प्रत्येक प्रसंगी स्वच्छ गळपट्टया आणि हातरुमाल घेऊन ! त्यांच्या बचावासाठी मी काही पौंड निधीही जमवला.



अनुक्रमणिका



मी लवकरच लेचवर्थ सोडून लंडनला आलो. मी माझं सामान गाडीने धाडून दिलं आणि मी फिचलेपर्यंत चालत गेलो. सकाळी नऊ वाजता निघून हॅंपस्टेड येथल्या घरी सायंकाळी सहा वाजता पोचलो. दुसऱ्या दिवशी सकाळी मी ब्रिक्स्टनला गेलो आणि सावरकरांकडून मला कळलं की, हिंदुस्थानातले कागदपत्र येण्याच्या वाटेवर असून फार तर दोनतीन आठवड्यातच अभियोग सुरु होईल. ते पुढे म्हणाले "निर्णय काय होईल त्याविषयी यत्किंचितही संशय नाही!" मी थबकलो. जवळचाच वरखाली येरझारा घालणारा कक्षापाल ऐकण्याचा आवाक्याबाहेर जाईपर्यंत थांबलो आणि म्हणालो, "इथून निसटून जायचा प्रयत्न का करू नये? ते कसं करता येईल त्याविषयी माझ्यापाशी एक योजना आहे!"

सावरकर म्हणाले, "मी त्याचा विचार करत आलेलो आहे. पण हिंदुस्थानाला परत जायच्या वाटेवरच यशाची मला अधिक शक्यता आहे असं मी ठरवलं आहे. अर्थात तुमच्याजवळ एखादी योजना असेल आणि तो युक्ती प्रत्यक्षात आणली तर मला आनंदच होईल!" सावरकर पुढे म्हणाले की, मी तसं केलं तर आवश्यक पैसा C.C.[1] कडून मिळू शकेल. त्याच्यापाशी अगदी मोकळेपणानं मी त्याचा उहापोह करू शकत होतो. मी तुरुंगातल्या त्यांच्या दिनक्रमाविषयी सावरकरांना बरेच प्रश्न विचारले आणि नंतर सिअर्न (Ceare) येथे पुढील विचार विनिमयासाठी गेलो.

सावरकरांना प्रत्येक आठवड्याला अधिक पुराव्यासाठी कोठडीत परत पाठवण्याच्या सोपस्कारासाठी टॅक्सीनं नेण्यात येत असे. तुरुंगाच्या गाडीने नव्हे. त्यांच्यासमवेत एक किंवा काही वेळा दोन गुप्त अनुचर असत. ही नित्याची गोष्ट होऊन बसली होती, आणि त्याना नेहमी त्याच वेळी दोनतीन मिनिटांत नेण्यात येई.

माझ्या योजनेचा मुख्य भाग असा होता की, तुरुंगाच्या प्रवेश दाराशीच किंवा तिथून कांही ढांगाच्या आंतच त्यांची सुटका करायची. बोस्ट्रीट न्यायालयात त्याना नेण्यासाठी टॅक्सी केव्हा येते ते एका टेहळचानं पाहायचं होत. भेटीला येणाऱ्या एकाची गाडी म्हणून एक गाडी तुरुंगापाशी जाणार होती. त्यानी अनुचरांना नामोहरम करताच सावरकरांनी त्या गाडीत उडी मारायची होती. आणि ती गाडी त्यांच्यासह निघून जाणार होती. या योजनेत आवश्यक गोष्ट म्हणजे सावरकरांची सुटका करणाऱ्यांनी अटक टाळायची नव्हती; आपण निसटून

---

१. ही अक्षरं ग्यानचंद वर्मासाठी असली तर G.C. अशी हवी होती. मी ते पत्रानं कळदलं तेव्हा गार्नेटने मान्य केलं.



अनुक्रमणिका

जायचा प्रयत्न करायचा नव्हता. त्यानी दोन अनुचरांना आणि टॅक्सीहाकणाला नीट द्यायचं होतं तुरुंगातून गुप्त अनुचरांना साहाय्य द्यायला वेळच राहिला नव्हता. कारण वर सांगितलेला दोन दरवाजांच्या उघडझापीचा नियम !

पहिल्यांदा मला वाटलं की, सुटका करणारे आणि लागणाऱ्या गाड्या मला शोधावी लागतील. इंग्लंडला गाडी चालवता येते काय किंवा एखादी भाड्याची गाडी तू मिळवू शकशील का, म्हणून मी विचारलं होतंच. त्याचप्रमाणे मिसेस ड्रायहर्स्टला[1] आवश्यक ती धमाल उडवून देणारे 'झिनेफेनचे' कोणी मदतनीस लंडनमध्ये आहेत का तेही विचारलं होतं. तिनं सर्व कांही गुप्त ठेवण्याचं आश्वासन दिलं होतं. पण नंतर एका हिंदी मनुष्यासाठीं काही तोशीस सोसायला 'सिनेफेन'वाले पुढे येतील की नाही, याची मला शंका वाटली. शेवटी त्यांची आवश्यकता नाही असं मी तिला सांगितलं.

C.C. समवेतची चर्चा फलदायी ठरली. त्याने सांगितलं की, पॅरीसमध्ये सावरकरांची सुटका करण्यासाठी प्रदीर्घ तुरुंगवासात जाण्याची सिद्धता असणारी दोन माणसं आहेत. पण त्याना इंग्लंडात आणलं तर त्याच्यावर पाळत ठेवली जाईल. मी ठरवलं की त्याना इंग्लंडांत आणायचा उत्तम मार्ग म्हणजे नावेच्या (यॉटवरील) सहलीवर म्हणूनच. सुटकेच्या दिवशी त्यांना सकाळीच आणायचं. मोटारीनं थेट ब्रिक्स्टनला न्यायचं, सावरकरांची सुटका करायची, त्याच्यासह परत मोटारीनंच परतायचं, त्याना नावेवरच चढवायचं नि फ्रान्सला निघून जायचं ! त्या परतीच्या फेरीसाठी नाव मिळवण्याचं C. C. नं अंगावर घेतलं तिखटाच्या भुकटीचे पुडके आणि शिशाच्या टोकाचे दंडुके सुटका करणाऱ्यांजवळ द्यायचं मी ठरवलं मी सावरकरांजवळ योजनेची चर्चा केली. त्यानी तिला संमति दिली. वेळापत्रक ठरवण्यात आलं. A. A. याला पॅरिसला एक नांव ठरवण्यासाठी सांगण्यात आलं फक्त ब्रिक्स्टनपासून समुद्रापर्यंतची वाट ठरवण्याचं राहिलं होतं. निरनिराळ्या मार्गांना दुचाकीने कित्येक दिवस जाऊन मी ते केलं. लोहमार्ग ओलांडून जाणाऱ्या वाटा टाळायच्या कशा, हीच मुख्य अडचण होती. शेवटी एक वाट मी निश्चत केली

सावरकरांसाठी मोटार हाकताना त्या काळात स्त्रिया वापरत तशी टोपी आणि बुरखा मी विकत घेतला. पडद्याच्या मोटारीतल हे साहित्य त्यांनी त्वरेनं

---

१ टिळकांच्या सुटकेसाठी प्रत्यक्ष बादशाहा पंचम जार्जकडे खटपट करण्याचे आश्वासन दादासाहेब खापर्डेना देणाऱ्या आयरिश बाई त्या याच हिंदी स्वातंत्र्याविषयी त्याना आस्था होती.



अनुक्रमणिका

अंगावर चढवायचं होतं. पॅरिसला जाऊन सुटका करणाऱ्यांसह मी परतायचं. सुटका होत असताना त्या गाडींत राहायचे आणि वाट दाखवायची होती. सिअर्न येथे बरेच आठवडे राहात अवश्य तेव्हा मी लंडनला जाई. C.C. ला शक्य तेवढया कमी वेळा भेटलो. तोच मजेत वऱ्याच वेळा सर्पेन्टाईला येई अशा तीन वेळा भाडयाच्या नावेतून केनर्यसिगटनच्या बाजूला येताना आम्ही तीनदा भेटालो होतो. दिवस फार श्रमाचे गेले; मी तर सारा अठरा वर्षांचा आणि अंगावर घेतलेल्या कार्याच्या मानाने अनुभवी आणि अपात्र असे मला वाटले.

नियोजित दिवसाच्या एक आठवडा आधी अनुचरांनी टॅक्सी तुरुंगांपाशी केव्हा जाते ते पाहाण्यासाठी टेहेळधा मिळवायचाच काय तो राहिला होता. या कामी हिंदी मनुष्य निवडला तर संशय येण्याची निश्चिती होती आणि युरोपियना-वर विश्वास ठेवता येणे कठीण होते. त्यापेक्षा पोलिसांच्या नित्यक्रमावर भार टाकायचे मी ठरवले. C.C. गाडी कुठून मिळवणार हे माहीत नसता मी त्याच्या-वरही विश्वास ठेवला. लेचवर्थला काही दिवस जातो असे आईवडिलांना सांगून मी लंडनला गेलो. त्या रात्रीच दुसऱ्या वर्गात दिपे (Dieppe) येथे जाऊन मी सकाळीच पॅरिसला गेलो. 'इंडिया हाऊस'मध्ये भेटल्यापासून A. A. ला मी पुन्हा भेटलो नव्हतो. पण थोडया तासानंतर संकेतस्थळ ठरवून त्याच्याकडेच दुपारचा उपहार आम्ही एकत्र घेतला. तो म्हणाला, "सुटका करणारे दोघेही यायला सिद्ध आहेत. पण आडनावे मात्र मी ठरवली नाही." आपल्यासारख्या हिंदी माणसाने नस्ता प्रयत्न केला तर लोकांना संशय येईल असे त्याला वाटले.

त्याचे हे कारण वेळ मारून नेणारे होते. माझा त्यावर विश्वास नव्हता. तू विश्वासघात केला आहेस हे माझ्या लक्षात आले आहे असे मात्र मी त्याला सांगितल नाही.

उपहारानंतर बुइ द बुलोनला मोटारींने गेल्यावर दोघही सुटका करणारे मला भेटले. ते A.A. च्या थेट उलट म्हणजे शूर आणि प्रामाणिक होते. A.A. नं. नाव मिळवण्याची आपण खटपट केली नाही असे म्हणताच ते संतापले. मी म्हटले, "उद्या मीच यॉट मिळवीन." आम्ही एका घरी गेलो तिथे मला एक वयस्क हिंदी ब्बाई दिसल्या. त्या तिथल्या चर्चेत प्रमुख भाग घेत.[१] रात्रीचे जेवण झाल्यावर

---

१. या मॅडम कामा होत.





मी A.A. कडून दोन सहस्त्र फ्रँक काढले आणि पॅरिसच्या उन्हाळयाच्या संधिप्रकाशात नाव मिळवण्यासाठी बाहेर पडलो. त्या रात्री पॅरिस मला अति सुंदर भासलं. पॅरिसला येताना रात्रभर मी झोपलो नव्हतो. मी दमलेला, संतापलेला होतो. पण तरीही पॅरीसच्या सौंदर्याने मी क्षणभर धुंद झालो आणि नदीकडे निघालो. एकाएकी मी आनंदाने उद्गारलो, " बरं झालं. A.A. ने मला धोका दिला. मी यॉट मिळवणारच. योजनेच्या प्रमुख भागचे श्रेयही माझेच ठरेल ! " क्वै (Cluais) वर एखादी तरती नाव दैवगतीने मिळून माझा पेच सुटेल असे पाहून धक्क्यावर दृष्टी टाकता टाकता मला कळून चुकले की या हिंदी लोकांनी आपले अंतरंग पुन्हापुन्हा प्रकट केल्यावर मला त्यांच्याविषयी आदर वाटणे शक्य नाही. थोडा वेळ मी गर्वाने धुंद झालो. मला स्वतःच्या मर्दुमकीची प्रथमच जाणीव झाली. माझ्या देशाच्या शत्रूंवर मी मात केली आहे! त्यांनी आपले प्राण माझ्या स्वाधीन केले आहेत-माझ्या-की जो एक सार आठरा वर्षांचा मुलगा आहे ! कारण काय तर माझे नेतृत्व त्यांच्या नेतृत्वापेक्षा सरस ठरेल ! पॅरिसला कसल्या विस्मयकारक रात्री आणि किती विचित्र परिस्थितींत मी त्या दिवशी एकाकी होतो !

एकदोन तास नदीच्या काठाने चालताना मी स्वतःला विचारले, " मी इथे का आहे ? हिंदी राष्ट्रीयत्वाविषयी मला आता काहीच वाटत नव्हते. माझ्या सावरकरासंबंधीच्या भावना वैयक्तिक होत्या. त्यांच्यासारख्या प्रखर उत्साहाच्या आणि विराट कर्तृत्वाच्या माणसाने आपले आयुष्य तुरुंगांत पिचत काढावे ही कल्पनाच मला सहन होणारी नव्हती. त्यांच्या विचारप्रणालीपैकी मला काहीच मान्य नव्हते. मी दहशतवादी नव्हतो ! आणि नंतर माझी धुंदी आणि घमेंड एकदम नाहीशी झाली.

"मी इथे वेळ फुकट घालवत आहे. हे काम झालेच पाहिजे; मला कोणत्या तरी बंदरात गेलेच पाहिजे. कॅले? बुलेन? का दिपे? (Dieppe) नाही हॅवरे?." दुसऱ्या दिवशी भल्या पहाटेस गाडीने मी पॅरिसहून निघालो, आणि हॅवरेला पोंचलो एका लहानशा आगनावेचं माथं (डेक) धूत असलेला एक म्हातारा खलाशी एक तास भटकल्यानंतर मला दिसला. एका फळीवरून मी त्या नावेवर गेलो. त्याला म्हणालो, "काही मित्रांसह समुद्रावर भटकण्यासाठी एक नाव मिळाली तर मला हवी आहे!" तो मोठा आनंदी म्हातारा होता. मला काय हवे होते ते कळताच तो उद्वेगाने ओरडायलाच लागला. मी जर एक दिवस आधी आलो असतो तर नावेच्या धन्याने ती मला दिली असती. तो होता एक निवृत्त इंग्रज कर्नल नि तोही माझ्यासमवेत आला असता ! आता

तो पंधरा दिवस पॅरीसला गेला होता. मी माझी सहल जर लांबणीवर टाकली......

मी एक मोठा श्वास घेतला. मला वाटले, ही सुटका बरी झाली. मी त्याला विचारलं, "तुझ्या ओळखीचा कुणी कोळी नाही का ? मच्छिमारीच्या नावेतनं प्रवास करणं मला आवडतं ! नंतर बऱ्याच विचारानंतर एम्. कोर्नु (Cornu) हा बंदरावर होता हे त्याला आठवलं. अर्ध्या तासाने त्याच्यासह मी कोर्नु आणि त्याची बायको यांच्यासह तिच्या नवऱ्याला फसवायचे नाही या अटीवर लाकडी फ्रेंच बूट घालून एका अस्वच्छ मच्छिमारी नावेवर चढलो. ती न्यू फाऊंडलँडला जाऊन आलेली होती आणि नुकतीच दुरुस्त केलेली होती. आठवडाभर आम्हाला सहलीला न्यायचं, त्याच्या नावेवर आवश्यक तो अन्नसामुग्री भरायची आणि आवश्यक ते कामगार त्याने आम्हाला द्यायचे हे चाळीस पौंडाला त्याने मान्य केले. मी त्याला चारशे फ्रँक दिले. थकल्यामुळे मी कोलमडून पडतो की काय असे मला वाटू लागले. सौदा ठरल्याच्या आनंदात भरपूर कॉफी घेतल्यामुळे मी पुन्हा तरतरीत झालो. त्या म्हाताऱ्याला पारितोषिक देऊन स्थानक गाठलं आणि पॅरिसच्या गाडीत बसलो.

माझ्या डब्यात आठ फ्रेंच सैनिक सर्व तऱ्हेची गाणी गात होते. झोपेविना अशी माझी ही तिसरी रात्र. पॅरिसला मी पहाटे पोचलो. रस्ते धुतले जात होते आणि भटारखान्यातून ताज्या पावाचा वास येत होता. मी थकल्याने भ्रमिष्ट होऊन A. A. च्या रू ल दा बोयती या निवासगृहात गेलो. तिथली मोलकरीण माझीच वाट पाहात होती. एका लहान मुलाने ठेवलेली चिठी तिने मला दिली. मी A. A. च्या खोलीत गेलो. तो अंथरुणात आराम करत होता. तो उठलाही नाही. पण म्हणाला, " छान ! तूं आलास ! तुझे वडील इथे आले आहेत. त्याना वाटतंय मी तुला पळवलं आहे. मोठ्या चिंतेत काळ घालविला मी. " मी म्हटलं, "मला नोट मिळाली !" त्यावर तो उत्तरला "पण ते सारं फिसकटणार ! ते अगदी अशक्य आहे. तुझे वडील इथे आले आहेत. ते फ्रेंच पोलिसांकडे जाणार आहेत." मी क्षणभर संतापाने बेभान झालो. मी काय बोललो ते मला आठवत नाही. पण A. A. म्हणाला, 'त्या म्हाताऱ्याच्या पांढऱ्या केसांकडे पाहा आणि त्याला मारू नकोस." त्याच्या या मूर्ख उद्गारांवर मी मोठ्याने हसलो. माझ्याजवळ राहिलेले पैसे मी त्याला दिले. त्याचा त्याला फार आनंद झाला. " तू आता निश्चितपणे झोप." हे म्हणताना माझ्या स्वरात जो तिरस्कार होता त्याने तरी तो डिवचला जाईल अशी आशा करत मी बाहेर पडलो. त्या चिठीत "सिनेफेन" नेता गॉन याने एक सूचना केली होती. मला वाटतं जर्मनीत पळून जावं आणि

A A. च्या मागेच ससेमिरा लावून द्यावा. पण C C. ला पूर्वसूचना देऊन सावरकरांना कळवायला हवं होतं. त्यांना मला तसचे सोडता येणार नव्हतं. A. A. ने दिलेल्या पत्त्यावर जाऊन यथेच्छ न्याहरी करून त्या सर्व वेळ एडवर्डला खुणेनेच गप्प करत मी बाहेर पडलो. कॅलेला पोचताच त्यानी विचारले "तुम्याजवळ पिस्तुल आहे काय ?" मी म्हटले, " मला काही कुणाला मारायचे नाही !"

कॅलेला आगनावेत बसताच माझ्या लक्षात आलं की, माझी योजना केव्हाही अशक्यच ठरली असती कारण, नंतर समुद्रावर वादळ उठलं होतं. एम्. कार्नुने त्यात नाव लोटली नसती. आम्ही दोघे माथ्यावर ( डेकवर ) गेलो. वादळामुळे नाव लागून एडवर्ड हैराण झाले होते. मी थकलेला होतो. म्हणूनच की काय, वादळाचा माझ्यावर काहीच परिणाम झाला नव्हता. पुढे लंडनला जाताना गाडीत मी त्यांना विचारले, " तुम्हाला हे कळलं कसं ?" ड्रायहर्स्टनं मेवलला, तिनं तिच्या घरी, आणि त्यानीं एडवर्डला सर्व काही कळवलं होतं. या साखळीत सर्व वृत्त फुटलं होतं. घरी जाताच मी झोपी गेलो.

दुसऱ्या दिवशी उठताच C. C. ला निरोप पाठवून मी सुटकेच्या प्रयत्नाच्या ठरलेल्या वेळेच्या आधी केवळ अर्धा तास आधी सावरकरांना ब्रिक्स्टन तुरुंगात जाऊन भेटलो.

मला पाहताच सावरकरांनीं योजना फसली असल्याचं ताडलं. मी त्यांना सर्व वृत्तांत सांगताच ते उलट माझेच सांत्वन करू लागले. त्यांच्या बोलण्यात दोषारोपाचा, विषादाचा किंवा आश्चर्याचा पुसट मागमूसही नव्हता. मी त्यांना पॅरिसला दिसलेली परिस्थिति सांगितली आणि म्हटलं, हे उघड आहे कीं A. A.ला तुम्ही निसटून जायला नको आहे. म्हणजे पक्षाचे पैसे अनायासे त्याच्याच हातात पडतील.[1] त्यावर सावरकर पुढीलप्रमाणे काही तरी म्हणाले, "एखाद्याला

---

१. गार्नेट यांच्या या वृत्तांतावरून अय्यर यांनी विश्वासघात केला असा समज व्हायचा संभव आहे. पण अय्यर हे सावरकरांच्या पक्के विश्वासातले. त्यांचे पुढचे आयुष्यही देशभक्तीत गेले होते. त्यामुळे हे खरे दिसत नाही. त्यांनी गार्नेटना साह्य न द्यायला कारण सावरकरांच्या सुटकेची योजना आधीच आखली गेली होती. ती मार्सेलिसला प्रत्यक्षात यायची होती. तेव्हा गार्नेट यांच्या प्रयत्नाचा तिच्यात अडसर नको हेच असावं. सावरकरांनी हिंदुस्थानच्या वाटेवरच सुटून जायचा आपल्याला अधिक मोका आहे असे सूचक उद्गार गार्नेट यांचेजवळ

(पुढील पानावर पाहा)



अनुक्रमणिका



जय मिळाला किंवा तो पराभव पावला, तो यशस्वी झाला की तो अयशस्वी झाला, त्याला महत्त्व नाही. तुम्ही जोपर्यंत लढत राहाल, तोपर्यंत शेवट काहीही झाला तरी त्याची चिंता करू नका. तुमची वृत्ती काय राहिली आहे हीच महत्त्वाची गोष्ट आहे. " १

" तुम्ही फार विस्मयकारक कामगिरी केली आहे आणि तुम्ही कधी काहीही करावं असं काहीच कारण नव्हतं. माझ्याविषयी चिंता करू नका. मी काहीही करून निसटून जाईन. तुमची योजना फसली तर उपयोगात आणायची अशी एक योजना माझ्यापाशी आहे. "

कक्षायालात वेळ संपल्याचा पुकारा केला. ब्रिक्स्टनच्या तुरुंगातून मी बाहेर पडलो. ब्रिक्स्टन टेकडीकडे हळूहळू जाताना सावरकरांची नि आपली ही शेवटचीच भेट हा विचार मनात येत असताच एक टॅक्सी माझ्यापुढून गली. तीत एक अनुचर होता. मी माझ्या घड्याळांत पाहिलं. मी ठरवलेल्या वेळेला तीनच मिनिटे होतीं ! इतक्या गोंधळानंतरही स्कॉटलंड यार्डला माझ्या हालचालींची माहिती नव्हती. पुढे कित्येक दिवस मी खिन्न मनाने भटकत काढले. A A विषयीचा माझा अनुभव ताजा होता आणि तो पचवणं फार दुःखाचे आणि कालावधीचं काम होतं. काहीही म्हटलं तरी माझ्या पदरी मूर्खपणा आला होता.

त्यात पडण्याचे मला कारण काय होतं ? आपलं स्वतःचं दहशतवादी आंदोलन जर हिंदी लोकांना नीट चालवता येत नसेल, तर त्यांना साहाय्य करून एक इंग्रज मुलगा काय साधणार होता ? ब्रिटिशांना कधीकाळीं त्यांनी घालवून

---

(मागील पानावरून)

काढले. त्यावरूनही अय्यर यांच्या योजनेला आधार मिळतो. सावरकरांनी तर त्यांना ब्रिक्स्टन तुरूंगातच एका भेटीत इंग्रज पोलिसाचे लक्ष चुकवून हिंदीत सांगितले होते, "मोका" मिळाला तर मित्रांना मार्सेलिसला भेटता येईल ! " याचा गाभितार्थ समजूनच अय्यर यांनी मॅडम् कामांच्या सहाय्याने पॅरिसहून मार्सेलिसला मोटार घेऊन सावरकराना पळवून नेण्यासाठी प्रयाण केलं होतं.

१. सावरकरांचं गार्नेट याने यावेळचे म्हणून केलेले वर्णन अगदी सावरकरांच्यासारखंच वाटतं. त्यांनी त्यांचे म्हणून उल्लेखलेले इंग्रजी शब्द तर त्याच्या अंतर्गत पुराव्यावरूनही त्यांचेच वाटतात. प्रसंगच तसा. तेव्हा गार्नेट यांच्या स्मृतिफलकावर ते अविस्मरणीयरीत्या अचूक राहिले हेही साहजिक वाटतं.



अनुक्रमणिका

दिलं, तरी इंग्रजांनी त्यांची राज्यव्यवस्था चालवावी अशी अपेक्षा ते करू शकतील काय? दहशतवादावरही माझा विश्वास नव्हता आणि त्याने काय साधेल याविषयी मी साशंकच होतो. मी कशासाठी माझे प्राण धोक्यत घालत होतो?

एक दिवस मी वृत्तपत्र उघडलं आणि सावरकरांच्या निसटून जाण्याचे सर्व वृत्त वाचले. सावरकरांनी एक मोटार (पॅरिसला) सिद्ध ठेवायला सांगितलं होतें. पण A. A. ने पुन्हा एकदा ती आजही धुडकावून लावली होती.[1] उद्वेगात सावरकरांनी फ्रेंच पोलिसाला गांठले आणि आपल्या पो. आयुक्ताकडे न्यायला त्याला सांगितलं. पाठलाग करणाऱ्यांनी हा चोर आहे असं पोलिसाला सांगून सावरकरांना परत जहाजावर नेले. फ्रेंच पोलिसांनी काहीच केलं नाही. फ्रेंच लोकसभेत मग प्रश्न विचारले गेले आणि ज्वारेज (Jaures) याच्या निषेधाच्या हुल्लडांमुळे आणि आंदोलनामुळे फ्रेंच सरकारला सावरकरांचा तावा मागावा लागला. हेग न्यायालयात, "फ्रेंच पोलिसाने प्रतिबंधच केला नव्हता. त्यामुळे आता त्या प्रकरणात काहीच होऊ शकत नव्हतं," असं ठरलं. आंतरराष्ट्रीय निर्बंधाच्या (International Law) दृष्टीने ही एक दुर्दैवी घटना घडली होती.

हा निर्णय बाहेर पडेपर्यंत सावरकरांना शिक्षा ठोठावण्यात येऊन आंदमान बेटावर पाठवण्यांत आलं होतं. जवळजवळ चौदा वर्षांनंतर लॉर्ड ऑलिव्हर भारतमंत्री असताना त्यांची सुटका झाली. ऑलिव्हरानी मध्यस्थी केली की काय ते मला कधीच समजल नाही. विनायकराव सावरकर हे सध्या हिंदु महासभा या "जहाल धार्मिक राष्ट्रवाद्यांच्या[2] संस्थेच्या नेत्यांपैकी एक आहेत. ब्रिक्स्टनच्या तुरुंगात मी त्यांना भेटलो. त्यानंतर माझा त्यांचा पुढे कधीही संबंध आला नाही.!

---

१. हे खरे नाही. अय्यर आणि मॅडम कामा हे त्यावेळी पॅरिसहून मोटारींने निघून मार्सेलीसच्या वाटेवरच होते. सावरकरांची निसटून जायची आणि त्यांच्या तिथे पोचण्याची वेळ चुकली. सावरकरांना पुन्हा पकडल्यानंतर थोड्याच वेळात तीं दोघं मार्सेलिसला आली. अय्यर हे जर विश्वासघातकी असते तर सावरकरांनी १९२५ मध्ये त्यांच्यावर एक उत्तम लेख लिहून कृतज्ञता दाखवली नसती.

२. हिंदु महासभा ही धर्मसंस्था नव्हती. गार्नेट यानाच पत्रात मी हे कळवून म्हटले की, मी पत्र लिहित होतो तेथून एका हाकेवर सावरकर राहात आहेत. त्यांनी उत्तरात त्यांना आपले प्रणाम कळवायला सांगितलं होतं. मी तसे त्याना कळविलेही होते.

# मानवाचे हृदय

• संकलन — नाना जोशी

(प्रसिद्ध मानसचिकित्सक श्री. एरिक फ्रॉम यांच्या काही ग्रंथांच्या साहाय्याने पुढील लेख तयार करण्यात आला आहे. हा लेख मानवाच्या हिंसक प्रवृत्तीसंबंधी आहे. याच लेखाला जोडून हिटलरच्या व्यक्तिमत्त्वाचा मानसशास्त्रीय अभ्यासही पुरवणी म्हणून दिलेला आहे. — संपादक )

काही लोक म्हणतात की मनुष्यप्राणी हा लांडग्यासारखा हिंस्र व क्रूर आणि विश्वासघातकी आहे . तर काहीजण म्हणतात की, नाही, मनुष्यप्राणी लांडग्यासारखा नसून तो डोळे झाकून कुणाच्याही मागून जावयास तयार असणाऱ्या मेंढरासारखा आहे. वाद घातल्यास दोन्ही पक्ष आपापल्या बाजूचा भरपूर पुरावा स्वतःच्या समर्थनार्थ पुढे आणीत असतात. जे मनुष्यजातीला मेंढरागत मानतात, ते म्हणतात की मनुष्ये कुणाच्याही पाठीमागे जातील. त्यांना आपल्या मागे न्यावयास तयार असणारा कुणी असला म्हणजे झाले. मग हा इसम चांगला आहे की वाईट व तो नेत असलेला मार्ग आपल्या हिताचा आहे की अहिताचा याचा जरादेखील विचार ती करीत नाहीत. त्यामुळे भाषेवर ज्याचे प्रभुत्व आहे असा कुठलाही लफंगा, परंतु चलाख आणि चतुर भाषणपटू त्यांच्या मनावर व मतावर आपले वर्चस्व गाजवू शकतो आणि त्यांना आपल्या मागे नेऊ शकतो. त्यांचा कडेलोट घडवून आणू शकतो. हे लोक म्हणतात की बहुसंख्य मनुष्ये कमालीची सूचनक्षम असतात. थोड्या प्रभावी शब्दात व आत्मविश्वासाच्या आवाजात किंवा काल्पनिक भीतीचे वातावरण निर्माण करणाऱ्या शब्दात त्यांच्यासमोर कुणी काही मांडले, की त्या शब्दाला व आवाजाला ती बळी पडतात. आपली अक्कल व कल्पनाशक्ती त्या इसमाकडे गहाण टाकतात. थोडक्यात, जमावाच्या इच्छेला विरोध करण्याचे सामर्थ्य त्या जमावाच्या घटकांपैकी फारच थोड्याजणांच्या अंगात असते. बरेचजण जमावाच्या इच्छेला मुकाटपणे मान तुकवितात.

मनुष्ये मुक्या मेंढरागत असतात याच समजुतीवर बडे हुकूमशहा आणि असहिष्णु धार्मिक पुढारी आपल्या पुढारीपणाचा इमला उठवितात. आणखी असे की, मनुष्ये मेंढरागत असतात व त्यांना समर्थ मनाचा व व्यक्तित्वाचा पुढारी नेतेपणा-

माठी लगत असतो याच समजुतीखाली वावरत असल्यामुळे, जनतेचे पुढारीपण करण्यात आपण काही तरी फार मोठे नैतिक कार्य पार पाडीत आहोत या प्रकारचा आत्मविश्वास या पुढाऱ्याना बाळगता येतो. त्यांना वाटते की सामान्य मनुष्याला कोटल्याही प्रकारची नैतिक जबाबदारी स्वीकारावयास आवडत नाही. त्याला स्वातंत्र्याची जबाबदारी पेलत नाही. स्वातंत्र्याची व नैतिक निर्णयाची जबाबदारी स्वतःच्या शिरावर घ्यावयास कोणी पुढे येत असेल तर आपली ती जबाबदारी त्याच्या हाती सोपवावयास मोठ्या खुषीने तो तयार असतो. खरे पाहता पुढारी-मंडळींचा हा समज पूर्णांशाने खरा नाही.

या प्रश्नाची दुसरी बाजू अशी की मनुष्ये जर खरोखरीच मुक्या मेंढरागत असती तर आजवरचा मनुष्यजातीचा इतिहास मानवी रक्तानेच लिहिलेला दिसतो हे कसे काय? एकट्या चंगीजखानाने स्वःतच्या हाताने काही लाखो निरापराध स्त्रीपुरुष-बालकांना कंठस्नान घातले नव्हते. याच्यापाठी त्याचे हस्तक व साथीदार होते. एकट्या हिटलरने काही असंख्य निरपराध ज्यूंना यमसदनाला पाठविले नव्हते. त्यालाही त्याचे अनुयायी होते. एकट्या स्टॅलिनने काही लाखो राजकीय विरोधकांना जीवे मारले नव्हते. त्यालाही त्याचे मदतगार होते. या सगळ्या हुकूमशहांना त्यांच्या आज्ञा आनंदाने पाळू इच्छिणारे अगणित अनुयायी, साथीदार, सेवक व भक्त होते. निरपराध्यांचे अनन्वित हाल व छळ हिटलर किंवा स्टॅलिनने स्वतःच्या हातांनी केला नव्हता. तो या अनुयायांनी व साथीदारांनी केला होता. हे साथीदर ती कृत्ये नाखुषीने व जुलूमजबरदस्तीखाली करीत नव्हते. मनुष्याचा विकृत क्रूरपणा व हिंसकपणा तर आपण सर्वत्र पाहतो व अनुभवितो. खूनात, बलात्कारात, निरपराध्यांच्या छळात आणि युद्धात त्याचा हा हिंस्रपणा पदोपदी आपणास दिसतो. अशा परिस्थितीत मनुष्याला मुक्या मेंढरागत आपण कुठल्या आधाराखाली समजायचे? मनुष्याच्या अशा प्रकारच्या नृशंस कृत्यांचा हवाला देऊन काही लोक असे म्हणतात की, मनुष्य हा मुक्या मेंढरागत नसून तो स्वभावतःच क्रूर, हिंस्र, विध्वंसक आणि द्वेषी आहे. तो नेहमी तसा वागत नाही याचे कारण त्याचा चांगुलपणा नसून तसे वागल्यास आपणास शिक्षा होईल ही भीती. आपल्या क्रूरपणाला त्याच्याहीपेक्षा अधिक क्रूर शिक्षा मिळण्याची शक्यता आहे ही भीती त्याला याबाबतीत मागे खेचते.

आता खरे काय? मनुष्ये मेंढरागत आहेत ही गोष्ट खरी, की ती क्रूर, नृशस, लांडग्यागत आहेत ही गोष्ट खरी? मनुष्याच्या अनेक कृत्यांवरून ती क्रूर लांडग्यागत असावीतसे वाटते. पण इतर अनेक कृत्यांवरून ती मेंढरागतही असावीशी वाटतात. एवढेच नव्हे तर दैनंदिन जीवनात क्रूरपणाने वागण्याच्या इतक्या संधी उपलब्ध असतानाही ती समजूतदारपणे वागत असतात. किंबहुना त्यांच्यासमोर

जर कोणी सकारण वा आकारणही क्रौर्याने वागत असले तरी त्याचे ते वागणे पाहून त्याच्या अंगावर कांटा उभा राहतो. हे असे कसे? आपण स्वभावतःच जर खरेखुरे क्रूर असतो तर नेहमीच आपण तसे वागलो असतो. स्वतः क्रूरपणाने वागताना सोडून द्या. परंतु दुसरा क्रूरपणाने वागताना पाहून तरी आपणास आनंद व्हावयास हवा होता. गंमत वाटावयास हवी होती. परंतु तसे घडत नाही. क्रूर मनुष्याची आपणास घृणा येते. त्याचा तिरस्कार वाटतो. त्याच्याविषयी मनात संताप येतो.

मग असे तर नाही ना की मनुष्यामधील बरेच लोक मेंढरागत असतात व काही थोडे लांडग्यागत आहेत. लांडग्यांना हत्या आणि वध करायचा असतो. मेंढराना आज्ञा पाळायच्या असतात. तेव्हा खून करण्यासाठी, आगी लावण्यासाठी, हत्या आणि वध करण्यासाठी, अणुबॉंब टाकण्यासाठी लांडगे मेंढरांना हाताशी धरतात, मेंढरे या गोष्टी करतात. कारण ती कृत्ये त्याना आवडतात म्हणून नव्हे तर त्याना स्वतःवर स्वातंत्र्याची जबाबदारी नको असते. नैतिक निर्णय घेण्याइतकी हिंमत त्यांच्यापाशी नसते. त्यापेक्षा कुणा समर्थाच्या आज्ञा पाळावयास ती तयार असतात. शिवाय शब्दांची भुलावण करून लांडगे त्याना फसवितात. आपण करीत आहोत त्यात काहीच वावगे नाही असे भासवितात. देशाच्या प्रतिष्ठेच्या नावाने, धर्मांच्या नावाने, जातीच्या नावाने, देशावरील परचक्राच्या भीतीच्या नावाने स्त्रियांवरील बलात्काराच्या व अत्याच्याराच्या गोष्टी सांगून, बालकांच्या व वृद्धांच्या क्रूर हत्येच्या कथा सांगून, त्यांची माथी भडकावून सूडासाठी त्यांना प्रवृत्त करून त्यांच्याकरवी तें ही अनन्वित कृत्ये घडवून आणतात. मनुष्यजातीच्या क्रूरपणाविषयीचे हे विश्लेषण वरवर तरी बरोबर वाटते. परंतु मग मनात अशी एक शंका येते की मेंढरे इतकी सहज कशी बनविली जातात? इतक्या दीर्घकाळापर्यंत कशी बनविली जातात? आपण बनविली जात आहोत अशी शंकाही त्यांच्या मनात कशी येत नाही? तेव्हा असे तर नाही ना की मनुष्ये स्वाभाविकतः क्रूर असतात, पण त्यांचा क्रूरपणा उघड नसतो व ज्यांना आपण लांडगे म्हणतो त्यांचा क्रूरपणा सहज दिसण्याइतका उघड असतो. की मनुष्य. लांडगा व मेंढरू असा दोन्हीही आहे ? की दोन्हीही नाही ?

मनुष्य लांडगा आहे की मेंढरू या प्रश्नाचे उत्तर आजच्या घटकेला आपल्या जीवितरक्षणाच्या व जातीरक्षणाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचे आहे. कारण असे पाहा की मनुष्य जर मूलतःच लांडग्यासारखा असेल तर त्याच्या क्रौर्यावर आणि हिंसकपणावर उपचार करावयास फारशा उत्साहाने आपण तयार होणार नाही. आणि मग आपल्या उदासीनपणामुळे मनुष्यातील क्रौर्य आणि हिंसकपणा उत्तरोत्तर वाढत जाईल. क्रौय, हिंसकपणा यांची मनुष्यजातीला नैसर्गिक गरज

आहे असे जर आपण मानणार असलो, तर क्रौर्य व हिंसकपणा स्वभावातून निपटून काढण्यासाठी फारसे मनापासूनचे प्रयत्न आपण करणार नाही. आम्ही सर्वजण जर मनाच्या गाभ्यात लांडगे आहोत, तर विरोध तरी कुणी करायचा व कशासाठी करायचा असा एक प्रश्न आपणासमोर उभा राहतोच !

मनुष्य मेंढरागत आहे की लांडग्यागत या प्रश्नात जो महत्त्वाचा प्रश्न गुंतलेला आहे तो मनुष्य सत्प्रवृत्त आहे की दुष्प्रवृत्त आहे हा होय! मनुष्याच्या स्वभावात चांगले परिवर्तन घडवून आणता येईल की नाही हा होय. असे परिवर्तन घडवून आणता येण्यासारखे असेल तर प्रयत्न करण्यात अर्थ आहे. नाहीतर नाही. चिकित्सक व खोल दृष्टीने मनुष्याच्या स्वभावाचा विचार केल्यास असे म्हणावेसे वाटते की, सुष्ट आणि दुष्ट अशा दोन्हीही प्रवृत्ती मनुष्यामध्ये असून त्यातील कुठल्याही प्रवृत्तीच्या बाजूने आपल्या इच्छाशक्तीचे वजन टाकावयास तो स्वतंत्र आहे.

काही दशकांपूर्वी मात्र सामाजिक विचारवंतांची या बाबतीतील धारणा सर्वस्वी वेगळी होती. ते असे समजत की मनुष्य मूलत: सत्प्रवृत्त आहे. परंतु परिस्थिती त्याच्या विरुद्ध गेल्यावर तो दुष्टप्रवृत्त बनतो. ही परिस्थिती सुधारली की पुन्हा तो सत्प्रवृत्त बनू शकतो. दारिद्र्य त्याला हिंस्र बनविते. उपासमार त्याला चोर बनविते. ही भौतिक परिस्थिती बदलली की तो सुधारतो की नाही ते पहा. एकोणिसावे शतक आणि विसाव्या शतकाची पहिली तीन दशके यावर या विचारसरणीचा पगडा होता. मार्क्स व त्याचे अनुयायी याच विचाराच्या मार्गदर्शनाखाली चालतात. मनुष्याच्या दुष्टपणाचे मूळ मनुष्याच्या स्वभावात न पाहता हे सर्वजण ते त्याच्या भोवतालच्या सामाजिक-आर्थिक परिस्थितीत पाहतात.

एकोणीसाव्या शतकात अनेक उत्तमोत्तम भौतिक शोध लागले व लागत होते. व्यापार-उदीम वाढत होता. समाजाची आर्थिक परिस्थिती झपाट्याने सुधारत होती. एकोणिसाव्या शतकाचा आशावाद हा या सान्याचा परिणाम होता. मनुष्याच्या सोईत जीवनरहाटीत जे चांगले बदल घडून आले होते त्यामुळे स्वतःच्या चांगुलपणावरील मनुष्याचा विश्वासही वाढत चालला होता.

मग पहिले महायुद्ध झाले. नंतर दुसरे झाले. हिरोशियावर अणुबाँब पडला. त्यात लाखो लोक प्राणास मुकले. तितकेच विद्रूप झाले व त्याचबरोबर मनुष्याच्या स्वत:च्या चांगुलपणावरील विश्वासास पहिला तडा गेला. स्वतःच्या स्वभावाचा तो फिरून विचार करू लागला. मनुष्यजातीचा स्वतःबाबतचा हा भ्रमनिरास ही एक अतिशय चांगली गोष्ट होती. आत्मविश्वासपूर्ण बेसावधपणापेक्षा असा स्पष्ट भ्रमनिरास कितीतरी पटींनी चांगला असतो. मात्र हा भ्रमनिरास हीं

एका अर्थी वाईटही घटना ठरली होती. कारण त्यामुळे माणसे सिनिक, तुच्छता-वादी होत होती. सामाजिक घडामोडींविषयी बेपर्वा बनत होती. मनुष्य या प्राण्यावरील त्यांचा विश्वास उडत होता. मनुष्य मूलतः सुष्ट असतो या प्रमेया-वरील ज्यांचा विश्वास उडाला होता ते शिक्षित व अर्धशिक्षित बुद्धिमंत विचाराच्या एकदम दुसऱ्या टोकाला जाऊन मनुष्याला मूलतः दुष्ट प्रवृत्तीचे मानू लागले. ते असे म्हणू लागले की मनुष्य हा मूलतः क्रूर, हिंस्र व दुष्ट आहे. त्याच्या बाबतीत काहीही भले घडून येण्यासारखे नाही. यापूर्वी अशा प्रकारचा एकांतिक दृष्टिकोन सहसा स्वीकारला जात नसे. तेव्हाही मनुष्याच्या क्रूरपणामुळे बुद्धिमंत व्यथित होत, संतापत. त्यांचा तिरस्कार जागृत होई. पण तरीही त्यांना ही आशा वाटे की मनुष्य हा संहारासाठी उत्सुक असला तरी युद्धाचा प्रश्न शांततेनेही तो सोडवू शकेल. मनुष्याच्या मूलभूत चांगुलपणावर तेव्हा श्रद्धा असे. आता ही श्रद्धाच नाहीशी झाली आहे आणि तीच खरी सर्वांत वाईट गोष्ट आहे. कारण जोवर मनुष्यातील स्वाभाविक चांगुलपणावर विश्वास असतो तोवर आशा बाळगावयास जागा असते.

माणसामाणसातील सर्व तंटयांचा निकाल युद्धानेच होणार. कारण युद्ध करणे हा मनुष्यातील विध्वंसक प्रवृत्तीचा अपरिहार्य परिणाम आहे असे मानले की, मनुष्याच्या भवितव्याविषयी आशा बाळगावयास जागा उरत नाही. असो, युद्धाला अपरिहार्य मानणारे लोक स्वतःला निर्भिड वास्तववादी समजतात. प्रत्यक्षात ते वास्तववादी नसतात आणि निर्भिडही नसतात. ते वैफल्यग्रस्त व पराभूतीवादी असतात. त्यांच्या मनाची धारणा पराभुतीची असते. दोन कारणांसाठी असे लोक वास्तववादी नाहीत. त्यातील एक कारण हे की मनुष्य मूलतः आक्रमक व हिंसक असला तरी या प्रेरणांचा प्रतिकार त्याला करता येत नाही असे नाही. किंवा मनुष्याला फक्त तेवढयाच प्रेरणा आहेत असे नाही. मनुष्याला अनेक प्रेरणा आहेत व त्या प्रसंगानुरूप प्रकट होतात. अशा वेळी एका प्रेरणेच्या साह्याने दुसरी प्रेरणा त्याला नियंत्रित करता येण्यासारखी आहे. युद्ध ही वस्तू अपरिहार्य आहे असे म्हणणाऱ्या लोकांची दुसरी चूक अशी की, युद्ध ही वस्तु ते केवळ मानसिक प्रकारची मानतात, ते असे समजतात की मनाची प्रवृत्ती युद्ध करावे अशी असल्यामुळे मनुष्ये युद्धे करतात. प्रत्यक्षात मानसिक कारणासाठी युद्धे कधीही घडत नाहीत. युद्धे लष्करी, आर्थिक, राजकीय कारणांसाठी घडून येतात व ती लष्करी, राजकीय व व्यापारी पुढाऱ्यांनी कपटकारस्थाने करून घडवून आणलेली असतात. कधी प्रादेशिक विस्ताराच्या हेतूसाठी; कधी नैसर्गिक संपत्तीच्या अभिलाषेसाठी; कधी व्यापारी फाय-द्यांसाठी; कधी खऱ्या व खोटया परकी अतिक्रमणाच्या प्रतिकाराच्या मिषासाठी;

कधी राष्ट्रनेत्यांच्या भ्रष्याम्बोटया प्रतिष्ठेसाठी. हे लष्करी, व्यापारी, राजकीय नेते सामान्य मनुष्यापेक्षा फारसे वेगळे नसतात. अर्थात सामान्य जीवनामध्ये. सत्तेवर आरूढ झाल्यानंतर नव्हे. सत्तेवर आल्यानंतर त्यांच्याइतके बेपर्वा फारच थोडे लोक वागत असतील. सामान्य जीवनामध्ये त्यांच्या अंगातील गुणदोषांचे प्रमाण सर्वसाधारण मनुष्याच्या अंगातील गुणदोषांच्या प्रमाणापेक्षा फारसे वेगळे नसते. सामान्य मनुष्याइतकेच ते स्वार्थी असतात. वैयक्तिक फायद्याकरिता त्याच्याचइतके जाव टाकणारे, लवाडया करणारे ते असतात. खास क्रूर, दुष्ट वा विध्वंसक नाहीत. जर सामान्य जीवनात ते राहते तर वाईटापेक्षा काही भलेच त्यांच्या हातून घडले असते. परंतु ते सत्तेवर आले आणि कोटयवधी लोकांच्या मनावर, शरीरावर आणि विचारांवर त्याना अधिकार मिळाला. संहारक शस्त्रांची सूत्रे त्यांच्या हाती आली नि ते धोकादायक बनले. सत्ता त्यांच्या डोक्यात चढते. जगाला खरा धोका अशा प्रकारची सर्वंकष सत्ता हाती आलेल्या सर्वसामान्य लोकांच्याकडून आहे. अर्थात त्यांचा धोका असला तरी त्यांच्या दुष्ट कृत्याना साथ देणारी माणसे लागतातच ! ही माणसे त्यांना साथ देतात कारण त्यांच्या मनाचा कल काही प्रमाणात तरी अशा गोष्टींकडे असतो. युद्ध करण्याकरिता जशी तोफा, बंदुका, अणुबाँब आदि विध्वंसक व संहारक शस्त्रांची गरज असते, तशीच गरज द्वेष, संताप, क्रोध, भीती, विध्वंसकपणा, मत्सर आदी नकारात्मक भावनाची देखिल असते. केवळ. संहारक शस्त्र स्वत: होऊन लढत नाहीत. ती लढाई मनुष्याचे हात करतात. त्या हातामागील मेंदू करतो. भावना करतात. या विशिष्ट भावना चेतवूनच एका बाजूच्या लक्षावधी लोकाना दुसऱ्या बाजूचा लक्षावधी लोकांचा फडशा पाडण्यासाठी उद्युक्त केले जाते. तेव्हा अशा प्रकारे चेतविता येण्याकरिता मूळात मनामध्ये नकारात्मक, विध्वंसक व आक्रमक भावना जर अस्तित्वात नसतील तर लढाईची शस्त्रे अस्तित्वात असली तरी लढाई घडून येणार नाही. मात्र बाँब आणि इतर शस्त्रास्त्रे ही जशी लढाईची कारणे नसतात, तशाच प्रकारे आक्रमक भावना यादेखिल लढाईची कारणे नसतात. शस्त्रांस्त्राप्रमाणेच लढाईसाठीं ती एक आवश्यक वस्तू आहे. एक आवश्यक पूर्वअट. परंतु या पूर्वअटीचा परिणाम अपरिहार्यपणे एकाच प्रकारचा, म्हणजे युद्धाचाच झाला पाहिजे असा काही नैसर्गिक नियम नाही.

अनेक युद्धतज्ज्ञ म्हणतात की पूर्वीची हातघाईची लढाई आणि आजची दूर अंतरावरून, दूर पल्ल्याच्या शस्त्रास्त्रांच्या मदतीने केली जाणारी अण्वस्त्र लढाई यात मोठा मानसिक फरक आहे. पूर्वीच्या लढाईत आपल्या हातून काय घडत आहे हे सैनिकाला चक्षुर्वैसत्यम् पाहता येत असे. आताच्या लढाईत ते पाहता येत नाही. आताच्या लढाईत कोणी एक, हजारो मैलांवरून कुठले तरी बटण

दावतो आणि हजारो मैलांवरील लाखो लोक तडफडून प्राण सोडतात. यान न वटण दावणाराला आपल्या कृत्याचे परिणाम पाहताच येत नाही. बायोनेट वा मशिनगन वापरणाऱ्या सैनिकाला मृत्यूचे, त्याने त्याच्या कृत्याने आणलेल्या मृत्यूचे परिणाम जिथल्या तिथे पाहता येत असत. म्हणून तो मृत्यूला थोडाबहुत तरी मानीत होता. युक्तिवाद वरवर बिनतोड दिसतो. पण अधिक खोल गेल्यास नाही. अण्वस्त्रे सोडणारा मानवी जीवांची जीव जातानाची प्राणांतिक तडफड पाहत नाही हे खरे आहे. तरीपण मानवी यातनांविषयी तो कमालीचा बेपर्वा असतो हेही तितकेच खरे आहे. मनुष्य हा एकच असा प्राणी आहे की तो कल्पनाशक्तीच्या मदतीने अनेक गोष्टी बसल्या जागीही अनुभवीत असतो. अशा परिस्थितीत कोणी एकजण मृत्यूच्या प्रत्यक्ष स्थळी हजर नव्हता म्हणून मृत्यूची स्थिती त्याला कळली नाही असे म्हणण्यात काय अर्थ आहे ? तुम्ही हवे तर असे म्हणा की मरणाच्या यातनांविषयी तो बेपर्वा होता. त्याला त्याबद्दल यत्किंचितही खंत वा कदर वाटत नव्हती. **मनुष्याच्या मनाच्या तळाशी खोल कुठेतरी जीवनाविषयीची इतकी बेपर्वाई वसत असल्याशिवाय जीविताविषयी तो इतक्या कठोरपणे वागू शकणार नाही. तेव्हा मनुष्याच्या क्रूरपणाचा विचार करताना त्याच्या मनाच्या या प्रवृत्तींचाच विचार करावयास हवा.**

मनुष्याच्या मनामध्ये अशा तीन धारणा आहेत की ज्यांच्यात बिघाड झाला की मनुष्य एकदम क्रूरतेकडे व हिंसकपणाकडे झुकू लागतो. त्याला हिंसा, अत्याचार, मोडतोड, विघटन, मरण, नाश, दुर्गंधी इत्यादि विध्वंसनाच्या प्रकारांचे आकर्षण वाटू लागते. फ्रॉईडने या तीन प्रवृत्तींचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे केले आहे.— १) मृत्यू व मृत्यूशी संबंधित असणाऱ्या सर्व अवस्थांची ( विघटन. दुर्गंधी विच्छिन्नता इत्यादि ) आवड. २) स्वविषयी अतिरिक्त प्रीती व त्यातून जन्मास येणारी जगाविषयीची धास्ती व भयग्रस्तता. ३) परस्परात गुरफटलेले गोत्रगामी अनुबंध किंवा मातृप्रतिमेबरोबरचे भावनात्मक स्थिरीकरण. ( symbiotic-incestuous fixation. )

जर का काही कारणानी ह्या दोन्ही धारणा एकत्रित झाल्या तर त्यांच्या मिलाफातून केवळ विध्वंसन आणि विघटनाकडे, मृत्यू आणि नाशाकडे ओढ घेणारे व्यक्तिमत्व तयार होते. ह्या व्यक्तिमत्वाला वधाकरिता वध हवा असतो. रक्त-पाताकरिता हत्या हवी असते. याच्या उलट जीवनाकरिता जीवनावर प्रेम करणारे एक व्यक्तिमत्व आहे. या व्यक्तिमत्वाला जे, जे जिवंत ते, ते पवित्र व अतएव रक्षणीय वाटते. पहिल्या वृत्तिधारणेमध्ये आत्मद्वेष म्हणून परद्वेष किंवा विकृत आत्मानुरक्ती म्हणून परभीती व परद्वेष आढळतो. असो.

आपणाला येथे मनुष्याच्या हिंसक मूलवृत्तीचा अभ्यास करायचा आहे. कारण हा अभ्यास आपण केला तरच माणसे कोणत्या गोष्टीमुळे हिंस्र व नृशंस बनतात व काय केले म्हणजे ती तशी बनणार नाहीत याचा शोध आपणास घेता येईल. अर्थात आपला हा अभ्यास हिंसेच्या तीव्रतम प्रकारांचाच असू शकतो. परंतु एकांतिक प्रकारच्या हिंसकपणाचा अभ्यास करता येण्यासाठी हिंसकपणाच्या प्राथमिक व दुय्यम पायऱ्यांचाही अभ्यास करावा लागतो. कारण तसे केले तरच काही महत्त्वाचे आपल्या हाती लागेल.

मनुष्याचा हिंसकपणा ही एक अजिबात वेगळी गोष्ट आहे. तीत उत्स्फूर्तपणा किंवा नैसर्गिकपणा नसतो. त्यामुळे मनुष्याच्या केवळ हिंसक वर्तनाकडे पाहून त्या वर्तनाचा किंवा त्या वर्तनामागील प्रेरणांचा उलगडा आपणास होत नाही. पशूंच्या बाबतीत त्यांचे बाह्य वर्तन म्हणजेच प्रेरणा असतात. मनुष्यामध्ये जाणीव, स्मृती इत्यादी आहेत. तेव्हा त्याच्या प्रेरणांचा सरळ आविष्कार दृष्टोत्पत्तीस येत नाही. त्याच्या प्रेरणा अबोध असतात आणि त्या इतक्या अबोध की त्यालाही त्यांचे आकलन होत नाही. तेव्हा मनुष्याच्या वर्तनाचा उलगडा करता येण्यासाठी त्याच्या वर्तनामागील अबोध व सुप्त प्रेरणांची तड लावावी लागते.

आक्रमकपणाचे प्रकार अनेक असू शकतात. त्यापैकी आपल्या ओळखीचा प्रकार खेळातील खेळाडू प्रतिस्पर्ध्यांमधील आक्रमकपणाचा प्रकार होय. आक्रमकपणाचा हा प्रकार त्यातल्या त्यात निरुपद्रवी आहे. कारण त्यामागील मुख्य हेतू स्वतःचा वरचढपणा प्रकट करणे हा असतो. प्रतिस्पर्ध्याला जायबंदी करावे हा नसतो. या प्रकारच्या आक्रमकपणामागे हिंसाचार असला तरी विध्वंसनाची वा रक्तपाताची इच्छा नसते. आपल्या कौशल्याचे सार्वजनिक प्रदर्शन एवढाच हेतू त्यामागे असतो.

खेळ, क्रीडांमधून प्रकट होणारा आक्रमकपणा हा आक्रमकपणाचा एक प्रकार झाला. हा अतिशय सौम्य प्रकार असून तितकाच निरुपद्रवीही तो आहे. आक्रमकपणाचा दुसरा प्रकार हा प्रतिकारात्मक प्रकार होय. तुम्हाला कोणी तरी दुखवू पाहतो, तुमची खोडी काढतो व त्या खोडीचा बंदोबस्त करण्यासाठी तुम्ही आक्रमक वागता. जर तुमची खोडी काढली गेली नसती तर काही तुम्ही आक्रमक वागला नसता. म्हणजेच एका क्रियेला प्रतिक्रिया म्हणून तुम्ही आक्रमक वागता. अनेक कारणांसाठी या प्रकारचा प्रतिकारात्मक आक्रमकपणा मनुष्ये दाखवीत असतात.उदा., आपल्या जिवाच्या रक्षणासाठी, स्वातंत्र्याच्या, दौलतीच्या, प्रतिष्ठेच्या इत्यादि अनेक गोष्टींसाठी हिंसक वागावयास ती तयार होतात. अशा वेळी मनुष्ये आपले भान

विसरतात. आपण कोण व काय करीत आहोत याची शुद्ध गमावितात, क्रुद्ध होतात. जीवाची तमा बाळगीनातशी होतात. अशा अनेक अविचारी पद्धतीने ती वागतात. परंतु या प्रकारच्या आक्रमक आविष्काराचे एक मोठे वैशिष्टच आहे. ते हे की कसल्या ना कसल्या खऱ्या वा काल्पनिक कारणांवाचून या प्रकारची प्रतिक्रिया कधीही प्रकट होत नाही. प्रत्यक्षात तुम्ही दुखावले गेले असल्यावाचून अथवा आपण दुखावले गेलो आहोत अशी तुमच्या मनाची कल्पना झाल्यावाचून तुम्ही आक्रमक पवित्रा घेत नाही. याचाच अर्थ असा की हा क्रुद्धपणा ( वा आक्रमकपणा) कसल्या ना कसल्या सत्य वा काल्पनिक कारणांसाठीच प्रकट होतो. असे कारण नसेल तर तो प्रकट होणार नाही. आक्रमकपणातील आनंदासाठी तो प्रगट होत नाही. तेव्हा या प्रकारच्या ज्या आक्रमक कृती वा प्रतिक्रिया असतात त्या जीवनाच्या सेवेसाठी घडत असतात. मृत्यूच्या वा विध्वंस आणि नाशाच्या नव्हे. याचाच अर्थ पुन्हा असा की या प्रतिक्रिया पूर्णांशाने अविचारी विकारी नसतात. त्यांच्यामध्ये बुद्धीचा व विचाराचा काही ना काही अंश आहे.

कित्येकदा ज्या कारणासाठी व भयांसाठी ती कारणे वा भये प्रत्यक्ष व खरीही नसतात. तर राजकीय वा धार्मिक पुढाऱ्यांनी कल्पनेंन रचून तयार केलेली असतात धार्मिक वा राजकीय पुढारी स्वार्थासाठी वा दुसऱ्या अशाच फक्त त्यांनाच ज्ञात असणाऱ्या कारणांसाठी अशा प्रकारची खोटी स्फोटक परिस्थिती निर्माण करतात. कधी धर्मावर घाला आल्याची बनावणी करून, कधी देशावर संकट आल्याचा खोटाच ओरडा करून हे लोक जनतेचा प्रतिक्रियात्मक राग जागृत करतात. तेव्हा खऱ्या भयापोटी वा कारणासाठी जसा प्रतिक्रियात्मक आक्रमकपणा जागृत करता येतो, तशाच प्रकारे खोटया, काल्पनिक व लबाडीने रचलेल्या कारणांसाठीही तो जागृत करता येतो.

युद्धात उतरलेला प्रत्येक पक्ष आपली बाजू सत्याची होती व प्रतिपक्षाची बाजू असत्याची होती असा ओरडा करीत असतो. आता त्यातील कुणाची बाजू खरोखरच सत्य होती हे फक्त इतिहास व काळ म्हणजेच इतिहासकार ठरवू शकतो. ते सुद्धा ती प्रत्यक्ष घटना घडून गेल्यानंतर बराच कालावधी लोटल्यावर. युद्ध चालू असताना वा ते संपल्यानंतर लगेच त्यासंबंधी काहीच ठामपणे सांगता येत नाही. युद्ध चालू असताना मात्र आमचे युद्ध हे आत्म-बचावाचे युद्ध आहे, त्यात आक्रमकपणा बिलकूल नाही असे प्रत्येकजण कंठरवाने ओरडत असतो. आमचे युद्ध आक्रमकपणासाठी नाही असा कांगावा प्रत्येक पक्ष करतो वा त्याला तसा कांगावा करणे भाग पडते. याचा अर्थ असा आहे की, बहुसंख्य जनता ही केवळ युद्धासाठी युद्ध करावयास

उत्सुक नसते. युद्धाला प्रवृत्त होण्यासाठी तिला खरी वा खोटी पण पटतील अशी कारणे हवी असतात. तिला युद्धाची कृती न्याय्य वाटावी लागते. हे युद्ध आपल्या स्वातंत्र्याच्या रक्षणासाठी परचक्राच्या प्रतिकारासाठी, राष्ट्रीय अस्मितेच्या रक्षणासाठी आहे. असे काही तरी दैदिप्यमान तिला वाटल्यावाचून ती युद्धाला तयार होत नाही. दुसरी गोष्ट अशी की युद्धजन्य परिस्थिती निर्माण झाली आहे, अशा प्रकारची बहुजनसमाजाची खात्री पटविता येणे व त्यांना युद्धोत्सुक करणे ही गोष्ट राजकीय पुढाऱ्यांना सहजसाध्य असते. आत्मबचावाचे वा प्रतिष्ठासंरक्षणाचे कल्पित फार सहजपणे ते जनतेच्या गळी उतरवू शकतात. म्हणजे या बाबतीत जनता कमालीची भोळी व साधी असते. जनतेला फसविता येणे जर इतके सोपे नसते तर आजवर इतकी युद्धे जगात घडूनच आली नसती. तेव्हा खरी वा खोटी भीती जनतेच्या मनामध्ये जागृत करता येणे ही गोष्ट तशी फार सुलभ आहे. ही भीती निर्माण करता येते याला कारणे दोन–१) बरीच मनुष्ये स्वतंत्रपणे विचार करावयास अपात्र असतात. तशी सवयच त्यांनी आपल्या अंगात बाणविलेली नसते. कुणाची तरी तयार मते हे त्यांचे विचार असतात म्हणून वर्तमानपत्रे, पुस्तके व पुढारी त्यांना जे सांगतात ते त्यांच्या दृष्टीने धर्मसत्य असते. कुठल्याही प्रश्नावर साधकबाधक विचार करून निर्णय घेण्याची शक्ती त्यांच्यापाशी नसल्याने ते तयार मतांना बळी पडतात. दुसरे कारण असे की बहुसंख्य जनता भावना आणि विचार या बाबतीत फारशी प्रगल्भ व परिपक्व नसते भावना आणि विचाराच्या बाबतीत तिला स्वातंत्र्य आलेले नसते. त्यामुळे भावना भडकाविल्या गेल्या की त्यांचे विचारही भडकतात. तसेच भावनात्मक परिपक्वता न आल्यामुळे भावनात्मक धैर्यासाठी आणि आधारासाठी ते त्यांच्यातील नेतेलोकांवर विसंबून राहतात. वयाने लहान व भावना परिपक्व न झालेल्या बालकाला जसे त्याचे वडील, तशाच प्रकारे भावनांनी बालक राहिलेल्या या प्रौढ लोकांना प्रौढत्वाचा आव आणणारा पुढारी असतो. भावनात्मक परावलंबित्व जर इतक्या मोठ्या प्रमाणात वयाने प्रौढ असलेल्या नागरिकात वसत नसेल तर भावनात्मक आधारासाठी व धैर्यासाठी त्यांनी स्वतः-बाहेर व त्रयस्थ पुढाऱ्याकडे पाहिले नसते व पुढाऱ्यानाही त्यांच्या मनावर असे प्रचंड अधिराज्य गाजविता आले नसते. मनुष्ये भावनिकदृष्ट्या अपरिपक्व असल्या-मुळेच केवळ चतुर व भाषणपटू पुढारी आपल्या आक्रमक व दणकेबाज भाषणाने भोळ्या जनतेला भूल घालू शकतो. जनतेच्या मनाने एकदा भयाची सूचना स्वीकारली की मग त्यांची शारीरिक प्रतिक्रिया खऱ्या भयाच्या बाबतीत होते तशीच येथेही होते. म्हणजेच ती आक्रमक प्रतिकाराला सज्ज होतात. शत्रूचा नायनाट करावयास कटिबद्ध होतात.



अनुक्रमणिका

प्रतिक्रियात्मक आक्रमकपणाला बरीच अंगे आहेत त्यातील आणखी एक अंग म्हणजे निराशेतून जन्मणारा आक्रमकपणा किंवा क्रोध होय. समजा तुम्हाला एखादी वस्तू अगदी तीव्रतेने हवी आहे व ती तुमच्या हक्काने हवी आहे, अशावेळी तिसऱ्याच कुणी ती लाटली तर तुमच्या अंगाचा अगदी तिळपापड होतो. त्या तिसऱ्या इसमाला खाऊ की गिळू असे तुम्हाला होते. आता ही जी संतापाची प्रतिक्रिया आहे, ती हक्काने मिळावयाची वस्तू न मिळाल्यामुळे होईल तशीच तुम्हाला हवीशी वाटणारी वस्तू न मिळाल्यामुळेही होईल. ती लहान मुलांच्या बाबतीत होईल तशीच प्रौढांच्या आणि वृद्धांच्या बाबतीतही होईल; किंबहुना जनावरेदेखिल अशा परिस्थितीत तशीच वागतील. अर्थात हा जो संताप आहे तो जरी कितीही वाईट असला तरी तो जीवनाच्या सेवेतील संताप असतो. व्यर्थ, निरर्थक व वांझ संताप तो नाही. जीवनासाठी ही प्रतिक्रिया जागृत होत असते. आपल्या अनेक इच्छा व अपेक्षा जीवनात अपुऱ्या राहून असतात व त्यामुळे आपल्या जीवाचा तडफडाटही होत असतो. ही एक सर्वत्रिक स्थिती आहे. परतु या तडफडाटाचा रोख जीवनविरोधी नसून तो जीवनसाह्यकारी असतो.

आक्रमकपणाचे आणखी एक रूप म्हणजे मत्सर आणि हेव्यामुळे मनुष्ये वैरबुद्धी बनतात ते होय. तुमच्या शेजाऱ्यापाशी एखादी वस्तू आहे; तुम्हाला तो वस्तू आवडली आहे पण ती विकत घेण्याची ऐपत तुमच्यापाशी नाही; मग तुम्ही तुमच्या शेजाऱ्याचा हेवा करू लागता; त्याचा दुस्वास करू लागता. मत्सर आणि त्या मत्सरातून जन्मणारा दुस्वास ही निराशेच्या भावनेची खास प्रतिक्रिया आहे. तुम्हाला हवी असलेली वस्तू तुम्हाला मिळत नाही पण त्याच वेळी ती तुमच्या शेजाऱ्याला मिळते; या परिस्थितीतून तुमची निराशा तीव्र बनून संताप जागृत झालेला असतो. म्हणजे याही ठिकाणी हा संताप व आक्रमकपण जीवनसेवाभावी आहे.

प्रतिक्रियात्मक आक्रमक क्रोधाचा आणखी एक प्रकार म्हणून सूडाच्या भावनेचा उल्लेख करता येईल. सूडबुद्धी क्रोध हा क्रोधाचा विकृत व रोगट प्रकार आहे कारण या प्रकारच्या क्रोधाचा रोख जीवनविरोधी आहे. या ठिकाणी क्रोधाची भावना कुठल्याही प्रकारे जीवनाला साह्यकारी नसते. सूडप्रेरित भावनेत द्वेषासाठी द्वेष असतो. जे काही नुकसान झालेले असते ते पूर्वीच झालेले असते व आता तुम्ही काही केलेत तरी ते भरून येणार नसते. फक्त ते नुकसान करणाराला धडा शिकविल्याचे समाधान मात्र तुम्हाला मिळणार असते. म्हणूनच या प्रकारची सूडाची कृती ही निष्फळ असते. अहित भरून येण्याच्या बाबतीत तिचा तादृश काहीही फायदा नसतो. असो.







प्रतिकारात्मक आक्रमकपणाचे शेवटच्या प्रकाराव्यतिरिक्तचे सर्व प्रकार हे जीवनसेवाभावी असतात. हा शेवटचा प्रकार मात्र जीवनसेवेच्या दृष्टीने निष्फळ असून उलट जीवनविरोधीच आहे. कारण त्यात शक्तीचा अपव्यय आहे. सूड-भावना अशिक्षित अडाण्यांत तशीच शिक्षित शहाण्यातही आढळते. या भावनेचे एक मोठे वैशिष्ट्य हे की दुबळ्यांमध्ये तीची तीव्रता अधिक असते. सामर्थ्यवानांत ती कमी प्रमाणात असते. मनुष्य जितका अधिक असर्जनशील व अनिर्माणक्षम तितका तो अधिक संतापी, मत्सरग्रस्त व सूडप्रेरित असतो. सर्जनशील व निर्माण-लोक आपले वैफल्य, निराशा, संताप व क्रोध निर्माणशील कामात खर्च करू शकतात आपल्या नकारात्मक भावनांना निर्माणशील वाट करून देऊ शकतात. निःशक्त आणि दुबळ्यांना (शारिरीक व मानसिक दृष्टीनेही) द्वेष व मत्सर करण्याव्यतिरिक्त दुसरा कोठलाच मार्ग उपलब्ध नसतो. आपला दुखावलेला अहंकार भरून काढण्याचा व आपला श्रेष्ठपणा जगाला पटविण्याचा इतर कोठलाही मार्ग त्यांना उपलब्ध नसल्याने दुसऱ्याचा सूड घेणे, त्याचे शारीरिक वा मानसिक नुकसान करणे अशासारखा नकारात्मक मार्ग ते स्वीकारतात. डोळ्या-साठी डोळा आणि दातासाठी दात हे तत्वज्ञान नेहमी दुबळ्या, अशक्त जीवां-साठी असते. पराक्रमी, शक्तिमान लोकांसाठी नाही. विशेषतः जे सर्जनशील व निर्माणशील असतात त्यांना तर सूडाच्या कल्पनेची गरज केव्हाच भासत नाही. ते सर्जनशील असल्याने मुळातच ते स्वतःवर एक प्रकारे संतुष्ट असतात. (अर्थात आत्मसंतुष्ट नव्हे, आत्मसंतुष्ट मनुष्य सर्जनशील होऊच शकणार नाही. त्याच्या कुठल्याही कृतीत प्रगती दिसणार नाही) सर्जन ही सर्जनशील लोकांच्या आक्रमकपणाला एक निर्धास्त वाट असते. जे मनाने दुबळे व अशक्त असतात ते स्वतःवर, स्वतःच्या सामर्थ्यावर विसंबून राहू शकत नाहीत. त्यांना कुणा ना कुणा समर्थाचा आधार हवा असतो अशी मनुष्ये सूडाच्या प्रकाराला जीवनात फार महत्त्व देतात. त्यांच्या बाबतीत सूड हा निष्फळ जीवनाला अर्थ देऊ शकणारा एक अर्थप्रत्यय असतो. वैचारिक व भावनात्मक परिपक्वता आलेली मनुष्ये जीवनात त्या मानाने कमी प्रमाणात परावलंबी असतात. मानसिक दुबळ्यांच्या बाबतीत सूड त्यांच्या आत्मप्रतिष्ठेचा, अस्मितेचा, अहंकाराचा आधार असतो. सूडाच्या भावनेचा आधार या भावनांना नसेल तर या भावना तेव्हाच कोसळून पडतील. मानसिक दुबळ्यांप्रमाणेच आर्थिक, सांस्कृतिक व भावनात्मक बाबतीत मागे असलेले समाजही सूडाच्यात्र भावनेवर जगत असतात. त्यांची सगळी आत्मप्रतिष्ठेची भावना या एका प्रतिक्रियेच्या शक्तीवर उभी असते. (उदा., मागे होऊन गेलेल्या राष्ट्रीय पराभवाचा सूड वगैरे) प्रगत औद्योगिक राष्ट्रांमधील कनिष्ठ मध्यम-

वर्ग ( कारकून वगैरे ) हा देखील सूडभावनेवरच जगणारा वर्ग असतो. निर्मा-जाद धंदेव्यवसायातून उठविला गेलेला हा वर्ग तेथील लोकांमध्ये सर्वात अधिक दुरावलेला व न्यूनगंडाने घेरलेला आणि म्हणूनच सूडबुद्धीने संतापलेला वर्ग असतो. याच वर्गाला जातीयवादी अथवा एकांतिक राष्ट्रवादी तत्त्वज्ञानाचे आकर्षण असते. त्याचेही कारण अर्थात वर दिले हीच परिस्थिती होय.

सूडभावनेचे दुसरे भावंड म्हणजे श्रद्धेची भावना भंगल्यानंतर जन्मास येणारी विध्वंसक वृत्ती. ही वृत्ती मुख्यतः बालकांमध्ये उत्पन्न होत असते.

बालकाच्या आयुष्याचा प्रारंभच मुळी वडील माणसांवरील श्रद्धेतून होत असतो. वडील माणसांच्या चांगुलपणावरील श्रद्धा, त्यांच्या सामर्थ्यावरील श्रद्धा, त्यांच्या न्यायीपणावरील श्रद्धा अशा विविध प्रकारे ही श्रद्धा प्रकटत असते. भूक लागताच आई दुधाशी धरील, थंडी लागताच ती पांघरूण घालील ही त्याची श्रद्धा असते. कुणी मारावयास आल्यास बाप त्याचा प्रतिकार करील, आपला बाप आपल्यावर अन्याय होऊ देणार नाही ही त्याची श्रद्धा असते. आई, बाप, आजा, आजी, काका, काकी यापैकी कुणाच्याही बाबतीत मुलाची ही श्रद्धाभावना काम करीत असते. कधी देवावरील विश्वासाच्या रूपानेही ही श्रद्धा बाहेर पडते. परंतु ही श्रद्धा भंगली की श्रद्धा या भावनेविषयीच त्याच्या मनात अविश्वास निर्माण होतो. त्या अविश्वातून त्याच्या मनाची तडफड होते व त्याला तो विश्वासघात करणाऱ्या लोकांचा सूड घ्यावासा, व प्रतिकार करावासा वाटू लागते. ही श्रद्धा नाहीशी व्हायला फार मोठे कारण घडावे लागते असेही नाही. कधी मूल फार घाबरलेले असते. त्याला वाटते की आपल्या आईने वा वडिलांनी आपणास जवळ घ्यावे, हृदयाशी धरावे व समजवावे. आईवडिलांना यापैकी काहीच कळत नाही व ती त्या मुलाच्या भावनेकडे दुर्लक्ष करतात व मूल दुखाविले जाते. आईवडिलांवरील त्याच्या विश्वासाला तडा जातो. परमेश्वरावरील श्रद्धा देखील अशाच कारणांसाठी नाहीशी होते. परंतु जेव्हा कधी श्रद्धा नाहीशी होते तेव्हा त्या मुलाच्या जीवनात एक विचित्र व अकारण पोकळी निर्माण होते. त्याला सगळे जीवनच भीतीग्रस्त वाटू लागते. अर्थात लहानपणी प्रत्येक मूल अनेक भ्रमनिरासाच्या प्रसंगातून गेलेले असते. पण काही कारणाने एखादा प्रसंग त्याच्या मनावर कायमचा परिणाम करून जातो व त्याचे सर्व जीवन बिघडवितो. श्रद्धाभंगाच्या प्रतिक्रिया अनेक आहेत. कधी एखादा इसम त्याची श्रद्धा मोडल्यामुळे भावनांनी आणि विचारांनी पूर्वीपेक्षा अधिक स्वतंत्र बनतो. मनाने आणि विचाराने अलिप्त बनतो. म्हणजेच त्याच्या व्यक्तिमत्त्वाला प्रगल्भता येते. दुसरा एखादा एकदम कडवट बनतो. त्याला कशाहीवर विश्वास ठेवावासे वाटेनासे होते.

सर्व गोष्टींच्या बाबतीत तो संशयी होतो. तर इतर काही एका ठिकाणी भ्रमनिरास झाला की दुसरीकडे वळतात. तिथेही भ्रमनिरास झाला की तिसरीकडे वळतात व असे होता होता व्यक्तित्वाने इतके दुबळे आणि निःशक्त बनतात की शेवटी एखाद्या हुकूमशहाच्या नाही तर बुवाबावाच्या नादी लागतात. तरुण असले तर बहुधा कठोर, आत्मनिष्ठ व अहंकेंद्रित हुकूमशहा व त्याची अभेद्य, चिरेबंदी संस्था यांच्याच नादी लागतात. बरीच तरुण मंडळी आजकाल कडव्या हुकूमशाही वृत्तीच्या पुढाऱ्यांच्या कच्छपी लागलेली आढळतात त्याचे महत्त्वाचे कारण हे आहे. नष्ट झालेली स्वतःवरील श्रद्धा निर्माण करण्याचा तो त्यांचा अखेरचा प्रयत्न असतो. कधी कधी जीवनावरचा विश्वास नाहीसा झालेले लोक धन, सत्ता, पदप्रतिष्ठा, स्त्रिया यांच्या मागे लागतात व अशा प्रकारे स्वतःचा न्यूनगंड व भयग्रस्तपणा विसरू पाहतात किंवा इतरांपासून व स्वतःपासून लपवू पाहतात.

परंतु हिंसकपणाच्या दृष्टीने पाहिल्यास विश्वास नष्ट होण्याची महत्त्वाची प्रतिक्रिया यापेक्षा वेगळीच आहे. जगामध्ये ज्यांची फार वंचना व फसवणूक घडून आली अशा व्यक्ती केवळ जीवनाकडे व स्वतःकडेच पाठ फिरवतात असे नसून, त्या जीवनाचा व स्वतःचा आणि त्याजबरोबर इतरही लोकांचा तीव्र द्वेष करू लागतात. जीवन ही वस्तूच त्यांना द्वेष्य वाटू लागते. त्यांचे सर्व आयुष्यच विषारी बनून जाते. ते तुच्छतावादी आणि जीवनविध्वंसक बनतात. व्यक्तीच्या खाजगी आयुष्यात जी प्रक्रिया घडते तीच तिच्या सार्वजनिक आयुष्यातही घडत असते ही गोष्ट जर आपण विचारात घेतली. तर सार्वजनिक पुढाऱ्यांच्या बदमाषगिरीमुळे, नालायकपणामुळे, भ्रष्टाचारामुळे, कपटीपणामुळे व एकूण हलकटपणामुळे दुखावला गेलेला मनुष्य जीवनाशी कशा प्रकारे वागेल याचा कयास करावयास श्रम पडणार नाहीत. असे लोक निश्चितच जीवनातून उठतील. त्यांना जीवनाविषयी विश्वास राहणार नाही. सर्व गोष्टींविषयी त्यांना एक प्रकारची तुच्छता वाटू लागेल. ते विध्वंसक वृत्तीचे होतील (आज आपल्याकडे जो प्रकार चालला आहे तो याच प्रकारचा आहे कुणाही पुढाऱ्याविषयी आपल्या तरुणवर्गाला खात्री नाही. मग तो पुढारी राजकीय क्षेत्रातील असो, सामाजिक क्षेत्रातील असो वा शैक्षणिक क्षेत्रातील असो. आमचा तरुणवर्ग संपूर्णपणे तुच्छतावादी व विध्वंसक बनला आहे याला कारण आमच्या पुढाऱ्यांचे दुटप्पी धोरण. ते सार्वजनिक ठिकाणी एक बोलतात व प्रत्यक्षात त्याच्यापेक्षा वेगळे वागतात. पुढारी म्हणजे अगदी सार्वजनिक व्यासपीठावरून बोलणारे लोकच नव्हेत; तर आमचे शिक्षक, प्राध्यापक, लेखक हीही मंडळी त्यात मोडतात.)







क्रोध व आक्रमकपणाचे अनेक प्रकार वर आपण वर्णिले. हेच सर्व प्रकार काही ना काही प्रमाणात तरी जीवनसंवर्धनासाठी आहेत. जीवनासाठी प्रकटणारे आहेत. आक्रमकपणाचा आता जो प्रकार आपण पाहणार आहोत तो मात्र सर्वस्वी जीवनद्वेषी असा आहे. हा प्रकार म्हणजे न्यूनगंडप्रेरीत हिंसकपणा होय.

एका दृष्टीने पाहिल्यास मनुष्य हा सर्वस्वी पराधीन असा प्राणी आहे. निसर्ग आणि समाज या दोन्ही शक्ती त्याच्या जीवनावर त्याच्या जन्मापासून ते थेट तो मरेपर्यंत वर्चस्व गाजवीत असतात. त्यामुळे एका अर्थाने मनुष्य हा नैसर्गिक व सामाजिक शक्तीच्या हातातील एक खेळणे आहे. परंतु दुसऱ्या एका अर्थाने मनुष्य हा कमालीचा स्वतंत्रही आहे. मनुष्याच्या ठिकाणी स्वतंत्र कल्पनाशक्ती व इच्छा-शक्ती आहे. त्याला कल्पना करता येतात, तशाच इच्छाही करता येतात. या त्याच्या कल्पनाशक्तीवर इतरांचा सोडाच परंतु प्रत्यक्ष त्याच्या शरीराचाही ताबा चालत नाही. ही कल्पनाशक्ती त्याला एकाच स्थितीचे अनेक पर्याय दाखविते. उद्याच्या अवस्थेची कल्पना आजच देते व अशा प्रकारे भविष्याविषयी सावध करते. तेव्हा मनुष्याची कल्पनाशक्ती, इच्छाशक्ती व संकल्पशक्ती विचारात घेतल्यास मनुष्य स्वतंत्र आहे ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. हे स्वातंत्र्य किती आहे ही गोष्ट या ठिकाणी महत्त्वाची नाही. मनुष्य स्वतंत्र आहे ही गोष्ट महत्त्वाची आहे. जग आणि निसर्ग जसा त्याच्या व्यक्तिमत्वावर ठसा उमटवितात, त्याचप्रमाणे मनुष्यही थोडाफार प्रमाणात आपल्या व्यक्तिमत्वाचा ठसा त्याच्यावर उमटवित असतो. निदान असा ठसा उमटविला जावा असे त्याला वाटत असते. मनुष्याला कल्पनाशक्ती व इच्छाशक्ती असल्यामुळे पूर्ण पराधीनतेची भावना त्याला नेहमीच दुःसह होणारी असते. मग तो मनुष्य कितीही क्षुद्र व क्षुल्लक असू द्या.

मनुष्यामध्ये कल्पनाशक्ती आहे याचाच अर्थ त्याच्यामध्ये निर्माणशीलतेची प्रवृत्ती आहे. मनुष्यामध्ये एक जर मोठा गुण कोणता असेल तर तो कृतीशीलतेचा होय. मनुष्याला केवळ आळसात लोळत पडावयास आवडत नाही. त्याला काहीना काही निर्माण करावयास आवडते. मग हे निर्माण करणे सघन वस्तूंच्या रूपातील प्रत्यक्ष निर्मिणे असेल किंवा कथा, काव्य तत्त्वज्ञान इत्यादींसारखे वैचारिक निर्मिणे असेल. परंतु त्याची कल्पनाशक्ती त्याला स्वस्थ बसू देत नाही, ही गोष्ट सत्य आहे. ही कल्पनाशक्ती त्याला सतत कांहीतरी शारिरीक वा मानसिक व्यवधानात गुंतवून ठेवते. मनुष्यामध्ये जी ही निर्माणशीलता आहे ती भिन्न भिन्न मार्गांनी प्रकटत असते. मनुष्याच्या कला, त्याचे परिश्रम, त्याचे कामजीवन हे सर्व याच निर्माणशीलतेचे आविष्कार आहेत. मनुष्याची कल्पनाशक्ती त्याला प्रयोजन सुचविते, त्याची इच्छाशक्ती ते प्रयोजन स्वीकारते व त्यावर आपले सगळे मन एकाग्र करून ते तडीस नेते. निदान ते तडीस नेण्यासाठी झटते. मनुष्यांचे सगळे

श्रेष्ठत्व त्याच्या या इच्छिण्यात व इच्छिलेल्या वस्तूवर मन एकाग्र करण्याच्या शक्तीत साठविलेले आहे. हेच मनुष्याचे कर्तृत्व व तीच त्याच्या जीवनाची इति-कर्तव्यता. त्याची क्षमता, त्याचे सामर्थ्य (Potency) ते हेच. (लैंगिक क्षमता हा यातील एक प्रकार.) त्यामुळे मानसिक वा शारीरिक दुबळेपणामुळे वा अपंग-त्वामुळे जर कोणी आपले कर्तृत्व प्रकट करू शकत नसेल तर तेवढ्या प्रमाण त्याच्या समाजबंधुंमध्ये तो कमजोर ठरतो. वांझ व निष्फल ठरतो. परंतु अशा प्रकारची कमजोरी, निःशक्तता व निरर्थकता सहन करणे ही एक अतिशय कठीण गोष्ट असते. कुठल्याही मानवी मनाला तो सहन होत नाही. अशा वेळी मनुष्य कसल्याने ना कसल्या मार्गांनी आपले श्रेष्ठत्व, आपली लायकी, आपले महत्त्व स्वतःला व इतरांना पटवून देण्यासाठी प्रयत्न करू पाहतो. आता जो मनुष्य मुळातच निःशक्त आणि दुबळा आहे, अकर्तृत्ववान आहे त्याला एकट्याच्या जोरावर तर हे करता येत नाही. मग त्याच्यापुढे उरतात ते दोन पर्याय. कुठल्यातरी बलाढ्य संस्थेत सामील होणे व त्या संस्थेच्या कार्यकर्त्यांच्या कर्तबगारीत स्वतःच्या जीविताची इतिश्री मानणे. एखाद्या जबरदस्त व्यक्तिमत्वाच्या पुढाऱ्याचा अनुयायी होणे व त्याच्या पराक्रमात जीविताची इतिकर्तव्यता मानणे. एखाद्या कठोर व कर्तबगार हुकूम-शहाच्या चळवळीत सामील होणे त्याच्या कर्तबगारीत व कृत्यात मनाने एकरूप होऊन स्वतःच्या मोठेपणाची अनुभूती घेणे. हे मार्ग दुबळेपणाचे खरे. परंतु त्यातल्या त्यात ते रचनात्मक आहेत. ज्यांना हेही जमत नाही, जे कर्तबगार जीवनाचा आभास स्वतःसाठी निर्माण करू शकत नाहीत, ते मग विधातक, विध्वंसक जीवनाकडे वळतात. हिंसाचार, विध्वंसन करून आपल्या अस्मितेचा प्रत्यय स्वतःला व इतरांना देऊ पाहतात.

मनुष्याला संपूर्ण पराधीनता व त्या पराधीनतेमधे जन्मणारी अगतिकता सहन होत नसते. पराधीनता व अगतिकता म्हणजे गतीचा अभाव. बद्धतेचा अनुभव. परंतु मनुष्य हा कल्पनाशक्ती असणारा प्राणी असल्याने पूर्ण अगतिकता तो कधीही मुकाट स्वीकारू शकत नाही. अगतिकतेमुळे तो प्रक्षुब्ध बनतो. कुठल्या ना कुठल्या प्रकारे त्याला स्वोल्लंघन आवश्यक असते. प्राप्त स्थितीच्या पलीकडे गेल्यावाचून त्याच्या जीवाला स्वास्थ्य मिळण्यासारखे नसते. जनावराप्रमाणे एका जागी राहणे त्याला शक्य नसते. कुठल्या ना कुठल्या मार्गाने तो त्या स्थितीच्या बाहेर पडू पाहतो. त्याच्यापाशी उत्तम प्रकारची कल्पकता असेल तर उत्तम काव्य रचून, उत्तम कथा रचून, संगीत वा कादंबरी रचून किंवा चित्र काढून तो त्या स्थितीच्या पलीकडे जाऊ शकतो. परंतु ज्यांच्यापाशी कल्पकतेचा स्वल्पही नसतो असे लोक विध्वंसाची, हिंसाचाराची चित्रे रंगवून वा तशा

प्रकारच्या कृत्यात भाग घेऊन स्वतःच्या पलीकडे जाण्याची आपली इच्छा व ओढ पुरी करतात. रचनेपेक्षा विध्वंस ही एक अत्यंत सोपी गोष्ट आहे. मोडतोड, नाश, हिंसा यासाठी फारशा अक्कलेची गरज नसते. एका विशिष्ट प्रकारची मानसिक बेपर्वाई त्याकरिता पुरेशी असते. दुसऱ्याच्या जीविताविषयी बेपर्वाई, दुसऱ्याच्या वित्ताविषयी बेपर्वाई, या प्रकारच्या बेपर्वाईनी आपण विध्वंसन तरी सहजी करू शकतो कृतीशीलता, स्वःतपलीकडे जाणे, स्वोल्लंघन ही मनुष्याची मूलभूत प्रवृत्ती आहे. ती त्याला रचनात्मक मार्गाकडे नेते किंवा विध्वंसक, विघातक मार्गाकडे नेते. परंतु त्याला एका जागी स्वस्थ मात्र बसू देत नाही. स्वस्थ बसणे म्हणजे कमजोरी, निःसत्वता, षंढत्व. असा कोणता मनुष्य षंढत्वाची टोचणी सहन करील ? जीवनातील निर्मितीकरिता अनेक गुणांची आवश्यकता असते. विध्वंसनाकरिता मात्र यापैकी एकही गुण लागत नाही. विध्वंसनाकरिता फक्त एक गुण किंवा दुर्गुण लागतो. तो म्हणजे बळाचा वापर करण्याची इच्छा व कुवत. नि शक्त व दुबळ्या मनुष्याच्या हाती सुरा अथवा पिस्तूल किंवा सत्ता आली की पहिल्याने तो काय करीत असेल तर त्याच्यापेक्षाही दुबळ्या लोकांचा छळ. सत्तेचा वापर तो विध्वंसाकरिता करितो व अशा प्रकारे स्वतःच्या पलीकडे जाऊ पाहतो. या प्रकारे एका अर्थाने तो सर्व जीवनावरच सूड घेऊ पाहत असतो. ज्या जीवनाने त्याला रचनात्मक मार्ग मोकळा ठेवला नाही, ज्या जीवनाने त्याला कल्पकतेची देणगी दिली नाही, त्या जीवनावरील तो त्याचा वांझ सूड असतो. अपंग, षंढ बनवून जीवनाने त्याची वंचना केलेली असते. या वांझपणातून जन्मलेल्या हिंसकपणाला न्यूनप्रेरित हिंसकपणा म्हणतात. निर्मिती आणि विध्वंसन या दोन्हीही क्रिया पराधीनता व अगतिकतेच्या टोचणीपलीकडे नेणाऱ्या क्रिया आहेत. आपण कोणी तरी आहोत असे वाटावयास लावणाऱ्या क्रिया आहेत. ज्यांना कल्पकतेचा वारसा मिळालेला नाही व जे सर्जनात आपल्या असतेपणाचा पुरावा स्वतःला व जगाला देऊ शकत नाहीत, किंवा इतरही कोठल्या प्रकारे, जगाच्या कर्तबगारीत जे सहभागी होऊ शकत नाहीत ते अशा दुष्ट, हिंसक नकारात्मक मार्गांनी आपले असतेपण सिद्ध करतात स्वतःच्या सजीवपणाचा प्रत्यय घेतात. आणि सजीवता म्हणजेच स्वतःतीत होता येण्याची क्षमता अंगी असल्याचा पुरावा नव्हे काय ? निर्जीव, अचेतन वस्तू आहे त्या स्थितीत कुरकूर न करता दीर्घकालपर्यंत राहू शकते. परंतु मनुष्य ही काही निर्जीव, अचेतन वस्तू नव्हे. मनुष्य सचेतन आहे त्याला कल्पनाशक्ती व इच्छाशक्ती आहे. त्याला अचेतन वस्तूची अवस्था कशी बरे सहन होईल? म्हणून तो स्वतःला ओलांडण्याचा, स्वतःला पार करण्याचा, आहे त्याहून पलीकडे जाण्याचा प्रयत्न करतो.

परपीडकता हा देखिल न्यूनप्रेरित हिंसकपणाचाच भाग आहे. परपीडक हा कमालीचा न्यूनगंडप्रेरित असतो. प्रत्येक सचेतन वस्तूला तो घाबरत असतो. म्हणून सचेतनाचे अचेतनात, सजीवाचे निर्जीवात रूपांतर करून त्यावर आपला अधिकार प्रस्थापित करावयास तो झटत असतो. त्याची परपीडा ही इतरांना अचेतन, निर्जीव बनवावे या इच्छेतून जन्मलेली असते दुसरा पूर्ण अगतिक, अचेतन बनल्यावाचून त्याला तो सचेतन आहे याचा विश्वास संपादन करता येत नाही.

न्यूनगंडप्रेरित हिंसकपणा वा आक्रमकपणा ही अशा प्रकारे निर्माणशील कृतींना पर्यायी कृती असते. ज्याला काही निर्माण करता येत नाही वा निर्मितीचा आस्वादही घेता येत नाही तो निर्मितीच नाहीशी करतो. जीवनाविषयीची आसक्ती जितकी तीव्र आणि उत्कट असते तितकीच जीवनाविषयीच्या द्वेषाची ही वृत्तीही तीव्र आणि उत्कट असते. मनुष्याच्या मनामध्ये खोलवर कुठेतरी निर्मितीची ओढ असावी. जेव्हा ही ओढ पुरी होत नाही तेव्हा तिचेच रूपांतर संपूर्ण जीवनाच्या, चैतन्याच्या द्वेषात होत असावे. सचेतन, सजीव, बुद्धिमान मनुष्यप्राण्याला स्वतःतीत होता येणे ही एक अत्यावश्यक गरज असावी. जेव्हा ते त्याला साधत नाही तेव्हा त्याच्या आयुष्यात निर्माण होणारी अगतिकता त्याला जीवनावरच सूड घ्यावयास प्रवृत्त करीत असावी.

न्यूनप्रेरित हिंसकपणा ही जे जीवन जगता आले नाही त्या जीवनाचीच स्वतः विरुद्धची प्रतिक्रिया असल्याने भीती दाखवून वा प्रतिषेधाच्या साहाय्याने ती दडपता येत नाही. मात्र विशिष्ट प्रकारच्या करमणुकीच्या साधनांच्या साहाय्याने ह्या प्रवृत्तीचा रोख बदलून तिला वाट देता येण्याची शक्यता असते. रोमन साम्राज्याच्या पडत्या काळात रोमच्या राजधानीत गुलामांची संख्या इतकी प्रचंड झाली होती की त्या गुलामांचे काय करायचे हेच तेव्हाच्या राजकर्त्यांना समजेनासे झाले होते. गुलामांना देण्याइतके कामही त्यांच्यापाशी नव्हते. परिणामी एकूण समाजामध्येच न जगता आलेल्या क्रियाशीलतेचा कितीतरी अंश केवळ साचून राहिला होता व त्या असंतोषातून जनतेची हिंस्र प्रवृत्ती वाढत होती. रोमन काळातील हिंस्र खेळांची लोकप्रियता या एका घटकातून निर्माण झाली होती. प्रत्यक्ष नव्हे तर खेळाडूंच्या मध्यस्तीने प्रेक्षक आपल्या मनातील हिंस्र प्रवृत्तींना वाट देऊ शकत व अशा प्रकारे हिंस्रपणाची स्वतःमधील पातळी जास्तीत जास्त खाली राखीत. मुष्टियुद्ध, कुस्ती, बैलांची साठमारी वा बैलांबरोबरच्या झुंजी याचाही उपयोग याच प्रकारचा असतो. तथापि या प्रवृत्तींचा रोख काही वेळ थांबवून धरता आला तरी त्यांचे संपूर्ण निर्मूलन केव्हाच करता येत नाही. ज्या



अनुक्रमणिका

क्षणी तुमचा त्यांच्यावरील दाब कमी होतो वा त्यांच्यावरचे तुमचे लक्ष कमी होते त्या क्षणी ह्या प्रवृत्ती डोके वर काढतात. न्यूनप्रेरित हिंसकपणावरील एकमेव कायमचा उपाय म्हणजे निर्माणशील व्यवधानांची सुविधा जनतेला प्राप्त करून देणे.

प्रतिकारात्मक आक्रमकपणाचा उद्देश जीवनसेवा हा असतो. प्रतिकरात्मक आक्रमकपणाच्या तुलनेत न्यूनप्रेरित हिंसकपणा ही एक रोगट आणि विकृत वस्तू आहे. कारण जीवनाच्या बाजूने ती प्रतिक्रिया व्यक्त होत नाही. या प्रकारचा आक्रमकपणा ही जगता न आलेल्या परिपूर्त जीवनाला पर्यायी प्रतिक्रिया असते. मात्र ही प्रतिक्रिया जीवनाला विरोधी असली तरी खोल कुठेतरी जीवनाच्या आसक्तीनेच ती घडलेली असते. तुम्हाला निर्माणशील जीवन जगता येत नाही म्हणून तडफडाटाने तुम्ही जीवनाच्या विरुद्ध शस्त्र धरता. जर तशा प्रकारचे निर्माणशील जीवन तुम्हाला जगता आले असते, तर तुम्ही जीवनाच्या द्वेषाने वागलाहो नसता. तुम्हाला खरे, परिपूर्त सार्थ जीवन जगता येत नाही म्हणून आकस्ताळेपणाने तुम्ही खोटया, वांझ, निरर्थक जीवनाकडे झुकता. खरे, सार्थ जीवन तुम्हाला जगता आले असते तर तुम्ही तसे वागला नसता.

हिंसकपणाचा आणखी एक प्रकार आहे. या प्रकाराला " आर्ष रक्तपिपासूपणा " असे तांत्रिक नांव आहे. हा हिंसकपणा आणि निःशक्त, दुबळचा, अपंग मनाच्या व्यक्तीचा हिंसकपणा यात मूलभूत फरक आहे. " आर्ष रक्तपिपासूपणाने पछाडलेला मनुष्य हा निसर्गाच्या विळख्यातून बाहेरच पडलेला नसतो. त्याला विचारशक्ती वापरता येत नाही. खून व रक्तपाताचे त्याला वेड असते. जीवनाला पलीकडे जाण्याचा तेवढा एकच मार्ग त्याला अवगत असतो. पूर्ण मानव बनण्याची त्याला धास्ती वाटते. त्यापेक्षा जन्मापूर्वीची अविभक्त अवस्था त्याला अधिक निर्धास्त वाटते जीवनाचे उत्तर तो व्यक्तिगत आयुष्यात न पाहता व्यक्तिपूर्व अविभक्त अवस्थेत पाहतो. विचारशक्ती हे त्याला मोठे जू वाटते. निसर्गापासून विभक्त झाल्यावाचून, मनाचा अलिप्तपणा आल्यावाचून विचार शक्य नसतात. "आर्ष व रक्तपिपासू" मनुष्य तर निसर्गापासून विभक्त बनावयास घाबरत असतो त्यामुळे मनुष्य होण्यापेक्षा पशू होणे त्याला अधिक सोपे व निर्धास्त वाटते. म्हणूनच अशी माणसे रक्तपातासाठी रक्तपात करतात. रक्त हे त्यांच्या दृष्टीने जीवनाचा अर्क असल्याने रक्तपात करणे म्हणजे आपल्या शक्तीचा प्रत्यय घेणे, आपण शक्तिमान आहोत याचा पुरावा घेणे व देणे; आपण लोकविलक्षण, इतरांपेक्षा वेगळे व श्रेष्ठ आहोत याचा दाखला देणे असते. रक्तपात व हिंसा ही त्यांच्या दृष्टीने मोठी झींग, आत्मश्रेष्ठत्वाचा मोठा पुरावा असतो. उलट

मारले जाणे हीही गोष्ट त्यांच्या हिशेबात असते. कारण मारण्याला पर्याय मरणे एवढाच त्यांना कळतो. त्यांच्या तर्कात मारणे आणि मरणे एवढ्या दोनच गोष्टी असतात. अतिआदिम पातळीवर हाच तेवढा आयुष्याचा हिशेब असतो जितक्या लोकांना मारता येईल तितक्यांना मारायचे आणि मरण भरले की कुणाकडून तरी मारले जायचे. की जीवनाची फिटंफाट झाली. मारणे हे या अर्थी मृत्यूची ओढ नसते, तर तो एक जीवनाचा हिशेब असतो. मनुष्य बुद्धीने, मनाने, विचाराने मागे जात जात जेव्हा रानटी, अप्रगत मानवाच्या मनाच्या अवस्थेला पोचतो तेव्हा त्याला फक्त एवढा एक हिशोब समजतो. रक्ताची ही विचित्र लालसा अनेक व्यक्तींच्या खाजगी स्वप्नातून, दिवास्वप्नातून किंवा मानसिक आजारातून वा प्रत्यक्ष खुनातून दिसून येते. कधी कधी नेहमीचे आंतर्निषेध जेव्हा लुळे पडतात अशा नागरी किंवा आंतरराष्ट्रीय प्रसंगात (नागरी बंड, आंतरराष्ट्रीय युद्ध इत्यादि) या प्रकारची रक्तलालसा दिसून येते. बांगला देशातील पाकिस्तानी सैनिकांचे नागरी लोकांवरील अत्याचार आणि नंतर नागरी लोकांनी त्यांचा घेतलेला कठोर सूड याचेही उदाहरण देता येईल.) ज्या रानटी टोळ्या आजही जिवंत आहेत त्यांच्यामध्ये हा प्रकार अद्यापिही पाहता येतो. (शिरशिकार करणाऱ्या बोर्नियोतील रानटी टोळ्या.)

येथवर आपण हिंसकपणा व आक्रमकपणाचे अनेक प्रकार पाहिले. हे प्रकार काही प्रमाणात तरी benign म्हणजे सुप्ट म्हणता येतील. कारण जीवनाची सेवा ही त्यांची प्रेरणा आहे. याच्यापुढे जे हिंसकपणाचे व आक्रमकपणाचे प्रकार आपण पाहणार आहोत, ते सर्व जीवनाच्या द्वेषाचे, जीवनावर उठलेले प्रकार आहेत.

मनुष्यामनुष्यातला मूलभूत फरक पाहायचा झाल्यास तो त्याच्या जीवन-विषयक धारणेत पाहावयास मिळतो. काही मनुष्ये जीवनावर प्रेम करणारी असतात, तर काही जीवनाचा द्वेष करणारी, विघटन, नाश, विध्वंस, मृत्यू यांच्याविषयी आसक्ति दाखविणारी असतात. मानसिकदृष्ट्या वा नैतिकदृष्ट्या मनुष्यामनुष्यात याव्यतिरिक्त दुसरा मोठा फरक कोणताही नाही. याच दोन प्रवृत्तींना उद्देशून मानसशास्त्रामध्ये जीवनासक्त (Biophilous ) आणि मृत्यूआसक्त ( Necrophilous ) असे दोन शब्द वापरले जातात. अर्थात कुठलाही मनुष्य पूर्णपणे जीवनासक्त वा पूर्णपणे मृत्यूआसक्त कधीच नसतो. परंतु त्याची एकूण प्रवृत्ती पाहून आपण त्याला जीवनासक्त किंवा मृत्यूआसक्त म्हणायचे असते. प्रत्येक मनुष्यामध्ये या दोन्हीही प्रवृत्तींचा थोडथोडा अंश सापडतो. काही वेडे मात्र पूर्णपणे व मृत्यूआसक्त असतात. तर काही साधू, संत महात्मे पूर्णपणे जीवनासक्त असतात.

मृत्यआसक्तांना ओळखायची खूण पुढीलप्रमाणे.– जे जे मृत, निर्जिव अचेतन त्याचे त्यांना आकर्षण असते. प्रेत, विष्टा, दुर्गंध, विध्वंस, नाश, विघटन यात त्याना विलक्षण रस असतो. या लोकांच्या बोलण्याचे आवडीचे विषय प्रेत, मसणवट, दुर्गंधी, व्याधी, मरण, प्रेतसंस्कार या प्रकारचे असतात. संभाषणात हे विषय आले की ते मांडी सरसावून बसतात. या संभाषणांच्या वेळी ते कमालीचे उत्तेजित बनतात. या प्रकाराच्या मनोवृत्तीचे उत्तम उदाहरण म्हणून हिटलरचे नांव घेता येईल. विघटन, नाश, विध्वंसन, प्रेते व मृत्यू हे विषय संभाषणात आले की त्याच्या आवाजाला मोठी धार चढे. मृत्यूचा विशिष्ट गंध त्याला फार प्रिय असे. त्याला विध्वंसाकरिता विध्वंस आणि रक्तपाताकरिता रक्तपात प्रिय होता. प्रारंभी त्याच्या यशाच्या काळात त्याला शत्रूचा उच्छेद करायचा होता असे जरी त्याच्या वर्तनावरून वाटले, तरी पुढे जेव्हा जर्मनीचा पराभव होऊ लागला तेव्हा जर्मनीचाही त्याला तिटकारा आला. इतका की जर्मन देश नष्ट झाला तरी बरे असे तो म्हणू लागला. लोक किती मेले, किती विद्रूप झाले, किती आयुष्यातून उठले यात त्याला रस नसे. त्याच्या दृष्टीने त्याचा मोठेपणा तेवढाच महत्त्वाचा होता. हिटलर ही एक मृत्यूदेवताच होती. हिटलर हा मूलतःच मृत्यू, विध्वंस आणि विघटन यांच्यावर प्रेम करणारा असल्याने त्याच्या मनाची ही स्थिती होती. त्याच्याबरोबर पहिल्या महायुद्धात ज्याने भाग घेतला होता अशा एका सैनिकाने हिटलरविषयी सांगितलेली हकिकत या ठिकाणी देण्यासारखी आहे. तो सैनिक सांगतो की, "महायुद्धाच्या शेवटी एका प्रसंगी पाण्यावर तरंगणाऱ्या कुठल्यातरी वस्तूकडे एकटक पाहत असणाऱ्या हिटलरला पाहून तो एवढ्या एकाग्रतेने काय पाहत आहे हे निरखण्यासाठी आपण पुढे सरसावलो असता, ती वस्तू हे कुजण्याच्या शेवटच्या अवस्थेतील एक दुर्गंधीयुक्त प्रेत आहे असे आपणास आढळले व हिडलरच्या त्या कृतीचे फार आश्चर्य वाटले. आपण वळेच हिटलरला त्या दृश्यापासून दूर करण्याचा प्रयत्न केला, पण त्याक्षणी त्याची शुद्ध हरपलेली होती इतका तो त्या दृश्यात व्यग्र झाला होता." या हकिकतीवरुन हिटलरच्या मनाविषयी अनेक निष्कर्ष काढता येतील.

Necrophilous हा शब्द necrophile या शब्दावरून आला आहे. necrophile म्हणजे प्रेताशी कामव्यवहार करणारा. काही काही मनुष्ये अशी आढळतात की ज्यांना जिवंत व्यक्तीशी कामव्यवहार करता येत नाही. जिवंत व्यक्तिना ती बुजतात. पण तोच कामव्यवहार ती प्रेताशी अगदी मोकळेपणाने व तीव्र

आनंदाने करतात. या मानसिक विकृतीला उद्देशून प्रेतकामी हा शब्द वापरला जातो. ज्या लोकांची प्रवृत्ती निर्जीव, जड, अचेतनावर आसक्त राहण्याची असते त्यांनाही हाच शब्द ढोबळ अर्थाने मानसशास्त्रांत लाविला जातो. प्रेतआसक्त किंवा मृत्यूआसक्त मनुष्ये ही नेहमी भूतकाळात, भूतकाळाच्या मोठेपणात रममाण होतात. वर्तमान त्यांना आकृष्ट करू शकत नाही. तशीच तो फार भावूक असतात या क्षणी जे काही घडत असते त्यात त्यांच्या भावना कधीही रमत नाहीत. ती अतिशय थंड, भावनाशून्य, कुणालाही स्वतःशी विशेष सलगी करू न देणारी असतात. तो "कायदा व सुव्यवस्थेची" एकांतिक भक्त असतात. फारसे कुणात ती मिसळत नाहीत. त्यांची जीवनमूल्ये व भावमूल्ये सामान्य मनुष्यांच्या जीवन व भाव- मूल्यांपेक्षा सर्वस्वी विरुद्ध असतात. सामान्य मनुष्याला मृत्यू व मृत्यूशी संबंधित असणाऱ्या सर्व गोष्टींची फार दहशत वाटते. या मनुष्यांना नेमक्या त्याच गोष्टींचे फार आकर्षण असते.

मृत्यूआसक्त लोकांना ओळखायची सर्वात मोठी खूण ही की जिथे-जिथे पाशवी बलाचा वापर असतो तिथे-तिथे ही मनुष्ये नतमस्तक झालेली दिसतात. पाशवी बल हा त्यांचा मोठाच कमकुवतपणा होय. इतका आदर त्यांना पाशवी बलाविषयी असतो. बल आणि अत्याचार-बलात्काराविषयी त्याना अतिशय ओढ असते. वास्तविक पाशवी बल ही एक अत्यंत हीन आणि तिरस्करनीय गोष्ट आहे. सीमाँ वेल नांवाची लेखिका तर म्हणते की पाशवी बल व जुलूम या गोष्टी सचेतनाचे रूपांतर अचेतन प्रेतात घडवून आणतात. रती जर जीवनाची निर्मिती करीत असते असे म्हटले, तर पाशवी बल त्या जीवनाचे प्राणहरण करते असे म्हणता येईल. असो. पाशवी बलाच्या बाबतीत जर एकच सर्वसाधारण विधान करावयाचे झाले तर ते असे करता येईल की सर्वच बलाच्या सामर्थ्याचा उगम त्या बलाच्या नाश आणि विध्वंस करण्याच्या शक्तीत असतो. नाश करण्याची, विध्वंस करण्याची शक्ती जर त्या बलाच्या ठिकाणी नसती तर ते बल इतकी दहशत निर्माण करू शकणार नाही. मला लोक घाबरतात याचे कारण मी त्यांचा प्राण घेऊ शकतो. अर्थात कुणाला जिवानीशी मारणे ही शेवटची अवस्था झाली. पण मी त्याचा वाटेल तो अपमान करू शकतो. त्याला तुच्छतेनं वागवू शकतो. त्याला पूर्णपणे नामोहरम करू शकतो त्याच्यापासची सर्व चीजवस्तू हिरावून घेऊ शकतो यापैकी मी त्याचे काहीही करू शकतो. तो मला घाबरतो, कारण मी त्याला कसाही वागवू शकतो. आता या कसाही वागविता येण्याच्या परिस्थितीचा जर अधिक विचार केला तर असे आढळून येईल की, मी त्याला कसाही वागवू शकतो, कारण त्याला ठार मारता येण्याची शक्ती माझ्या अंगी आहे आणि त्याला







मारण्याची इच्छा मी दाखवू शकतो. सर्वच बलाचा अंतिम आधार ठार मारता येण्याची शक्यता व ठार मारण्याची इच्छा दाखविण्याची तयारी या दोन गोष्टी असतात. मृत्यूआसक्त मनुष्याचे वैशिष्ठ्य यात आहे. तो पाशवी बलाचा पूजक असतो व त्याच्या दृष्टीने मानवी जीवितातील सर्वात मोठे कर्तृत्व हे मारण्याच्या, विध्वंस करण्याच्या शक्तीत असते. शक्तीसंपन्नतेचा त्याचा हा एकमेव निकष. मृत्यू, विध्वंसन ही त्याच्या जीवनाची प्रमुख धारणा व त्याचे सर्वश्रेष्ठ तत्त्वज्ञान असते मृत्यूआसक्ताच्या दृष्टीने जीवनाची कृतार्थता जीवनदानात नसते. तो भयउत्पन्न करण्यात, दरारा निर्माण करण्यात असते. प्रसंगोपात्त अपरिहार्य ठरेल म्हणून तो बलाचे प्रदर्शन करीत नाही, तर बल, हिंसा हेच त्याच्या जीवनाचे दैवत असते.

जीवनावर जे लोक प्रेम करतात त्यांना जे जे जिवंत, चैतन्यमय, हालचाल करणारे ते. ते आकर्षक वाटते. मृत्यूआसक्ताला जे. जे मृत, हालचालरहित ते आकर्षक वाटते. जीवनप्रेमिकाला मनुष्यामध्ये स्त्री व पुरुष एवढेच फक्त भेद दिसतात. मृत्यूआसक्ताला हा भेद दिसत नाही. त्याच्या दृष्टीने सशक्त–अशक्त, मारेकरी–बळी, सामर्थ्यवान–दुबळे असा हा भेद असतो. सशक्ताविषयी त्यांना प्रेम असते. अशक्ताविषयी त्यांना तिरस्कार असतो. अनुकंपा व करुणा या भावना त्यांच्यापाशी नसतात. मारेकऱ्याशी ते तन्मय होतात. बळींविषयी घृणा बाळगतात.

हिटलर अथवा स्टॅलिनसारख्या लोकांचा सर्वसामान्य मनुष्यावर जो जबरदस्त प्रभाव आढळतो तो त्यांच्या या दराऱ्यातून जन्मलेला असतो. स्टॅलिन वा हिटलरसारख्या लोकांची नाश करण्याचीं शक्ती व तयारी अमर्याद असते व याच वस्तुस्थितीच्या जाणीवेमुळे लोक त्यांना मानतात. गंमत अशी आहे की अंतर्यामी अनेकजण हिटलर वा स्टॅलिनप्रमाणेच हिंस्र व जीवनद्वेषी असल्याने, आपण नाही तरी निदान दुसरा तरी कोणी आपणास हवे ते करीत आहे या कल्पनेने मनातल्या मनात उत्तेजित होऊन ते अशा प्रकारच्या व्यक्तिमत्त्वाकडे आकर्षित होत असतात. तर काहीजण त्यांना मनातून घाबरलेले असतात व भीतीतून त्यांच्याकडे आकर्षित झालेले असतात. तथापि असेही अनेकजण असतात की ज्यांना हिटलर वा स्टॅलिनसारख्या लोकातील मृत्यू आणि विध्वंसनाची ओढ कळतच नाही. ते या लोकांच्या राष्ट्रपुरुष, राष्ट्रपिता, राष्ट्रीय त्राता अशा-सारख्या बहाण्यांना फसतात. मृत्यूविषयी आकर्षण बाळगणाऱ्या व जीवनाचा द्वेष करणाऱ्या नेत्यांनी जर राष्ट्रपितेपणाचा व जनतेच्या त्रातेपणाचा बहाणा केला नसता आणि खोट्या भूलथापा परत परत मारल्या नसत्या तर इतक्या मोठ्या संख्येने मनुष्ये त्यांच्या मागे लागलीच नसती. हे सर्व काम या लोकांच्या उत्तम



अनुक्रमणिका

प्रचारतंत्राचे असते. या प्रचारामुळे अनेक लोक फसतात व त्यांना सत्तेवर आरूढ व्हावयास हातभार लावतात. या लोकांचे खरे स्वरूप जर पटकन ध्यानात येऊ शकले असते तर ते सत्तेवर आल्यानंतरही अल्पावधीतच लोकांनी प्रचंड संख्येने त्यांना सत्तेवरून खाली खेचले असते. किमानपक्षी त्यांच्याविषयी तिटकारा बाळगणारांची संख्या तरी दिवसामास वाढत गेली असती. परंतु ते होत नाही, कारण लोकांना त्यांचे खरे स्वरूप लवकर कळत नाही. दुसरी गोष्ट ही की अनेक लोकांना मनातून अशा प्रकारच्या अत्याचार, बलात्कारादि कृत्यांचे आकर्षणच असते. त्यामुळे या पुढाऱ्यांच्या थापेबाजीला व भूलथापांना फसविले जावयास लोक उत्सुकही असतात.

जो मनुष्य जीवनावर प्रेम करतो तो चैतन्यावर प्रेम करतो. जीवनाविषयी अप्रीती बाळगणारे लोक अचेतन, मत, यांत्रिकता पावर अनुरक्त असतात. व्यक्ती असो वा वस्तू, तीवर मालकी त्यांची असल्यावाचून ती त्यांना आकर्षित करू शकत नाही. म्हणूनच की काय त्यांच्या मालकीच्या जाणीवेला धक्का. तो त्यांना स्वतःच्या व्यक्तिमत्वाच्या धक्क्यागत वाटतो. यामुळेच प्रसंग पडल्यास ते आपला प्राण देतील पण जी त्यांना आपली मालकीवस्तू वाटते ती ते देणार नाहीत. त्यांना दुसऱ्यावर हुकुमत गाजवावयास आवडते. या हुकमतीखाली ते इतरांचे चैतन्य मारून टाकून त्यांना निर्जीव वस्तू बनवितात. त्यांना खरोखर चैतन्याची, जिवंतपणाची भीतीच वाटते. त्यामुळेच ते चैतन्याला मृत बनवू पाहतात. इतरांचा उत्स्फूर्तपणा खच्ची करू पाहतात. जे जे यांत्रिक व ठराविक नेमून दिलेल्या हालचालीत काम करते ते त्यांना फार प्यार असते. माणसेही त्यांना यंत्रवत व कळसुत्री बाहुलीगत वागणारी हवी असतात. यालाच ते "शिस्त व नियमबाजपणा म्हणतात. खरं तर शिस्त व नियमबाजपणाच्या " नावाखाली " ते इतरातील उत्स्फूर्तपणा मारू पाहतात. त्यांचा खरा विरोध सजीवतेलाच असतो. काळोख व रात्रीचे त्यांना फार आकर्षण असते. त्यांना प्रकाश सहन होत नाही.

एखादा मनुष्य प्रेतप्यासी आहे की, कसा आहे ही गोष्ट त्याच्या स्वप्नातून अधिक चांगल्या प्रकारे समजून येते. ज्यांना स्वप्नात नेहमी खून, मारामाऱ्या, रक्तपात, प्रेते, हाडाच्या कवट्या, विष्टा, यंत्र बनलेली माणसे दिसतात, ते प्रेतअनुरक्त (necrophilous) असतात असे ठामपणें म्हणता येईल. मात्र क्वचित अशा प्रकारची दृश्ये स्वप्नात दिसली यावरून असा निष्कर्ष काढता यावयाचा नाही. त्यासाठी स्वप्नांची संख्या इत्यादि गोष्टीही विचारात घ्यावयास हव्यात.

एखादा मनुष्य प्रेतप्यासी आहे किंवा कसे ही गोष्ट त्याच्या चेहऱ्यावरील भावभावनांकडे आणि एकूण अविर्भावाकडे पाहूनही ठरविता येईल. उदा, आशी

व्यक्ती एकटक भावनाशून्य आढळते. तिची कातडी मातकट व मृतसारखी असते. कातडीवर बिलकुल कातकाकी नसते. या व्यक्तींच्या भोवतालचे वातावरण अनेकदा मृत्यूचा गंध पसरल्यासारखे वाटते हिटलरच्या बाबतीत अनेकांना हा अनुभव आलेला होता. ही मनुष्ये रोगट वाटावी इतक्या टापटिपीची व बारीकसारीक गोष्टींचे अवडंबर करणारी असतात. आज्ञापालन हे त्यांचे सर्वश्रेष्ठ मूल्य असते.

प्रेतध्यासी वृत्तीच्या विरुद्ध जीवनध्यासी वृत्ती. या वृत्तीचे लोक जीवनाचे जतन करू इच्छितात. जीवन पुढे नेऊ पाहतात. एका अर्थाने प्रत्येक सजीव व सचेतन पिंडाची ती सर्वसाधारण प्रवृत्ती आहे. कारण प्रत्येक सचेतन पिंड मृत्यूला विरोध करू पाहत असतो. जीवनसंरक्षण आणि मृत्यूविरोध हे जीवन ध्यासाच्या प्रवृत्तीचे एक अंग. या प्रवृत्तीला यापेक्षाही अधिक महत्त्वाचे अंग आहे. ही प्रवृत्ती नेहमी मूळच्या स्तरापेक्षा अधिक उच्च स्तरावर जीवन संगठित करू पाहते. जे विरोधी, वेगळे व भिन्न आहे ते स्वतःमध्ये शोषून घेऊन अधिक उच्च स्तरावर जीवन गुंतागुंतीचे व संमिश्र करू पाहते. जीवनध्यासाच्या प्रवृत्तीला केवळ जगणे पसंत नसते. तिला जीवन अधिक गुंतागुंतीचे करून जगणे हवे असते त्यामुळे सतत विघटन व नवसंयोजन असे या प्रवृत्तीचे चाललेले असते. विरोध, विरोधातून नवीन घटकांचे शोषण व अधिक उच्च पातळीवरील नवजन्म असा हा कार्यक्रम सतत चालू असतो. संगठन, एकसूत्रीकरण व अशा प्रकारे अधिक गुंतागुंतीची रचना हा सर्व जीवनव्यापाराचा महत्त्वाचा गुणधर्म आहे. सजीव पेशी तर अन्नशोषणाच्या बाबतीत हे करतातच, परंतु भावना, विचार, अनुभवांच्या बाबतीतही प्रतिक्रिया घडत असते. प्रत्येक सजीव पिंड नवनव्या भावना, संवेदना, विचार आत्मसात करीत असतो व स्वतःमधील गुंतागुंतीत भर घालीत असतो. काम व रतिव्यापार हा जीवनाने स्वीकारलेला अशा प्रकारचा एक व्यापार. परंतु जीवन अधिकाधिक गुंतागुंथीचे (complex) करू शकणारे जीवनांचे आणखिही मार्ग आहेत. तेव्हा त्या अर्थाने जीवन समृद्ध करणारी काम ही काही एकमेव प्रवृत्ती नाही. परंतु ह्या प्रवृत्तीचा एक जो विशेष आहे तो असा की जीवनात त्या हरएक प्रवृत्तीशी या प्रवृत्तीचे मीलन व एकत्रिकरण होऊ शकते. आक्रमकप्रवृत्तीशी ही प्रवृत्ती एकत्रित होऊ शकते. दुसऱ्याही अनेक प्रवृत्तीशी ती एकत्रित होऊ शकते. त्यामुळे पाण्याचा रंग जसा त्यात मिसळल्या जाणाऱ्या रंगावरून ठरतो, त्याच प्रकारे कामप्रवृत्तीचा रंगदेखिल ज्या प्रवृत्तीशी ती प्रवृत्ती मिसळली गेली असेल तिच्याप्रमाणे होतो. एका पातळीवर ही प्रवृत्ती जीवनदायक व जीवनसंवर्धक आहे, पण ती जर विध्वंसक, नाशक प्रवृत्तीशी एकजीव झाली तर तिच्याइतकी दुसरी

वाईट प्रवृत्तीही कुठली नाही. मग तिचा सारा चेहरामोहराच बदलून जातो. एक तर ही प्रवृत्ती अतिशय उत्कट व आवेगी आहे. हाच उत्कटपणा व आवेग ती ज्या प्रवृत्तीशी सरमिसळ होते तिला आणून देते. त्यामुळे जीवनविरोधी प्रवृत्तीबरोबर ती तीव्र जीवनविद्वेषक बनते. खोटा अहंकार, संपत्तीची लालसा, सत्तेचे वेड, क्रौर्य व हिंस्रपणा अशा कुठल्याही विकाराशीं ही प्रवृत्ती एकजीव बनू शकते. थोडक्यात सांगायचे तर जीवनसाहाय्यक प्रवृत्तीप्रमाणेच जीवन विद्वेषक प्रवृत्तींच्याही दिमतीला ही प्रवृत्ती राबविली जाऊ शकते. परपीडकवृत्ती, आत्मपीडकवृत्ती, मृतनरमांसभक्षकवृत्ती, नरविष्ठाभक्षकवृत्ती अशा नाना विकृतीत व अनैसर्गिक कृतींसाठी ही प्रवृत्ती रूपांतरित होऊ शकते. या सगळ्या व्यापारांना आपण विकृत हे विशेषण लावतो ते केवळ त्या अनैसर्गिक असतात म्हणून नव्हे, तर जीवनसंवर्धक आणि जीवननाशक अशा भिन्न प्रकारच्या प्रवृत्तींचे ते मिश्रण असते म्हणून त्या विकृती असतात.

जे लोक जीवनप्रेमी असतात त्यांना श्रेयअश्रेय, सुष्टदुष्ट, बरेवाईट याची स्वतःची अशी काही मते असतात. जे-जे जीवनाचा पाठपुरावा करणारे ते-ते त्यांना प्रिय असते. त्याउलट जे-जे जीवनाशी विसंगत, जीवनाशी दुष्टावा करणारे, जीवनाचा अपहार करणारे ते-ते त्यांना अप्रिय असते. जीवन उमलविणारे ते त्यांच्या दृष्टीने चांगले आणि जीवन मालविणारे ते वाईट अशी त्यांची सर्वसाधारण भावना असते.

वर जीवनद्वेषी व जीवनप्रेमिक या दोन प्रकारच्या लोकांची काही विशेष लक्षणे दिली आहेत. ही लक्षणे अर्थात विशुद्ध नमुन्यांची आहेत. अशा प्रकारचे विशुद्ध स्वरूपातील नमुने जगात कुठेच आढळून नसतात. ही एक नेहमीच्या परिचयाची गोष्ट आहे. जगात नेहमी मिश्रणे आढळतात. जगात पूर्ण जीवनद्वेषी आढळला, तर तो वेड्यामध्ये जमा असतो आणि पूर्ण जीवनप्रेमी आढळला तर तो संत, साधू व महात्मा असतो. बहुसंख्य लोक या दोन्ही टोकांत अधेमधे कुठेतरी असतात मानसिकदृष्ट्या महत्त्वाची गोष्ट कुठल्या प्रकारची लक्षणे अधिक प्रमाणात आहेत आहे. ही कारण ज्या प्रकारची लक्षणे अधिक प्रमाणात त्या प्रकाराकडे व्यक्तित्वाचा कल सर्वसाधारणपणे राहतो. ज्यांच्यात जीवनाविषयीचा द्वेष अधिक आहे असे लोक आपल्या मनातील जीवनप्रेम हळहळू पण निश्चितपणे मारून टाकतात. उलटपक्षी ज्यांच्यामध्ये जीवनविषयक प्रेमाचा अंश मुळातच अधिक आहे असे लोक त्यांच्यातील जीवनविद्वेषक अंश पाहून धक्का घेतात. मात्र असा धक्का ही त्यांच्या बाबतीत एक इष्टापत्ती असते. कारण त्या धक्क्यामुळे त्यांना जीवनाविषयी अधिकच प्रेम वाटू लागते. तेव्हा या बाबतीत तुमची आत्मजाणीव काय प्रकारची आहे हे कळून येणे फार महत्त्वाचे असते.





फ्रॉईडच्या शिकवणुकीत कामप्रेरणा (काम म्हणजे प्रेम करण्याची, माया करण्याची, जिव्हाळा बाळगण्याची शक्ती. काम हा शब्द फ्रॉईडच्या वाङ्‌मयात फार व्यापक अर्थाने वापरलेला आहे. काम म्हणजे केवळ गुह्यांग भावना नव्हे.) व मृत्यूप्रेरणा अशा दोन स्वतंत्र प्रेरणा मानलेल्या आहेत. फ्रॉईड म्हणतो की मनुष्यामध्ये ह्या दोन स्वतंत्र प्रेरणा काम करीत असतात व त्यांचे कार्य परस्पर-विरोधी दिशांनी चाललेले असते. कामप्रेरणा जीवन संगठित करण्यात व्यग्र असते. मृत्यूप्रेरणा विघटन करण्यात व्यग्र असते. कामप्रेरणा दुर्बल झाली की मृत्यूप्रेरणा प्रबल होऊ लागते व शेवटी या लढ्यात मृत्यूबरोबरच मृत्यूप्रेरणेचा जय होत असतो. फ्रॉईड हा अशा प्रकारे दोन समबल प्रेरणांची सातत्यपूर्ण झुंज गृहीत धरतो व ह्या प्रेरणा जैविक असून त्या उपजत असतात असे मानतो. वास्तविक प्रेरणांच्या विश्लेषणाच्या बाबतीत आणखीही पाठीमागे जाता येण्यासारखे आहे. उदा., आपण जर मनुष्यप्राण्याच्या आयुष्याचा अभ्यास केला तर असे दिसून येईल की मनुष्याची बलवत्तर प्रेरणा ही काहीतरी करीत राहावे ही असते. मनुष्याला स्वस्थ पडून राहता येत नाही. त्याला काहीना काही करीत राहावेसे वाटते. हाताने त्याला काहीं करता आले नाही तर मनातल्या मनात तो मनोराज्ये तरी रंगवील. परंतु बसल्या जागी थंड मनाने तो स्वस्थ पडून राहणार नाही. आता कृतीशीलता ही जर जीवनाची मूलभूत व प्राथमिक प्रेरणा धरली, तर ही प्रेरणा कोंडली जाते तेव्हा तिच्या विरुद्ध प्रेरणा जन्मास येते असे मानावयास कुठलाही प्रत्यवाय नाही. कृतीशीलता ही एकमेव प्राथमिक प्रेरणा मानली कीं प्रेरणांचे अकारण द्वैत गृहित धरण्याचीही गरज नाहीशी होते. कृतीशीलता किंवा काहीतरी जीवनोपयोगी करीत राहणे ही प्रेरणा जेव्हा कसल्या ना कसल्या कारणाने अतृप्त राहते तेव्हा तिच्या नेमकी विरुद्ध प्रेरणा म्हणजे जीवनाचा विध्वंस करण्याची प्रेरणा जन्मास येते असे यावरून दिसून येईल. आपण मांडीत आहोत त्या दृष्टिकोनाप्रमाणे 'मृत्यूप्रेरणा' ही स्वतंत्र जैविक प्रेरणा नसून मूळच्या जीवनप्रेरक प्रेरणेचे ते विकृत रूप असते. जीवनप्रेरणा किंवा कामप्रेरणा जितक्या प्रमाणात अतृप्त व अविकसित राहते तितक्या प्रमाणात तिचे रूपांतर दुष्टपणात, क्रौर्यात व हिंसकपणात होते. मृत्यू-प्रेरणा ही अशा प्रकारे नैसर्गिक जैविक प्रेरणा नाही. नैसर्गिक प्रेरणेची ती विकृत अवस्था असते. आपण बी पेरले आणि एकूण हवामान, पाणी, जमीन इत्यादि त्या बियाणाच्या वाढीस अनुकूल असली तर ते बी जसे चांगल्या प्रकारे वाढून त्याचा वृक्ष बनतो, तशाच प्रकारे जीवनप्रेरणेला पोषक परिस्थिती जमून आल्यास जीवनप्रेरणेची प्रेम करण्याची संभाव्य शक्ती पूर्णपणे उमलते. नाहीपेक्षा

ती नासवली जाऊन तीमधून द्वेषादी नकारात्मक प्रवृत्ती बाहेर पडतात. ( necrophilous tendencies )

आता प्रश्न असा येतो की कुठली परिस्थिती जीवनाविषयीचे प्रेम वाढविण्यास उपयुक्त ठरते आणि कुठली त्या बाबतीत अपकारक असते. कामप्रेरणा व मृत्यूप्रेरणा ह्या दोन प्रेरणांवर आधारलेली फ्रॉईडची उपपत्ती जर आपण स्वीकारली, तर जीवन (काम) आणि मृत्यू ह्या दोन्ही प्रेरणांची शक्ती जन्मभर जवळजवळ सारखी असते व मृत्यूप्रेरणेचा रोख एकतर स्वतःकडे वळू शकेल किंवा बाहेर वळू शकेल. यापेक्षा तिसरी स्थिती मृत्यूप्रेरणेच्या बाबतीत संभवत नाही असे मानावे लागते. तसेच मृत्यूप्रेरणेच्या अंतवर्तितेला किंवा बहिर्वर्तितेला बाह्य परिस्थिती जबाबदार असली तरी त्या प्रेरणेच्या सौम्यतेचा वा तीव्रतेचा उलगडा परिस्थितीच्या घटकाने होत नाही हेही कबूल करावे लागेल. परंतु आपण स्वीकारलेली उपपत्ती खरी मानली तर जीवनप्रेम वा जीवनद्वेषाला कारणीभूत होणाऱ्या परिस्थितीचा विचार आपण करू शकतो. फ्रॉईडच्या उपपत्तीच्या संदर्भात असा प्रश्नच उपस्थित होत नाही.

जीवनप्रेरणेला उपकारक आणि जीवनद्वेषी प्रेरणेला अपकारक अशा प्रकारच्या परिस्थितीविषयी निश्चित विधान करता येण्यासारखे नाही. फक्त एक ढोबळ विधान असे करता येईल की मुले जर जीवनावर प्रेम करणाऱ्या लोकांच्या सहवासात असतील तर अनुकरणामुळे त्यांच्याही मनात जीवनाविषयी प्रेम निर्माण होऊ शकेल. जीवनाविषयी प्रेम शब्दातून शिकता येत नाही. ते मूक कृतीतूनच एकाकडून दुसऱ्याच्या जीवनात उतरत असते. जीवनाविषयी प्रेम वाढविण्याच्या बाबतीतील नेमक्या गोष्टींची यादी देता आली नाही तरी काही विशिष्ट गोष्टींचा नामोल्लेख करता येईल. उदा, बालपणी मुलांच्या भोवतालचे वातावरण प्रेमळ, निर्धास्त व मोकळे असेल, त्यांना योग्य तितके स्वातंत्र्य असेल, भीती व धमक्यांचा आणि खोट्या दराऱ्याचा अभाव असेल, त्यांचे शिक्षण शाब्दिक उपदेशापेक्षा प्रत्यक्ष उदाहरणावर बेतलेले असेल, जीवन आकर्षक प्रकारे आखलेले असेल तर प्रौढपणी ती मुले जीवनप्रेमी निपजतील. त्याच्याउलट मुलांभोवतालचे वातावरण धास्तीचे, कुढे, अनाकर्षक, यांत्रिक, उत्तेजनाचा अभाव असणारे असे असेल तर ती जीवनद्वेषी निपजतील.

जीवनद्वेष आणि जीवनप्रेम या दोन संदर्भात हिंसकपणाची उपपत्ती आपण समजावून घेतली. तशाच प्रकारे अतिरिक्त व्यक्तिक व सामूहिक आत्मप्रेमाच्या संदर्भात देखिल ती समजावून घेता येईल.

अतिरिक्त आत्मप्रेम किंवा आत्मानुरक्ती (narcissism) व तिचे व्यक्ति-

मानसावर होणारे परिणाम याची फार मोठी महत्वपूर्ण चर्चा फ्रॉईडने आपल्या लिखणात केलेली आहे. नार्सिसस ही एक ग्रीक देवता. हा ग्रीक देव इतका सुंदर असतो की जगात त्याच्या तोडीची एकही व्यक्ति अस्तित्वात नसते. या अप्रतिम सौंदर्याचा परिणाम त्याच्या मनावर होऊन तो स्वत:च्याच प्रेमात पडतो. इतका की स्वत:वाचून त्याला दुसरे काहीही सुचेनासे होते. सारा दिवस तो स्वत:च्या सौंदर्याचे पाण्यात पडलेले प्रतिबिंब न्याहाळण्यात घालवू लागतो. त्याला भूक-तहानही समजेनाशी होतात. शेवटी त्यातच तो झिजून झिजून मरतो. या ग्रीक प्राक्कथेवरून फ्रॉईडने आपला आत्मानुरक्तीचा मानसशास्त्रीय सिद्धांत तयार केला आहे. फ्रॉईड म्हणतो की अर्भकाची कामवृत्ती (libido) ही प्रारंभी स्वत:मध्ये गुरफटलेली असते व मागाहून जसे जसे वय आणि इतर जगाचे भान वाढत जाते तसतसे ती बाहेर वळवली जाते. या ठिकाणी कामवृत्ती हा शब्द तांत्रिक अर्थाने वापरलेला आहे. कामवृत्ती म्हणजे केवळ रतीशक्ती नव्हे. कामवृत्ती म्हणजे इच्छिण्याची, प्रेम करण्याची, जिव्हाळा दाखविण्याची शक्ती. फ्रॉईड म्हणतो की या कामवृत्तीचा प्रारंभिक व प्राथमिक संचय आत्मपिंडामध्ये ( Ego ) असतो व तेथून ती शक्ती बाहेर पसरली जाते. आत्मपिंड हे अशा प्रकारे कामवृत्तीचा संचय करण्याचे साठण–,पात्र. १९२८ च्या दरम्याने फ्रॉईडने आपल्या या मतात थोडा बदल केला व कामवृत्तीचे साठवण आत्मपिंडात न होता ते अबोधपिंडात ( Id ) असते असे तो म्हणू लागला. अर्थात कामवृत्तीचा साठा आत्मपिंडात असतो की अबोधपिंडात या वादाचा परिणाम कामवृत्तीच्या कार्याच्या परिणामावर होत नाही. कामवृत्ती ही प्रथम शरीरपिंडाच्या स्वत:च्या दिमतीतच गुंतलेली असते. मागाहून तिथून थोडथोडी कमी होत ती बाहेरील जगातील इतर वस्तूंकडे आणि व्यक्तींकडे वळते असा फ्रॉईडच्या म्हणण्याचा भावार्थ. फ्रॉईडच्या प्रतिपदनाप्रमाणे अर्भक लहान असताना त्याच्या सगळ्या कामवृत्तीचा ओघ त्याच्या स्वत:च्या शरीराकडे व भावभावनांकडे असतो. स्वत:च्या शरीराव्यतिरिक्त इतर कुठल्याही गोष्टीचे भान त्याला नसते. इतके ते स्वत:मध्ये तल्लीन असते. पुढे जसजसे ते शरीराने वाढू लागते तसतसे त्याला बाह्य व त्याच्यापासून पृथक् जगाची कल्पना येऊ लागते. मग त्याला इतरांमध्येही रस वाटू लागतो. ही इतर अनेक प्रकारे त्याच्या उपयोगी पडत असतात. त्याला भूक लागली की दुधाची बाटली देतात. त्याला थंडी लागली की त्याच्या अंगावर पांघरूण घालतात. त्याचे कपडे ओले झाले तर ते बकपडे दलतात. नाना प्रकारे ही इतर त्याची काळजी घेतात. ही इतर आपली

काळजी करतात हे पाहून ते मूल मग त्यांच्यावरही प्रेम करू लागते. म्हणजे त्याच्या कामवृत्तीचा काही भाग ते आता इतरांसाठी वापरू लागते. अशाच प्रकारे मोठे होत होत ते मूल आपल्या कामवृत्तीचा काही भाग स्वतःसाठी व काही बाह्य जगासाठी वापरू लागते. मुलाच्या कामवृत्तीचा वापर बाह्य जगासाठीही होत असणे ही त्याच्या निकोपणाची खूण आहे. परंतु जर काही कारणाने आपल्या कामवृत्तीचा ओघ मुलाने बाह्य जगाकडून परत माग घेतला व तो स्वतःकडे वळविला तर तितक्या प्रमाणात त्याचा मानसिक विकास खंडीत होत असतो. आत्मप्रेमात समतोल असणे ही कुठल्याही व्यक्तीच्या निकोप व्यक्तिमत्वाच्या दृष्टीने एक मोठी आवश्यक गोष्ट असते. जेव्हा व्यक्ती फक्त स्वतःतच दंग राहू लागते तेव्हा त्याचा अर्थ तिच्या वाढीत काहीतरी बिघाड आलेला आहे. मनुष्याचे प्रेम हे तो स्वतःच त्याच्या बाहेरचे जग या दोहोत विभागून वाढले पाहिजे ( मानसिक वेडेपणामध्ये कामवृत्तीचा संपूर्ण ओघ 'स्व'कडे वळलेला असतो ) अर्थात मनुष्याच्या कामवृत्तीचा ओघ जरी बाह्य जगाकडे वळविला गेला तरीही नैसर्गिकपणेच त्याच्या कामवृत्तीचा काही भाग हा त्याच्या स्वतःमध्ये अडकलेला असतो व त्या दृष्टीने प्रत्येक मनुष्य हा काही प्रमाणात तरी मरेपर्यंत आत्मानुरक्त असतोच !

कामवृत्ती वा आत्मानुरक्तीची सामान्य मनुष्याच्या बाबतीत गती कशा-प्रकारची असते याचे वर्णन करताना फ्राईड सांगतो की, मानवी बालक जेव्हा गर्भावस्थेत असते तेव्हा ते पूर्णपणे आत्मानुरक्त असते. आपल्या अस्तित्वा-सारखेच काही वेगळे वा पृथक् अस्तित्व असू शकते याची किंचितमात्रही कल्पना मांसाच्या त्या गोळ्याला नसते. जन्माला आल्यानंतरही काही काळपर्यंत त्याची हीच अवस्था असते. मात्र जन्माला आल्यानंतर त्याला एका नवीन भावविश्वाला तोंड द्यावे लागते. आजपर्यंतच्या विश्वापेक्षा हे विश्व संपूर्णतः वेगळे आहे हे त्याला जाणवते. पण कळत मात्र काहीच नाही. यापुढे त्याच्या स्वप्रेमाला अनेक धक्के बसू लागतात व त्याला त्याच्या पृथक् अस्तित्वाची आठवण व जाणीव करून देतात. "फ्राईड पुढे लिहितो की "जगाची एकूण स्थितीच अशी आहे की प्रत्येक व्यक्तिला आत्मप्रेमाचा थोडाथोडा त्याग करून स्वप्रेमाला मुरड घालावीच लागते. जर मूल फक्त आत्मप्रेमातच दंग राहिले तर त्याचा निभाव लागणार नाही. इतर व्यक्तींवर आणि वस्तूवर त्याला प्रेम करावेच लागते. स्वतःवरील आत्यंतिक प्रेमाचा मूळ ओघ बाहेर वळवून ते ही गोष्ट साध्य करते." आत्मप्रेम कमी करून अन्यांवर प्रेम करणे हीच व्यक्तीची वाढ. ही वाढ जसजशी वाढत जाते तसतसे बालकाला स्वतःविषयी एक प्रकारचा अलिप्तपणा येत जातो. स्वतःच्याच जीवनव्यापाराकडे ते

थोडया अलिप्तपणे पाहू लागते. तथापि मनुष्याने स्वत:विषयी कितीही अलिप्तपणा आणला तरी तो अलिप्तपणा पूर्णांशाचा कधीही असत नाही. प्रत्येकाला स्वत:विषयी इतरांपेक्षा थोडे अधिक प्रेम नेहमीच वाटत राहते. मनुष्य कितीही समाजाभिमुख झाला तरी 'स्व' विषयीचे त्याच आकर्षण व 'स्व' मधील त्याचा रस पूर्णांशाने कधीही नष्ट होत नाही. 'स्व,हा प्रत्येक मनुष्याच्या बाबतीत पहिली प्रियवस्तू होती व तीच शेवटचीही प्रियवस्तू असते. फक्त कामवृत्तीच्या मानसिक अभिव्यक्तीचा काही अंश इतरांकडे लाविला जातो एवढाच फक्त बद्दल प्रारंभिक अवस्था व नंतरची अवस्था यात घडलेला असतो. निकोप मनुष्याविषयीची फ्रॉईडची कल्पनादेखील त्याच्या याच सिद्धांताला धरून आहे. फ्रॉईडच्या दृष्टीने जो मनुष्य पूर्ण आत्मप्रेमातून बाहेर पडून सामाजिकदृष्टया मान्यता पावलेल्या प्रमाणात आपल्या आत्मप्रेमाचा अंश इतर वस्तुमात्रांसाठी वापरीत असेल तर त्या समाजापुरता तो मनुष्य आरोग्यसंपन्न मनुष्य असतो. याचाच अर्थ असा की कुठलाही मनुष्य इतर व्यक्तिमत्वामध्ये स्वत:ला पूर्णत्वाने हरवून बसू शकत नाही. इतरांवरील त्याचे प्रेम हा त्याच्या आत्मप्रेमाचाच भाग असतो. आत्मानुरक्तीचा फक्त काही अंशच काय तो तो इतरां करिता वापरू शकतो. इतरांवर प्रेम करण्याची, त्यांच्याशी तन्मय होण्याची मनुष्याची शक्ती अमर्याद नसून मर्यादित आहे आणि मनुष्याने काहीही केलं तरी तिचे प्रमाण वाढविता येत नाही. प्रत्येक मनुष्य अंतर्यामी आत्मप्रेमी, म्हणूनच काही प्रमाणात स्वार्थी राहाणार असतो. बालकांचा स्वार्थ उघड दिसतो, मोठया मंडळींचा उघड दिसत नाही इतकेच !

फ्रॉईडच्या सिद्धांतामध्ये कामवृत्ती (libido) च्या प्रमेयाला सर्वाधिक महत्त्व आहे. फ्रॉईडच्या प्रतिपादनाप्रमाणे मनुष्याचे सगळे शारीरिक व मानसिक व्यापार ह्या एका वृत्तीने किंवा तत्त्वाने नियंत्रित केलेले आहेत. कामवृत्तीचा फ्रॉईडचा प्रबंध किती बरोबर किंवा चूक हृया प्रश्नात या ठिकाणी आपणास शिरायचे नाही. परंतु फ्रॉईडच्या कामवृत्तीच्या प्रबंधाच्या ऐवजी आपण जर मन:शक्ती (Psychic energy) चा प्रबंध मांडला तर फ्रॉईडचाच सिद्धांत अधिक समर्थपणे, कुशलतेने व व्यापकपणे वापरता येण्याची शक्यता निर्माण होते. तेव्हा कामवृत्तीच्या ऐवजी मन:शक्तीचे प्रमेय वापरून आपण फ्रॉईडचाच सिद्धांत पुढे चालवू. मन:शक्ती ही कामवृत्तीपेक्षा निश्चितच अधिक सर्वसाधारण व सर्वव्यापी शक्ती आहे. ही गोष्ट मला वाटते कुणीच नाकारणार नाही. लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही की मनुष्याचे मानसिक-शारीरिक व्यापार हे कार्यकारणभावात्मक तत्त्वावर काम करणाऱ्या यंत्राप्रमाणे घडत नसतात. त्याच्या हालचालींना कुठलेही एकच



अनुक्रमणिका

कारण दाखविता येण्यासारखे नसते. फ्रॉईडच्या प्रतिपादनात या प्रकारची कार्यकारणभावात्मक उपपत्ती अध्याहृत आहे. कामवृत्ती हे त्याच्या दृष्टीतील कारण आणि मनुष्याच्या मानसिक-शारीरिक हालचाली हे कार्य असे तो मानतो. मनुष्यामध्ये अनेक प्रेरणा काम करीत असतात व या प्रेरणासमुच्चयाकडून त्याच्या हालचाली घडविल्या जात असतात. त्यामुळे त्याच्या हालचालीचे गणित मांडताना एका प्रेरणेचे कार्य विचारात न घेता प्रेरणासमुच्चयाचे कार्य विचारात घ्यावे लागते.

नवजात अर्भक आणि मानसिक वेडा या दोघांच्या वर्तनाचा विचार केल्यास आपले म्हणणे अधिक स्पष्ट होईल. नवजात अर्भकाची जाणीव फक्त त्याच्या स्वतःतच गुरफटलेली असते. त्याचे शरीर हीच त्याच्या जाणीवेची मर्यादा. स्वतःव्यतिरिक्त इतर बाह्य जगाची कल्पनाही त्याला असत नाही. सर्व जग ते स्वततच सामावलेले पाहते. मी आणि न-मी हा भेदच त्याला कळत नाही. अर्भकाच्या दृष्टीतील एकमेव महत्वाचे अस्तित्व म्हणजे त्याचे स्वतःचे-त्याचे शरीर, ऊष्णता, थंडी, ओल इत्यादि संवेदना, भूक, तहान, झोपेची गरज इत्यादि भावना.

वेड्याच्या मनाची स्थिती काहीशी अर्भकाच्या मनाच्या स्थितीसारखीच असते. परंतु फरक इतकाच की अर्भकाच्या बाबतीत बाह्य, पृथक् जग अद्यापि अस्तित्वातच यायचे असते. वेड्याच्या बाबतीत त्या जगाचे अस्तित्व संपुष्टात आलेले असते. वेड्याला ते जग अस्तित्वात आहे हेच पटेनासे झालेले असते. तुमच्या देखिल पाहण्यात असे लोक आलेले असतील की ज्यांना निरनिराळे भ्रम होत असतात. कुणाला आवाज ऐकू येत असतील व आवाज करणारा मात्र दिसत नसेल. तर कुणाला काही भयानक दृश्ये दिसत असतील. आता हा जो अशरीरी आवाज ऐकू येण्याचा किंवा चित्रविचित्र दृश्ये दिसण्याचा प्रकार आहे तो भ्रमिष्टपणात मोडतो. कारण जे बाहेर नाही ते ह्या लोकांना दिसत असते. या लोकांचे पाहणे फार आत्मनिष्ठ बनलेले असल्याने वस्तुनिष्ठ जगच त्यांना दिसेनासे झालेले असते. काही लोकांच्या बाबतीत हाच भ्रमिष्टपणा आणखी पराकोटीला जातो व मग त्यांच्यापुरते वस्तुनिष्ठ जग अस्तित्वातच उरत नाही. उदा., एवढया-तेवढया कारणासाठी काही लोक विचकू लागतात. जिकडेतिकडे त्याना शत्रूचा वावर दिसू लागतो. हा एक स्थिरभ्रमविकृतीचा प्रकार असतो. परंतु त्याची संरचना ही अर्भकाच्या मनाच्या स्थितीच्या संरचनेसारखी असते. बाहेरील जगापासून या लोकांनी स्वतःला तोडून घेतलेले असते आणि धास्ती, भीती, संशय, मत्सर, चिंता इत्यादि भावनांच्या आवरणाखाली ते वावरत

असतात. त्यामुळे बाहेरील जगात घडणाऱ्या कुठल्याही घटनेचे वस्तुनिष्ठ, तटस्थ दृष्टीने अवलोकन ते करू शकत नाहीत. प्रत्येक घटना ते आपल्या मनातील भावगंडाच्या चाळणीतून पाहतात व हा भावगंड भयग्रस्ततेचा असल्याने त्यांना सर्वत्र शत्रूच शत्रू दिसतात. प्रत्येक बावतींत त्यांना त्यांच्याविरुद्धच्या कटाचा वास येतो साधा नस विकृत (neurotic) आणि या प्रकारचे मज्जाविकृत (psychotics) यांच्यातील हा भेद पाहण्यासारखा आहे. साध्या नसविकृताला या सगळ्या भीतीचे कारण स्वत:मध्ये आहे, आपल्या मनाच्या विशिष्ट स्थितीमुळे आपण जगाला घाबरत आहोत याचे पूर्ण भान असते. मज्जाविकृतापाशी हे भानच नसते. त्याला स्वत:मधील दोष दिसत नाहीत. त्याच्या दृष्टीने बाह्य परिस्थिती खरोखरच त्याला वाटते तशीच भयानक असून तो फक्त त्या परिस्थितीची प्रतिक्रिया व्यक्त करीत असतो. याचा अर्थ असा की नसविकृताच्या बावतीत बाहेरील जगाबरोबरील संबंध पूर्णत्वाने तुटलेले नसतात. मज्जाविकृताच्या बाबतीत हे संबंध पूर्णपणे तुटलेले असतात.

आता आपल्या मूळ विषयाकडे. हिटलर, स्टॅलिन, वेडा महंमद यांच्यासारख्या व्यक्ती या शुद्धी आणि भ्रम किंवा sanity आणि inansity या दोहोंच्या सीमारेषेवर वावरत असतात. त्यामुळे इकडून तिकडे त्या केव्हा पडतील याचा काहीच नेम नसतो. तशातच त्यांच्या हाती अमर्याद सत्ता आलेली असते. ही सत्ता खरोखरच कर्तुमकर्तुम् अशी असल्याने त्यांचे भान जाते. त्यांच्या ऐहिक सत्तेला कुठल्याही प्रकारची मर्यादा उरली नाही, इतरांचे जीवन आणि मरण, सुख आणि दु:ख, स्वास्थ आणि अस्वास्थ, रक्षण आणि नाश यांच्या बावतीत त्यांचा शब्द हा शेवटचा शब्द बनला, त्यांच्या शब्दाच्या आड येण्याची प्राज्ञा कुणापाशी उरली नाही की त्यांचे भान नाहीसे होऊ लागते. त्यांना आपण प्रतिईश्वर बनलो असे वाटू लागते. आता त्यांना फक्त आजार, वार्धक्य व मृत्यू या तीनच नैसर्गिक आपत्तींची भीती उरलेली असते. परंतु हीही भीती मनातून काढून टाकण्यासाठी ते जगाबरोबर बेफामपणे वागू लागतात. कुणाला सुळावर दे. कुणाला हत्तीच्या पायाखाली दे. कुणाला गॅस-कमऱ्यात कोंडून ठार मार, तर कुणाची बायकामुले, आईवडील यांची कत्तल कर अशा प्रकारचे अनन्वित प्रकार ते करतात. जणू काही आपण किती सर्वशक्तिमान आहोत याचाच विश्वास तशा प्रकारे वागून ते स्वत:ला पटवून देऊ पाहत असतात. मी माणसांना मृत्यू आणू शकतो. माझ्या एका शब्दाबरोबर हजारोंचे स्वास्थ्य व संपत्ती नाहीशी होऊ शकते, मी किती सामर्थ्यशील आहे, ही खात्री त्यांना हवी असते. अगदी आकांताने हवी असते. क्रौर्य हाच त्यांचा आता एकमेव दिलासा उरलेला असतो. क्रौर्यावर क्रौर्य वाढतच असते.



अनुक्रमणिका

अनेक निष्पाप व निरागस स्त्रियांना ते भ्रष्ट करतात. निरपराधांचा बळी घेतात. हवेत प्रचंड मनोरे बांधतात. आकाशातील चंद्राची वांछा धरतात. या सर्व धडपडी-मागे त्यांचा केवळ एक हेतू असतो. तो म्हणजे जे कुणाला कधी शक्य झाले नाही ते करू शकतो. ते करणार आहोत. वास्तविक हे ठार वेडेपण असते. परंतु या लोकांची आत्मानुरक्तीच इतक्या पराकोटीला पोचलेली असते की तिच्यापुढे त्यांना इतर काहीही दिसेनासे झालेले असते मी म्हणजे कर्तुममकर्तुम् ईश्वर एवढीच भावना आता त्यांच्या जाणीवेत उरलेली असते. आपण साधा मानव नसून आपण अतिमानव, प्रत्यक्ष परमेश्वराच्या तोडीचे आहोत हे त्यांना इतरांना आणि विशेषतः स्वतःला पटवून द्यायचे असल्याने हा अट्टाहास ते करीत असतात. शक्तिमानतेचा आव आणून ते स्वतःच्या अपूर्णतेचा, उणीवेचा प्रश्न मोडवू पाहत असतात. दिवसानुगतिक हे वेड वाढतच असते. कारण स्वतःच्या अपूर्णतेची, स्वतःच्या मानवीपणाची त्यांची भीती वाटत असते. या प्रक्रियेमध्ये जगाबरोबर ते खरेखुरे दुरावतही जात असतात. जितके ते इतर मानवप्राण्यां-पासून अधिक दुरावतात तितके त्यांचे वेडही तीव्र होत जाते. ते अधिकाअधिक एकाकी बनतात. एकाकीपणाबरोबर त्यांची धास्ती आणि भीतीही वाढत जाते. आता भोवताली वावरणारा प्रत्येक इसम त्याना शत्रूवत वाटू लागतो. ते आणखी क्रूर बनतात. अधिक दडपशाही करू लागतात. क्रौर्याच्या साहाय्याने मनावरील भीतीचे दडपण कमी करू पाहतात. सत्ता वाढल्यावाचून आपली धास्ती कमी होणार नाही असे त्यास वाटू लागते. सत्ता वाढविणे म्हणजे जुलूम व क्रौर्य वाढविणे हा त्यांचा साधा हिशेब असतो. नको तिथेही ते मग क्रौर्याने वागू लागतात. मग आणखी माणसे तुटतात. ते अधिक एकाकी बनतात. त्यांचे आत्मप्रेम आणखिच संकोचित बनते. आपण सर्वश्रेष्ठ असल्यानेच लोक आपला द्वेष करतात असाही एक समज त्यांच्यापाशी असतो. ते आता पूर्ण आत्मकेंद्रित बनतात आणि पूर्ण भयग्रस्तही ! जिथे ते नजर टाकतात, तिथे त्यांना दगलबाजी आणि विश्वासघात दिसू लागतो. ते पूर्ण कोंडले जाऊन कमालीचे हिंस्र बनतात. त्यांचे हिटलरछाप वेड पूर्ण वेड ठरायचा प्रसंग येतो. फक्त एका गोष्टीमुळे वेड्याच्या इस्पितळात जाण्यापासून ते वाचतात. ती गोष्ट म्हणजे बाहेरचे जग आपल्या वाइटावर असे जे त्यांना वाटत असते त्या त्यांच्या वाटण्यात थोडेबहुत खरोखरीचे तथ्य असते. हे तथ्य असल्याने वास्तवावरची त्यांची पक्कड अगदीच सुटल्यासारखी होत नाही. त्यांच्या हाती अमर्याद सत्ता असते. या सत्तेच्या जोरावर ते बाह्य जगाला त्यांना हवे त्या प्रकारे वाकवू शकतात. त्यामुळे सामर्थ्याच्या व सत्तेच्या केवळ काल्पनिक भ्रमात







आवरण्याची गरज त्यांना भासत नाही. कल्पनेला प्रत्यक्षाची जोड ते देऊ शकतात. जग यांच्या कल्पनेबरहुकूम वाकू, मोडू, वदलू शकते व या घटनेमुळे त्यांच्या आत्मविश्वासाला जोर मिळतो, त्यांच्या आत्मप्रीतीला आधार मिळतो. त्यांची स्वत:विषयीची भावना भयंकर आत्मानुरक्तीची खरी, परंतु हाती असलेल्या सत्तेच्या जोरावर त्यांनी जगाला स्वत:च्या मनाप्रमाणे नाचायला लावलेले असते. आपण प्रतिपरमेश्वर आहोत हे कबूल करावयास लावलेले असते. आपण जगातील एक मेव शहाणे, चतुर व सामर्थ्यशाली पुरुष आहो हे मान्य करावयास लावलेले असते. त्यामुळे त्यांचा अमानुष अहंगंड खरा भासावा अशी बाह्य परिस्थितीच तिथे उपस्थित झालेली असते. ही फसवी परिस्थिती त्यांना व त्यांच्या भोवतालच्या जगाला त्यांच्या कर्तृत्वाविषयी भूल घालते. शिवाय ज्यांना आयुष्यांत त्यांनी दुखविले आहे असे अनेक लोक बाहेरच्या जगात वावरत असतात. त्यांच्या खुनाचे वा पदच्युतीचे मनसुबे रचीत असतात. त्यामुळे याही बाबतीत त्यांची स्वत:विषयीचा समज चुकीचा नसतो. त्यांच्या स्वत:विषयीचा होकारात्मक व नकारात्मक अशा दोन्ही मतांना दुजोरा देणारी ही परिस्थिती त्यांना शहाणपणाच्या मार्गावर ठेवते. परंतु त्यांची शुद्धी ही एक फार नाजूक गोष्ट असते. ती केव्हा जाईल व तो ठार वेडा केव्हा होईल याचा भरवसा कोणीही देऊ शकत नाही.

तसे पाहिले तर जन्मास आलेली प्रत्येक व्यक्ती आत्मकेंद्रित आणि आत्मानुरक्त असतेच ! प्रत्येक मनुष्याला स्वत: चे शरीर ही जगातील एक अति मूल्यवान वस्तू वाटत असते. मग ते शरीर वा चेहरा कितीही कुरूप व बेढव असो. कुठल्याही मनुष्याला दुसऱ्याच्या सुंदर चेहऱ्याशी स्वत:च्या कुरूप चेहऱ्याची अदलाबदल करायची सूचना पसंत पडणार नाही. सर्वच माणसे आत्मकेंद्रित असतात. परंतु काही माणसे अतिच आत्मकेंद्रित असतात. त्यांना स्वत:-व्यतिरिक्त इतर कुणाचाही दृष्टिकोन दिसू शकत नाही. कारण स्वत:व्यतिरिक्त इतर कशातही त्यांना स्वारस्य नसते.

दिसायला सुरेख असणारी कित्येक मंडळी आपण पाहिली असतील. आरसा हा या लोकांचा फार मोठा दोष. तासन् तास ही मंडळी आरशासमोर घालवितात. ही मंडळी केवळ खोटी अहंकारी नसतात. त्यांचा आत्मा त्यांच्या शरीराच्या व चेहऱ्याच्या सुंदरपणात अडकलेला असतो, ग्रीक नार्सिसिझमप्रमाणे ग्रीक नार्सिसिझ स्वत:च्या सौंदर्याने वेडावून गेला होता. आणि पाण्यात पडलेल्या स्वत:च्याच प्रतिबिंबाकडे एकटक पाहून मरण पावला होता. आता ही आमची नवी मंडळी अशी मरत नाहीत, पण दुसऱ्या एका दृष्टीने ती मेलेलीच असतात. कारण त्यांना







वाढ नसते. या ठिकाणी नार्सिसिझची कथा सांगण्याचा मतलब हा की अतिरक्ती आत्मानुरक्ती सर्वथा वाईट असते. कारण ती आत्मनाशक असते. ती मनाची आणि पर्यायाने व्यक्तित्वाची वाढ होऊ देत नाही.

आता प्रश्न असा आहे की एखादा मनुष्य आत्मकेंद्रित व आत्मनुरक्त आहे हे ओळखायचे कसे ? ते ओळखायच्या काही खुणा आहेत त्या खुणा जर व्यक्तीच्या ठिकाणी आढळल्या तर ती व्यक्ती आत्मानुरक्त आहे असे निर्धास्तपणे म्हणता येते. आत्मानुरक्तांची पहिली खूण ही की या व्यक्ती कमालीच्या आत्मसंतुष्ट असतात. स्वत:मधील उणीवांची त्यांना यत्किंचितही जाणीव असत नाही. या व्यक्ती जेव्हा बोलतात तेव्हा त्यांच्या शब्दाशब्दातून हा आत्मसंतुष्टपणा व्यक्त होत असतो. अनेक वेळा त्यांचे बोलणे फुटकळ गप्पांच्या स्वरूपाचे असते; पण ते मात्र इकडे-तिकडे पाहत जणूकाही सभोवतालचे सगळे लोक त्यांचेच भाषण ऐकावयास जमले आहेत आणि आपण सांगत आहोत ती गोष्ट शंकराचार्यांच्या सत्याच्या तोडीचे सत्य आहे अशा थाटात बोलत असतात. आत्मानुरक्त लोकांना ओळखण्याची दुसरी खूण जगाच्या सुखदु:खाविषयीची त्यांची उदासीनता हे होय हे लोक स्वत:मध्येच इतके रंगलेले असतात की जगाच्या सुखदु:खात रस घ्यावयास त्यांना बिलकूल वेळ नसतो. ते आणि त्यांचे कर्तृत्व याव्यतिरिक्त त्यांच्या जगात इतर कशालाही थारा नसतो. इतर लोक त्यांना हवे असतात ते त्यांचे कौतुक करण्यासाठी. मनुष्यप्राण्यात त्यांना रस असतो म्हणून नव्हे. तुमच्याबरोबर ते बोलत असतील, पण त्यांचे बोलण्यात लक्ष ते जेव्हा बोलत असतात तेव्हाच काय ते असते इतरांच्या बोलण्यात त्यांना काहीही स्वारस्य नसते.

आत्मानुरक्तीसंबंधी सांगता येण्यासारखी एक आणखी गोष्ट :– आत्मनुरक्त मनुष्य स्वत:च्या संपूर्ण व्यक्तिमत्वाच्या प्रेमात पडलेला असेल असे नाही. बऱ्याचदा अशी माणसे त्यांच्या व्यक्तिमत्वाच्या कुठल्यातरी एका अंगाच्या प्रेमात सापडलेली असतात. कधी ती स्वत:च्या तथाकथित विलक्षण बुद्धिमत्तेच्या प्रेमात सापडलेली असतात. कधी शारीरिक वा चेहऱ्याचे देखणेपण हा त्यांच्या प्रेमाचा विषय असतो. शारीरिक बलसंपदा, कधी सत्ता वा संपत्ती ही त्यांच्या प्रेमाचा विषय असतात. मात्र ती कशाच्याही प्रेमात सापडोत, त्यांचे व्यक्तिमत्व हे त्यामुळे एकांगीच बनलेले असते.

आत्मनुरक्त इसम हा त्याच्या आत्मप्रतिमेच्या प्रभावात गवसलेला इसम असतो. कधी कधी त्या प्रतिमेच्या प्रभावात येणाऱ्या इतरही गोष्टी त्याच्या आत्मप्रीतीचा विषय बनत असतात. – त्यांचे विचार, त्याचे घर, त्याची मुले त्याचा देश, त्याचा धर्म, त्याच्या प्रभावळीतील लोक इ.

आत्मनुरक्ती ही जैविकदृष्ट्या उपकारक भावना आहे. असे पहा की जर तुम्हाला स्वत:विषयी जिव्हाळाच वाटला नाही तर तुम्ही तुमच्या जीविताचीही काळजी वाहणार नाहीं, तुम्ही पैसे कमविणार नाही; कुटुंबाची कदर करणार नाही वगैरे. या परिस्थितीत तुम्ही कदाचित साधु-संत बनाल, परंतु फार काळ तुम्ही तग धरणार नाही इतके मात्र खरे!

परंतु आत्मानुरक्तता जैविकदृष्ट्या उपयुक्त असली तरी ह्या भावनेतील अतिरिक्त वाढ जैविकदृष्ट्या अपायकारकही आहे. जो मनुष्य आत्मानुरक्तीत सापडला तो सगळ्या जगाला पारखा झाला. अशी मनुष्ये वेडीदेखील होतात. आत्मानुरक्ततेपासून दोन प्रकारचे संरक्षण असते. समाज आत्मप्रेमाला संपूर्णपणे त्याज्य ठरवीत नसतो. काही एका मर्यादेपर्यंत आत्मप्रेम करावयास समाजाचा विरोध नसतो. आत्मप्रेमाची ही पातळी जोवर उल्लंघिली जात नाही तोवर सामाजिक दृष्ट्या आत्मप्रेम वाईट नसते. दुसरी गोष्ट अशी कीं याच प्रेमाचा विषय बदलून ते प्रेम वेगळ्या दिशेकडे लावता येते. उदा., 'स्व'बद्दलचे प्रेम स्वधर्म स्वदेश, स्व-देव, स्व-समाज यांच्याकडे लावता येते.

आत्मानुरक्ततेचा सर्वात वाईट भाग हा की या प्रकारच्या आत्मप्रेमामुळे मनुष्याचा नैतिक व बौद्धिक दृष्टीकोन दूषित होतो. जो मनुष्य स्वत:च्या प्रेमात पडला तो वस्तुनिष्ट मूल्यमापनाला मुकला. ज्या वस्तूत वा व्यक्तित त्याच्या भावना अडकलेल्या असतात त्या वस्तू वा व्यक्ती त्यांच्या दृष्टीने अत्यंत मोलाच्या असतात. ज्यात त्यांना आस्था नसते त्या निरुपयोगी असतात. मी आणि माझे असा त्यांचा दृष्टीकोन बनतो. अशा मनुष्यांचे मूल्यमापन हे पूर्वग्रहदूषित आणि एकांगी असते. अर्थात बऱ्याचदा या पूर्वग्रहांना बौद्धिक समर्थन देण्याचा प्रयत्न होतो. परंतु तो प्रयत्न खरा नव्हे. मात्र या प्रकारच्या समर्थनातील खोटेपणा चटकन आपल्या ध्यानात येईल असे नाही. तशी ही समर्थने फार चतुर असतात. एखादा झिंगा जेव्हा आपणास सांगतो की मी सर्वशक्तिशाली वीर आहे, तेव्हा त्याच्या फुशारकीतील फोलपणा लगेच आपल्या ध्यानात येतो. परंतु एखादा बुद्धिमान मनुष्य जेव्हा अशाच प्रकारची घमेंड मारतो तेव्हा त्यातील आत्मगर्व आणि आत्ममोठेपणा आपल्या ध्यानात येईलच असे नाही. कारण तिथे वस्तुस्थिती काहीशी संमिश्र असते.

आत्मकेंद्रित व्यक्तीला कुठल्याही प्रकारची टीका सहन होत नाही. ही माणसे टीकेला फार संवेदनाशील असतात. एकतर ती टीकेमुळे संतप्त होतात किंवा वैफल्यग्रस्त बनतात. अर्थात संताप आणि वैफल्य या एकाच भावनेच्या दोन बाजू आहेत. दुखावल्याची भावना बाहेर प्रकटली तर ती संतापाचे रूप घेते. उलट ती आतल्या आत राहिली की औदासिन्य आणते.



अनुक्रमणिका

आत्मप्रेम हे नेहमी सहज दुखावले जाते यावर अर्थात एक तोडगा आहे हा तोडगा व्यक्तिक असतो म्हणजे व्यक्ती तो आपल्या आत्मप्रेमाच्या संरक्षणार्थ वापरू शकतो. मात्र त्यात व्यक्तीला संरक्षण मिळत असले म्हणजे व्यक्ती वेडाकडे झुकण्यापासून वाचत असली तर समूहाला त्या प्रकारच्या प्रक्रियेचा अनन्वित जुलूम सहन करावा लागतो आपण वर पाहिले की हिटलरसारखे हुकूमशहा हे कमालीचे आत्मप्रेमी असतात व या आत्मप्रेमातूनच त्यांचा जुलूम वाढत असतो. आपण वर दुसरी गोष्ट पाहिली ती ही की कुणाचेही आत्मप्रेम सहज दुखावले जाते. तिसरी गोष्ट आपण पाहिली ती ही की आत्मप्रेमी लोकांच्या स्वतःच्या प्रतिमेविषयीच्या व जगातील स्वतःच्या स्थानाविषयीच्या काही लोकविलक्षण कल्पना असतात. आता या कल्पनांवर जर आघात झाला तर या व्यक्ती दुखावल्या जाणार असतात. परंतु अशा वेळी त्यांच्या हाती आलेली अमर्याद सत्ता त्यांच्या कामी येते. किंबहुना त्यांच्या एक प्रकारच्या अतिरंजित आत्मप्रतिमेमुळे ते अशी सत्ता काबीज करण्याच्या मागेच असतात. ही सत्ता त्यांना मानसिक संरक्षण देते व वेड लागण्यापासून वाचविते. कारण असे की हाती असलेल्या अमर्याद सत्तेच्या जोरावर या व्यक्ती जग आपल्या कल्पनेबरहुकूम वाकवू शकतात. आपल्या कल्पनेतील रंग जगाला देऊ पाहतात व त्या प्रयत्नात कोण मेले आणि कोण जखमी झाले याकडे बिलकुल लक्ष पुरवित नाहीत. नव्हे जितके म्हणून हृदयशून्य वागता येईल तितके हृदयशून्य वागतात. त्यांना जगात आपला दरारा निर्माण करायचा असतो. दरारा हेच त्यांच्या जीवनाचे ब्रीदवाक्य असते. सत्तेमुळे काही काळ तरी जग ते आपल्या बाजूला वळवू शकतात. असे झाले म्हणजे वस्तुस्थिती काही प्रमाणात तरी त्यांच्या मनातील कल्पनाचित्राशी सुसंगत बनते व वास्तवावरील त्यांची पकड कायम राहू शकते. जर तसे घडले नसते तर या व्यक्ती ठार वेड्या बनल्या असत्या. परंतु जगाच्या बाबतीत त्यांना जो एक क्रियाशील पवित्रा घेता आला त्याच्या जोरावर वेडेपणाचे आक्रमण ते दूर ठेऊ शकतात. या व्यक्ती वेड्या असतात ही गोष्ट खरी; परंतु त्यांच्या वेड्या कल्पनावर व स्वतःविषयक मतावर लक्षावधी लोकांना विश्वास ठेवावयास ते प्रवृत्त करू शकल्याने ते वेडे बनत मात्र नाहीत. त्यांच्या स्वविषयक मोठेपणाच्या कल्पनेला दुजोरा द्यावयास अगणित लोक पुढे आल्याने ते वेडाच्या झटक्यापासून काही काळ तरी वाचतात. हिटलर हा एक कमालीचा आत्मकेंद्रित आणि आत्मानुरक्त पुरुष होता. परंतु आयुष्याच्या प्रारंभीच त्याच्या वेड्या कल्पनावर आणि आत्ममोठेपणाच्या कल्पनेवर भरवसा ठेवावयास हजारो, लाखो तरुण व मध्यमवर्गीय लोक तो मिळवू शकला. दांडगावाजी प्रचार, आक्रमक भाषणे, कुणाच्या तरी द्वेषाचे व

निर्मूलनाचे आवाहन अशी अनेक तंत्र वापरून त्याने समाजातील एक फार मोठा गट स्वतःच्या बाजूने उभा करण्यात यश मिळविले. या यशामुळे त्याची मज्जाविकृती टळली व वस्तुस्थिती तो अशा प्रकारे बदलू शकला की त्याच्या भक्तांना आणि अनुयायांना हिटलर बरोबर असून जगाचेच चुकते आहे असे वाटू लागले. (दुसऱ्या महायुद्धाच्या शेवटी अपयश आल्यानंतर त्याला आत्महत्या करून जीवनाचा शेवट करून घ्यावा लागला, कारण आत्मप्रीतीला बसलेला एवढा प्रचंड हादरा तो सहनच करू शकणार नव्हता.)

आत्मगौरवाच्या अवास्तव भावनेने पछाडलेले हिटलरसारखे अनेक भ्रमिष्ट पुढारी इतिहासात आजवर होऊन गेले आहेत. (आजही विद्यमान आहेत.) या सर्वांनी आत्मानुरक्ततेतून जे वेड त्यांच्या बाबतीत निर्माण होणार होते ते केवळ त्यांच्या हाती असलेल्या अमर्याद सत्तेच्या जोरावर जगच त्यांच्या वेडाच्या कल्पनेबरहुकूम बदलून थोपवून धरलेले आढळते. या प्रकारचे पुढारी वाजवी वा गैरवाजवी कसलीच टीका सहन करू शकत नाहीत व त्याचमुळे टीकाकाराला जिवानिशी मारल्यावाचून त्यांना स्वस्थता लाभत नाही. मानसिक निरोगीपणाचा व बौद्धिक शुद्धिचा आवाज त्यांना कधीही सहन होत नाही. कारण ते वेडाच्या लहरीत असतात व असा आवाज हा अपरिहार्यपणे त्याच्या स्वविषयक प्रतिमेला धोकादायक असतो. म्हणून तो आवाजच ते कायमचा बंद करू पाहतात. नीरोपासून स्टॅलिन-हिटलरपर्यंत सर्वांनी हाच मार्ग स्वीकारलेला आहे. नीरोपासून स्टॅलिन हिटलरपर्यंत अनेक अहंकेंद्रित, आत्मप्रेमी व भ्रमिष्ट पुढारी होऊन गेले. अंधविश्वासू अनुयायी व भगतगण जवळ करणे ही त्यांची मानसिक गरज होती. त्यांच्या डोक्यातील वेडाबरहुकूम जगाचा रंग पालटणे हीही त्यांची मानसिक गरज होती. तसे केल्यावाचून त्यांचो मानसिक शुद्ध टिकणार नव्हती. ते ठार वेडे होणार होते. त्यांच्या अंतर्यामीतूनच त्यांना तो आदेश मिळत होता. अंधविश्वासू भगतगण जमा करणे ही जशी त्यांची मानसिक गरज होती तशीच मानसिक गरज आपल्या टीकाकारांना यमसदनास पाठविणे हीही होती. तसे ते न करते तर त्यांच्या आत्मगौरवाच्या अवास्तव चित्राला धक्का बसणार होता. परंतु गंमतीची गोष्ट ही होती की त्यांच्या व्यक्तित्वामध्ये हा जो स्थिरभ्रमविकृतीचा अंश होता त्या अंशामुळेच त्यांना जनतापुढारी होता आले होते. त्यांच्यातील वेडाच्या अंशामुळे लोकांचा विश्वास आकर्षित करू शकणारा ठामपणा व निःसंदेहपणा त्यांच्या शब्दात आलेला होता. निःशंकता व सामर्थ्य प्राप्त झाले होते. हाच ठामपणा, निःसंदेहता आणि विश्वासार्हता सामान्य मनुष्याला हवी असतात. सामान्य मनुष्याला फार काळ संशयित स्थितीत राहावयास आवडत नाही. त्याला



अनुक्रमणिका

ठाम मते, ठाम भूमिका, ठाम कार्य हवी असतात. सामान्य मनुष्याची मानसिक गरज ही असते. ही गरज स्थिरभ्रमिष्ट पुढाऱ्यांकडून सहज पुरी होते. त्याउलट विचार, बुद्धी हाच ज्याचा महत्त्वाचा गुण आहे त्याच्याकडून हे होण्यासारखे नसते. कारण शंका, अनिश्चय हा त्याच्या स्वभावाचा स्थायीभाव असल्याने कुठल्याही बाबतीत तो एकांतिक भूमिका घेऊ शकत नाही. म्हणून जनता एखाद्या स्थिरभ्रमविकृताच्या मागे जितक्या आतुरतेने जाते तितक्या आतुरतेने शहाण्या पुढाऱ्याच्या मागे जात नाही. अर्थात एवढी मोठी जनता झुलविता येण्यासाठी काही नैसर्गिक गुण आणि कौशल्य साध्य असावे लागते हेही तितकेच खरे आहे.

आत्मप्रेम व्यक्तिक असते तसेच सामूहिकही असते. देशाचे प्रेम, कुलाचे प्रेम, समूहाचे प्रेम, जातीचे प्रेम यांचे रूपांतर त्याच प्रकारच्या आत्मप्रेमात होऊ शकते. युद्ध, अत्याचार, हिंसा या घडामोडीत याच सामूहिक आत्मप्रेमाचा सर्वात मोठा वाटा असल्याने या सामूहिक आत्मप्रेमाची रचना समजून घेणे भाग आहे.

व्यक्तिक आत्मप्रीतीप्रमाणेच सामूहिक आत्मप्रीतीचेही काही जैविक उपयोग आहेत आणि दुरुपयोगही आहेत. मनुष्ये आपली जात कुल, वंश, देश, धर्म, राष्ट्र यांच्यावर प्राणपणाने प्रेम करू शकतात. म्हणूनच त्यांच्यावर काही संकट कोसळले की त्यांच्या रक्षणार्थ प्राणपणाने लढू शकतात. जर ती असे प्रेम करू शकती ना, तर ती प्राणपणाने लढूही शकती ना. एखादा गट वा समूह काळाबरोबर टिकून राहतो याचे कारण त्या गटाच्या वा समूहाच्या घटकास आपला गट वा समूह स्वप्राणाइतका किंवा कधी कधी तर प्राणाहूनही अधिक मौलिक वाटतो. त्या घटकांना जर तो गट इतका मौलिक वाटला नसता तर तो गट फार काळ एकत्रितही राहू शकला नसता. आपल्या समूहाचे नैतिक, धार्मिक, राजकीय वा राष्ट्रीय श्रेष्ठत्व त्यांना वादातीत वाटले नसते, तर इतक्या पोटतिडकीने त्या समूहाचे सभासद एकत्रित राहिले नसते. सभासदांना तो समूह श्रेष्ठ तर वाटतोच परंतु सर्वश्रेष्ठही वाटतो. अशा प्रकारची आत्मानुरक्ता त्या समूहघटकांच्या ठायी जर निर्माण होऊ शकली नसती, तर समूहाच्या रक्षणासाठी, सेवेसाठी वा प्रसंगी समूहाकरिता आत्मसमर्पणासाठी जी एकी व शक्ती आवश्यक असतात ती उपलब्धही झाली नसतीत.

व्यक्तिक आत्मप्रीतीच्या चर्चेच्या वेळी एक गोष्ट आपल्या ध्यानात आली असेल. ती ही की आत्मप्रीतीचे काही सदुपयोग आहेत आणि काही दुरुपयोगही आहेत. मला जर माझ्या स्वतःच्या वैशिष्ट्याविषयी प्रेम वाटणार नाही तर मी कोणी तरी मोठा होण्याचा प्रयत्नही करणार नाही. माझी स्वतःच्या मोठेपणा-विषयीची कल्पनाच माझ्या हातून अपप्रकार घडू देत नाही. परंतु माझा स्वतः-

विषयीचा अभिमान जर पूर्णतः पोकळ असेल तर तो खोटा अभिमान टिकविण्यासाठी मी अनन्वित कृत्येही करीन. हा आत्मप्रेमाचा दुरुपयोग.

व्यक्तिक आत्मप्रेमाचे सदुपयोग आणि दुरुपयोग हे दोन्हीही प्रकार सामूहिक आत्मप्रेमातही आढळून येतात गट वा समूह जर बेतशीर प्रेम स्वतःवर करीत असेल तर आपल्या गटाचे नाव व्हावे, आपण उर्जितावस्थेस यावे म्हणून एकदिलाने प्रयत्न करील. परंतु ही आत्मप्रीती जर खोट्या अहंकारात व वेड्या आत्मभक्तीत परिणत झालेली असेल, तर शेजाऱ्याच्या वा इतरांच्या कुरापती काढल्यावाचून, कुणाशी ना कुणाशी युद्ध केल्यावाचून त्या आत्मभक्तीचे समाधान होणार नाही. युद्धे, जमातींमधील हिंसक तंटे, अत्याचार हे अशा प्रकारच्या वेड्या आत्मभक्तीचे परिणाम असतात. ही खोटी आत्मभक्ती ओळखायची असेल तर त्या समूहाच्या भक्तीचे विषय काय आहेत हे समजून घ्या. जर हे विषय दिव्य गतेतिहास, भूतकालीन पराक्रम, नामवंत पूर्वज हे असतील, तर हा समाज खोट्या मोठेपणात रमणारा असून तो अतिरिक्त आत्मानुरक्त आहे असे समजावयास कुठलाही प्रत्यवाय नाही. तसेच हा विकृत आत्मानुरक्तपणा उत्तरोत्तर वाढत जाणार असून हिंसक कृतीतून तो बाहेर पडणारा आहे असेही समजावयास हरकत नाही. सामान्यतः मात्र आत्मानुरक्ततेचे वाईट आणि चांगले असे दोन्ही गुण एकत्रित आढळतात.

दुसऱ्या एका प्रकारे सामूहिक आत्मप्रीतीचा उपयोग राज्यकर्त्यांना होत असतो. अंतर्गत बदिली आणि मुलकी बंडाळी यावर सामूहिक आत्मप्रीतीच्या आवाहनासारखा उपाय नाही. प्रत्येक समाजामध्ये आर्थिक वा सामाजिक विषमतेमुळे अनेक प्रकारचे असंतोष काम करीत असतात. कधी कधी हे असंतोष बिकट स्थिती धारण करतात. अशा वेळी समाजाच्या आत्मप्रीतीच्या भावनेला जर यशस्वी आवाहन करता आले तर असंतोषाचा लोंढा थांबविता येतो. एवढेच नव्हे तर एका वेगळ्याच पातळीवर समाजाची एकी घडवून आणता येते. या राजकीय तंत्राचा उपयोग अनेक देशांतील पुढारी करून घेताना दिसतील दारिद्र्य, सरकारी नोकर व राज्यकर्ते यांच्यातील भ्रष्टाचार आणि लाचलुचपत याने हवालदिल झालेली जनता बंड करण्याच्या बेतात असली, की खऱ्या वा खोट्या ( बहुतेक खोट्याच ) शत्रूच्या आक्रमणाची भीती घालून जनतेची एकी घडवून आणण्याचे प्रकार इतिहासात वारंवार घडून आलेले आहेत बहुसंख्य लोकांच्या नशिबात दारिद्र्य आणि उपासमार याहून दुसरे काहीही चांगले नाही अशाही देशातील लोकांना त्यांच्या अहंकाराला चिथावणी देऊन, त्यांच्या सांस्कृतिक मोठेपणाला आवाहन करून एकत्रित राखता येते. ते पूर्वी फार फार बलाढ्य

असलेल्या एका वंशाचे आपण वंशज आहोत या आवाहनाखाली कसल्याही परिस्थितीत न कुरकुरता माणसे एकत्र राहू शकतात. फक्त त्यांची ही भावना चेतविली मात्र गेली पाहिजे पूर्वजांच्या मोठेपणाचा खोटा भ्रम ही एक लोकविलक्षण गोष्ट आहे शहाण्यासुरत्यांनाही तिने झिंग आणता येते. हिटलरच्या जर्मनीत नेमके हेच घडले होते. हिटलरचा जर्मनवाद हा एकांतिक वंशवाद होता. तो वंशवाद फोफावला कारण अनेक दिशांनी तेव्हाचा जर्मन देश चिरडला जात होता. आर्थिक व राजकीय बाबतीत तेव्हाचा जर्मन देश कितीतरी दिशांनी दडपला गेलेला होता. जर्मन माणसाच्या जीवनात सुख मानावे असे तेव्हा काहीही नव्हते. अशा वेळी पूर्वजांच्या पराक्रमाच्या गौरवाचे व आत्ममोठेपणाचे जे पोवाडे हिटलर गात होता ते सर्वसामान्यही जर्मन नागरिकाच्या हृदयाला तावडतोब भिडत होते. हिटलर पददलित जर्मन लोकांना सांगत होता की जगातील एका अत्यंत शुद्ध रक्ताचे लोक आपण लोक आहोत. बलाढ्य वीर आम्हीच, भीमपराक्रमी लोकही आम्हीच ! आमच्यावर आज जो अवनतीचा प्रसंग कोसळला आहे तो आमच्या चुकीमुळे किंवा दुर्दैवामुळे नव्हे. तर एका अशुद्ध रक्ताच्या लोकांच्या कारस्थानामुळे या प्रकारचे आवाहन आकर्षक आणि सुखद न वाटते तरच नवल! हिटलरने रंगविलेली आत्मप्रतिमा इतकी विलोभनीय होती की एकाच वेळी तिने मागासलेपणाचे स्पष्टीकरण दिले व प्रगतीची शाश्वतीही दिली. अशा प्रकारच्या प्रचारामध्ये स्वतःला मोठा मानणाऱ्या गटाचा घटक स्वतःशी असा युक्तिवाद करतो की "आर्थिक दृष्ट्या मी गरीब असेन मला चांगली नोकरी नसेल, माझ्यापाशी मोठा धंदा नसेल, पण एका बलाढ्य व प्राचीन वंशाचा मी वंशज आहे " ( आपण इकडे शिवाजी महाराजांचे वंशज म्हणवून घेऊन तेच करीत असतो. )

मनुष्यजातीचे दुर्दैव असे की व्यक्तिक प्रकारची आत्मानुरक्ती जितक्या सहजतेने ओळखता येते तितक्या सहजतेने सामूहिक प्रकारची आत्मानुरक्ती ओळखता येत नाही. परिणामी सामूहिक आत्मानुरक्तीच्या दुष्परिणामातून समूहाला संरक्षण फारसे लवकर मिळू शकत नाही. एखाद्या मनुष्याच्या केवळ वागण्याकडे पाहून तो किती आत्मानुरक्त आहे हे ताडता येते. परंतु एखादा जातीयवादी वा तथाकथित राष्ट्रवादी पुढारी जेव्हा आपल्या जातीच्या वा राष्ट्राच्या श्रेष्ठत्वाची आणि इतर जातींच्या वा राष्ट्रांच्या कनिष्ठत्वाची लंबीचवडी भाषणे करतात, तेव्हा त्यांची ती भाषणे फसवी असून त्याज्य असतात हे कुणाच्याही ध्यानात येत नाही. कारण भाषण ऐकणारे लोक त्यांच्या त्या खोट्या भावनेत आधी सामील झालेले असतात. एखादा पिसाट पुढारी जेव्हा जनतेला



अनुक्रमणिका



सांगतो की "जगातील एकमेव श्रेष्ठ लोक तुम्हीच. तुमची कुणाहीबरोबर तुलना होऊ शकणार नाही. तुमच्याइतके बुद्धिमान तुम्हीच; इतर तुमच्या पासंगालाही पुरणार नाहीत. आताचे तुमचे दुर्दैव हा केवळ इतरांच्या कपटाचा परिणाम आहे. तुमचा पराक्रम अलौकिक आहे. म्हणूनच तर सर्व लोक तुमचा द्वेष करतात." तेव्हा त्याच्या त्या गूढ भाषणाला चांगले चांगले हुशार लोकही बळी पडतात. कारण ही भाषणे सर्वांच्या अहंगंडाला खुलविणारी असतात. अहंगंड खुलविला गेल्यामुळे त्यांची चिकित्सक बुद्धी लुळी पडते. खरे-खोटे, न्याय-अन्याय, इष्ट-अनिष्ट, श्रेय-अश्रेय त्या बुद्धीला कळेनासे होते. सांगायचा मुद्दा हा की व्यक्तीचा अहंगंड चटकन ओळखता येतो, परंतु समूहाचा तशाच प्रकारे फुगलेला मी चटकन ओळखता येत नाही. कारण आता धर्म, राष्ट्र, वंश, देश, पक्ष यांच्या नावाने या आत्मगौरवाच्या गोष्टी चालू असतात. राष्ट्रभक्ती, धर्मभक्ती, वंशभक्तीच्या नावांनी लोक चटकन भारावले जातात. या नावाखाली इतरांवर अन्याय करताना, अत्याचार करताना लोकांना खंत वा शरम वाटत नसते. कारण ते त्या गोष्टी एका समष्टीसाठी करीत असतात. वस्तुत: त्या ठिकाणी समष्टी हे एक अमूर्त असते जसे 'लोक,' जनता ही अमूर्ते असतात तसे. आमचा धर्म वा राष्ट्र श्रेष्ठ, इतरांचा धर्म वा राष्ट्र कनिष्ठ या मताचा अर्थात इतर धर्मियास वा राष्ट्रीयास राग येईल. परंतु ज्या राष्ट्रातील वा धर्मातील लोकांच्या बाजूने ते मत व्यक्त केले गेलेले असते ते मात्र त्यामुळे हुरळून गेलेले असतील. त्यांना ते बोलणे विपर्यस्त किंवा असयुक्तिक कधीही वाटत नाही. त्यांच्या दृष्टीने या अफलातून पुढाऱ्यांची भाषणे सयुक्तिक व बरोबर नव्हेच परंतु अगदी योग्यही असतात. (वास्तविक बहुमत्य लोकांच्या बाबतीत त्या लोकांना जे वाटते ते सत्यच असते असे नाही, ज्या बाबतीत त्या सर्वांचे एकमत असते ते त्या सर्वांच्या दृष्टीने युक्त, इतकाच युक्त या शब्दाचा जनतेच्या दृष्टीतील अर्थ अनेकांना ते सयुक्तिक वाटते म्हणून युक्त, युक्ततेचा बुद्धिशी फारच थोडा संबंध असतो. )

मानवजातीच्या प्रारंभीच्या काळी मानवी समूह रक्ताच्या संबंधातून ठरविले जात. जे एका रक्ताचे ते एका गटाचे. नंतर भाषा, धर्म, समाजव्यवस्था यांच्यावर ते ठरू लागले. समूहातील घटकांची संख्या वाढली तरी आत्मप्रीतीच्या प्रमाणात फरक होत नसतो. समूह लहान असो वा मोठा, आत्मप्रीतीची पातळी नेहमी कायमच राहते. कित्येक वेळा ही पातळी वाढतही जाते. कारण आता त्या समुहाची शक्ती देखिल कितीतरी पटींनी वाढलेली असते. इतरांपासूनचा तिला असणारा धोका कमी झालेला असतो. उलट स्वतःच्या वेगळेपणाचा तिचा अहंकार वाढलेला असतो. अर्थात धंदाव्यवसायानिमित्त इतर धर्मिय वा राष्ट्रीय यांच्याशी जो संबंध येतो त्यामुळे तेवढ्या-तेवढ्या पुरती ही तीव्रता कमी होऊ शकते. या गोष्टींकडे दुर्लक्ष करता येत नाही.



अनुक्रमणिका

मानवजातीच्या सामूहिक आत्मप्रीतीतील सर्वांत वाईट भाग जर कोणता असेल तर तो हा की मनुष्य सामूहिक आत्मप्रीतीच्या आहारी गेला की त्याची सारासार विवेकबुद्धी नष्ट होते. त्याला खरे आणि खोटे कळेनासे होते. इष्ट आणि अनिष्ट दिसेनासे होते. व्यक्तिक आत्मप्रीती देखिल. हे दोष आहेत परंतु त्यांचे प्रत्यक्ष परिणाम तितकेसे भयानक होत नाहीत. सामूहिक आत्मप्रीतीचे परिणाम सामूहिक प्रमाणावर होत असल्याने या आत्मप्रीतीचे धोके फार भयानक असतात. इथे मनुष्यांचा एक मोठा गटच्या गट मूढ बनलेला असल्याने त्याच्या मूढतेची झळ फार दूरवर पोचत असते. समूह मूढ बनला की त्या समूहाचे नैतिक निर्णय फक्त चुकतात एवढेच नसून ते बेजबाबदारही बनतात. किंबहुना नैतिक निर्णय घेण्याची पात्रताच अशा वेळी त्या समूहाशी उरत नाही. म्हणूनच राष्ट्रीय आत्म-भक्ती ही गोष्ट अनेकदा नैसर्गिक आपत्तीहूनही भयंकर ठरते. जर्मन आत्मभक्तीचे परिणाम दोन महायुद्धात साऱ्या जगाने उपभोगिले आहेत. ( पाक आत्मभक्तीचे परिणाम काय झाले ते आपल्यासमोरच आहे. पाकिस्तानच्या भारताबरोबरच्या वैराचे खरे कारण पाकिस्तानच्या स्वतःविषयीच्या अवास्तव मोठेपणाच्या कल्पनेत आहे. )

व्यक्तिक आणि सामूहिक ह्या दोन्हीही प्रकारच्या आत्मप्रीतींना आपल्या अहंकाराचे समाधान हवे असते. परंतु व्यक्तिक पातळीवर या अहंकारसमाधानाचा धोका कमी असतो. सामूहिक पातळीवर तो फार भयंकर असतो. एका सामान्य पातळीवर आमची मते, आमचे विचार, आमचे देव किती चांगले व इतरांचे किती वाईट याच्या तुलनेतून हे समाधान मिळत असते. धार्मिक गटांना तर माझा धर्म श्रेष्ठ, इतरांचा व्यर्थ या भावनेतून हेच समाधान कितीतरी सहजतेने मिळत असते. आमचा देव खरा, इतरांचा खोटा, या भावनेतून आजवर कितीं-एकांनी हे समाधान मिळविले आहे. मात्र इतरांना कमी लेखण्यासाठी धर्माच्या घटकाचीच मदत घ्यावयास लागते असे नाही. आमचा रंग, आमचा व्यवसाय, आमचा इतिहास, आमचा वर्ण यांपैकी काहीही त्यासाठी पुरेसे असते. आम्ही गोरे म्हणून श्रेष्ठ, निग्रो काळे म्हणून कनिष्ठ, ( आम्ही सवर्ण म्हणून श्रेष्ठ, इतर अस्पृश्य म्हणून कनिष्ठ, आम्ही मराठी म्हणून श्रेष्ठ, इतर गुजराथी वा मद्रासी म्हणून कनिष्ठ हे युक्तिवाद याच जातीचे असतात. ) कुठलीही जमात याप्रकारे स्वतःला मोठा ठरवून इतरांना तुच्छ मानू शकते. फक्त काही बाबतीत तरी वस्तुस्थिती तिच्या बाजूची हवी. म्हणजे काही ना काही बाबतीत तिच्यापाशी खरे कर्तृत्व असावयास हवे. जोपर्यंत अभिमान बाळगता येण्यासारखी काही बाब त्या समाजापाशी आहे, तोवर तो समाज आपल्या आत्मगौरवाच्या ताठ्यात राहू शकतो व त्या ताठ्याला आवाहन करून तो भावना प्रज्वलित करू शकतो. मात्र



अनुक्रमणिका



ठकनिष्ठपणाची ज्याच्याशी तुलना करता येईल असा एखादा समाजांतर्गत गट र समाजापाशी नसेल तर त्या समूहाची सगळी आत्मप्रीती लष्करी आत्म-गौरवाकडे वळू लागते.

व्यक्तिक आत्मप्रीतीभावना दुखविली गेली असता ज्या प्रकारे संताप जागृत होतो त्याच प्रकारे सामूहिक आत्मप्रीतीभावना दुखविली गेली असताही घडते. उदा., राष्ट्रध्वज, राष्ट्रधर्म, आपले नेते, देव यांची अप्रतिष्ठा केली गेली असे आढळल्यास, युद्धात पराभव झाल्यास, त्या देशातील लहानथोर अशा समस्त लोकांचा संताप घडून येत असतो. सूडभावना प्रज्ज्वलित होते. दुखावली गेलेली सूडभावना फक्त अपमानाच्या प्रतिशोधानेच शांत होऊ शकते. व्यक्तिक अथवा राष्ट्रीय सूडभावना ही अनेकदा दुखावल्या गेलेल्या आत्मप्रीतीची प्रतिक्रिया असते.

आत्मप्रीतीच्या रोगाचे एक महत्त्वाचे लक्षण जाता जाता सांगण्यासारखे आहे. आत्मप्रीतीच्या रोगाने पछाडलेल्या मानवी समूहाला नेहमी तशाच मानसिक रोगाने पछाडलेल्या पुढाऱ्याची गरज भासत असते. अतिरिक्त आत्मप्रीती नेहमी नकारात्मक–भावनांवर इतरांचा मत्सर–मनापासून प्रेम करते आणि स्वतःवरचे प्रेम त्याच्यावर करते. मनापासून प्रेम करते. स्वतःवरील प्रेमाचा ओघ त्याच्याकडे वळविते. कारण पुढाऱ्याच्या रूपाने जनताच मध्यस्त जीवन जगत असते. पुढाऱ्याला त्यांनी दिलेली शरणागती हे पुढाऱ्याला त्यांनी केलेले स्वतःच्या प्रीतीचे दान असते. कुठलाही अनुयायी जेव्हा मनोभावे पुढाऱ्याच्या भजनी लागलेला असतो, तेव्हा स्वतःमधील त्या विशेषावर त्याचे अत्यंत प्रेम असते त्या विशेषाचे अस्तित्व तो पुढाऱ्याच्या ठिकाणी पाहू लागलेला असतो. अनुयायी पुढाऱ्याच्या निमित्ताने स्वतःवरच प्रेम करीत असतात ही गोष्ट बरोबर ध्यानात ठेवावयास हवी. अनुयायीत्व ही अशा प्रकारे परस्परपूरक आणि एकात्मभावाची घटना आहे. मनाने अनुयायी पुढाऱ्याशी एकरूप असतो. पुढाऱ्यात स्वतःला पाहतो व स्वतःत पुढाऱ्याला पाहतो. जितका मोठा पुढारी तितका मोठा अनुयायी हे त्यामागील साधे तर्कशास्त्र असते. कारण हा संबंधच परस्परावलंबी आणि परस्परपूरक असतो. ज्यांचे व्यक्तित्व मुळातच आत्मानुरक्त आहे असे लोक आत्मानुरक्त लोकांचे पुढारपण करावयास अगदी सुयोग्य असतात. कारण, कारण तो जनतेच्या आत्मानुरक्तित व जनता त्याच्या आत्मानुरक्तीत स्वतःला सहज विसरून जाऊ शकतात. स्वतःच्या अहंपणाविषयी ज्याला तिळमात्र शंका नाही असा मनुष्य त्याच्या ठिकाणी विलक्षण विश्वास निर्माण करू शकतो. अहंपणा आणि आत्मविश्वास (मग तो खोटा का असेना) जनतेची मने चटकन आकर्षून घेतात. कारण पुढाऱ्या-मध्ये जनता स्वतःलाच पाहत असते. अशा जातीचा अर्धवेडा पुढारी बहुधा मोठा

यशस्वी पुढारी असतो. त्याचा मूर्खपणा, त्याच्यातील निर्णयशक्तीचा अभाव, त्याच्या राजकीय तत्रातील चुका, परामवाविषयीची त्याची तीव्र सतापी प्रतिक्रिया यामुळे स्वतःचाच नाश तो घडवून आणिस्तवर त्याचे पुढारीपण टिकते. या चुका एकदा घडल्या व जनतेत तो उघडा झाला की त्याच्या भजनी लागलेले लोकच त्याचा तिरस्कार आणि द्वेष करू लागतात. तसेच त्याचे हिंस्र, आक्रमक, आक्रस्ताळी वर्तन आणि विचार यामुळे राजकारणात प्रारंभी जरी तो यश मिळवू शकला, तरी त्याचा मूळ रोग रानटीपणाचा, मूर्खत्वाचा व खोट्या आत्मगौरवाचा आणि अहंगंडाचा असल्याने या प्रकारच्या पुढाऱ्यांचे पतन हमखास घडणारच असते. एक ना एक दिवस ते भयानक चुका करतात आणि इतरांबरोबरच स्वतःचाही नाश घडवून आणतात. परंतु मानवजातीच्या दुर्दैवाने जगात अशा प्रकारच्या आत्मानुरक्त पुढाऱ्यांची वाण नसते आणि मानवजातीची आत्मप्रीतीही कमी होत नाही. त्यामुळे या अधवेड्या मज्जाविकृतांच्या तावडीतून जनता कधीही सुटत नाही.

मानवी हिंसकपणाच्या बाबतीत मृत्युआकर्षण आणि आत्मानुरक्ती ह्या विचार करण्यासारख्या दोन धारणांचा फ्रॉईडने दिलेल्या मर्मदृष्टीच्या आधाराने आपण विस्तृत विचार केला. फ्रॉईडच्या प्रबंधात आपण काही सुधारणाही केली. या दोन्ही धारणा सौम्य असतात तेव्हा त्या जीवनोपयोगी असल्या तरी त्या पराकोटीला गेल्या की त्या फार अपायकारक होतात आणि जीवन आणि आत्मिक वाढ यांना पूर्णतः प्रतिकूल बनून जीवनविध्वंसक ठरतात असे आपण पाहिले.

मानवी हिंसकपणाच्या संदर्भातच विचार करावे असे आणखी एक मानसिक तत्त्व फ्रॉईडने सूचित केले आहे. मनुष्य स्वःमध्ये अडकलेला असतो तसाच तो त्याच्या जन्मदात्या मातेमध्येही अडकलेला असतो. माता हा त्याच्या आयुष्यातील पहिला सजीव प्राणी की ज्याच्याशी त्याचा अगदी निकट संबंध येतो. मूल स्वतःवर प्रेम करते तसेच मातेवरही प्रेम करते. कधी कधी माता हा त्याला त्याच्याच व्यक्तिमत्वाचा अविभाज्य भाग वाटू लागतो व अशा वेळी मातेपासून दूरत्व हे त्याला आत्ममृत्यूसारखे वाटते. फ्रॉईडने आपल्या कामगंडाच्या उपपत्तीच्या आधारे अशा प्रकारच्या मातृपुत्र निकट अनुबंधांचे विश्लेषण केले आहे. फ्रॉईड म्हणतो की पुत्राला जे मातेविषयी विलक्षण आकर्षण वाटते त्या आकर्षणामध्ये जननेंद्रियात्मक कामवृत्तीचा बराच भाग असतो. पुत्राला वाटणारे मातृविषयक आकर्षण हे बरेचसे लैंगिक आकर्षण असते व त्या दृष्टीने पिता हा त्याचा लैंगिक प्रतिस्पर्धी असतो. परंतु बालक पुत्रापेक्षा पिता अधिक शक्तिमान असल्याने पुत्र त्याच्या मनातील मातृविषयक कामभावना मनातल्या मनात दडपून

टाकतो व मनाने पित्याशी एकरूप होऊन स्वतःच्या त्या मादनांवर ताबा मिळवितो. या दडपलेल्या भावना व्यक्तिमत्वावर अनेक प्रकारचे परिणाम घडवून आणतात. कधी कधी या दडपण्यातून नसविकृतीही जन्मतात. फ्रॉईडने ही उपपत्ती मांडली पण पुढे त्याला असे आढळून आले की पुत्र प्रमाणेच कन्यादेखिल आपल्या मातेशी जखडलेल्या असतात. तेव्हा या तात्त्विक शृंगापत्तीतून सुटण्यासाठी फ्रॉईडने आपल्या सिद्धांतात बदल केला व तो असे म्हणू लागला की पुत्राचे मातविषयाचे लैंगिक आकर्षण (म्हणजेच इडिपस गंडात्मक स्थिती) हा नंतरची स्थिती आहे. अगदी प्रारंभी पुत्र आणि कन्या या दोघांनाही मातेविषयी सारखेच आकर्षण वाटत असते.

फ्रॉईडच्या प्रमेयातील इडिपस-पूर्व अवस्थेचे मूळ धरून प्रारंभ करून मानवी व्यक्तिमत्वाचा शोध जर आपण घेतला तर फ्रॉईडचाच प्रबंध आपणास पुढे वाढविता येईल. वास्तविक इडिपस-पूर्व मानसिक अवस्था हीच स्त्री व पुरुष या दोघांच्याही मनाची जीवनाच्या प्रारंभाची अवस्था असते. मुलगा वा मुलगी दोघेही मातेकडे सारख्याच प्रेमाने आकर्षित होत असतात. मुलगा म्हणून जास्त आणि मुलगी म्हणून कमी अशा प्रकारचा फरक या प्रेमात असत नाही. बौद्धिक व भावनात्मक वाढ किंवा थोडक्यात व्यक्तिमत्ववाढ ही ती व्यक्ती मूळच्या घट्ट संबंधातून किती प्रमाणात बाहेर पडू शकते यावर सर्वस्वी अवलंबून असते. मातृप्रतिमेपासून जो जितका अधिक अलिप्त बनतो, तितका तो अधिक स्वायत्त व अधिक परिपक्व असतो. जो मातृप्रतिमेशी अधिक घट्ट जखडलेला, तितका तो अधिक अपरिपक्व आणि परतंत्र वयाबरोबर मूल मातेपासून अधिकाधिक स्वतंत्र आणि स्वावलंबी बनत असते. जर ते तसे स्वावलंबी बनत नसेल तर त्याचा अर्थ त्याच्या मानसिक वाढीत कुठे तरी बिघाड येत आहे. मनुष्याच्या मानसिक वाढीचा उघड संबंध त्याच्या मातेबरोबरच्या त्याच्या संबंधात आहे. जन्मापूर्वी आणि जन्मानंतर काही कालावधीपर्यंत प्रत्येक मूल आत्मकेंद्रित व आत्मानुरक्त असते. नंतर ते इतर व्यक्ती व वस्तूंवर प्रेम करू लागते. या इतर व्यक्तीत माता ही पहिली व्यक्ती. मुलाच्या अन्यप्रेमाची सुरुवात मातेवरील त्याच्या प्रेमापासून होते. प्रथम स्वतःवर, मागाहून स्वतःवर व मातेवर अशा दोघांवर आणि त्यानंतर स्वतःवर व मातेवर व इतर वस्तूमात्रावर अशा प्रकारे त्याच्या मानसवृत्तीची प्रगती घडत असते. काही कारणाने मातेच्या पलीकडे जर ही प्रगती जात नसेल तर तो आजार बनतो. या आजारामुळे त्या व्यक्तीची आत्मिक वाढ संपूर्णपणे खुंटते. फ्रॉईड या आकर्षणाला गोत्रगामी आकर्षण ( incestuous striving ) असे म्हणतो. त्याच्या दृष्टीने या आकर्षणातील बराच मोठा भाग जननेंद्रिय

भावनांचा असतो. आपण गोत्रगामी हा शब्द वाच्यार्थाने न घेता लाक्षणिक अर्थाने घेत आहोत. गोत्रगामी हा शब्द लाक्षणिक अर्थाने घेतला तर जे लोक मातेला कायमचे चिकटून असतात ते गोत्रगामी असतात किंवा त्यांच्या भावना गोत्रगामी असतात असे आपल्याला म्हणायचे आहे.

प्रत्येक व्यक्तीला जीवनाच्या प्रारंभीचा काही काळ तरी या प्रकारचे गोत्रगामी बालपण फार निकटचे वाटत असते. मानवी मूल हे इतर प्राण्यांच्या अर्भकांपेक्षा दुबळे व अगतिक असल्याने शारीरिक व मानसिक सुरक्षिततेची त्याची गरजही इतर प्राण्यांपेक्षा अधिक आहे. शारीरिक व मानसिक सुरक्षिततेसाठी मूल त्याच्या मातेवर अवलंबून राहत असल्याने या अवलंबून राहण्याची त्याच्या मनाला एक प्रकारची सवयच लागून राहू शकते. त्याला कुठलीही जबाबदारी स्वीकाराविशी वाटत नाही, सुरक्षितता सोडून बाहेर यावेसे वाटत नाही. स्वतःच्या जबाबदारीवर काही करावेसे वाटत नाही. त्याची आई त्याच्या एवढ्यातेवढ्याचे जे कौतुक करते तेच त्याला सदोदित हवेसे वाटत राहते. कारण कौतुक म्हणजेच भीतीचा, असुरक्षिततेचा अभाव. कौतुक, प्रेम, दिलासा, जिव्हाळा, संरक्षण या गोष्टी देणारी प्रत्येकाच्या आयुष्यातील पहिली व्यक्ती माता. माता नसेल तर आजोबा, आजी, वडील, मावशी किंवा इतर कुणी मातेची भूमिका घेतात. परंतु प्रत्येकाच्या आयुष्यामध्ये या संरक्षक मातृप्रतिमेला अनन्यसाधारण महत्त्व आहे. कारण संरक्षणाची, प्रेमाची व कौतुकाची गरज ही प्रत्येक मानवी अर्भकामध्ये नैसर्गिक-पणेच काम करीत असते.

आपला समज असा आहे की बालकाच्या बाबतीत या प्रकारच्या नैसर्गिक गरजांचे अस्तित्व कबूल करायला आपण तावडतोब तयार असतो. परंतु मोठ्यांच्या बाबतीतही या गरजा असू शकतात हे आपणास पटत नाही. मनुष्य मोठा असला की तो सर्व प्रकारे स्वयंपूर्ण असतो असे आपण गृहीत धरतो. परंतु खरी गोष्ट अशी आहे की लहान बालकाप्रमाणेच प्रौढ मनुष्यालाही मानसिक व बौद्धिक सहानुभूतीची व प्रतिसादात्मक संवादाची गरज असते. त्यालाही सुरक्षितता हवी असते. कारण त्याचेही जीवन पूर्णपणे कधीही निर्धास्त होत नसते. तोही स्पर्धेच्या जगात व इतरांशी झगडत असतो. त्याला कधी जगाबरोबर किंवा परिस्थितीबरोबर दोन हात करावे लागतात. म्हणून त्याला कधी मार बसतो व असुरक्षित, भयग्रस्त वाटू लागते. शिवाय, जीवनात ताण येत असतो. समाजाने त्याच्यावर लादलेली कामे पार पाडायची असतात. परंतु लहान मुलापेक्षा त्याची जाणीवशक्ती अधिक असल्याने जीवनातील धोक्यांची व ताणांची त्याची जाणीवही अधिक असते. सामाजिक बाह्य जगाबाबत आपण स्वतःला समर्थ समजतो पण त्यांच्या बाबतीत आपण दुबळे आहोत

हेही त्याला जाणवते. धोका कधी व कुठून येईल याची अटकळ त्याला करता येत नाही. आजार, व्याधी, वार्धक्य आणि मरण त्याला चुकविता येत नाही. या परिस्थितीत दिलासा, भयमुक्तता, प्रेम, सहानभूती, संरक्षण, निःसंदेहता देणाऱ्या शक्तीची अपेक्षा जर त्याने बाळगली तर त्यात नवल ते काय? प्रौढ मनुष्यामध्येही सुरक्षिततेची ही जी ओढ आहे ती ओढ म्हणजे बालपणी मातेविषयी वाटणाऱ्या ओढीची पुनरुक्ती नव्हे. बालपणी जशी भीतिवाचक परिस्थिती बालकांच्या अवतीभोवती असते तशीच पण वेगळ्या स्वरूपाची भीतिवाचक स्थिती आताही त्या प्रौढाच्या जीवनात धुडगूस घालीत असते. या परिस्थितीने तो भयग्रस्त व चिंतातुर बनलेला असतो. अशा वेळी जर एखादी माता वा तिचाच शक्तिमान पर्याय ती चिंता स्वतःच्या शिरावर घ्यावयास पुढे येईल तर ते प्रत्येक स्त्री-पुरुषास हवेसे वाटणारे असते. म्हणूनच माता वा मातेच्या पर्यायी अदृश्य देवतांचा ध्यास मानवी मन सदोदित घेत असते.

मनुष्याच्या जन्मापासून त्याच्या मनात दोन प्रवृत्ती काम करीत असतात. एक प्रवृत्ती त्याला स्वावलंबनाकडे, स्वायत्ततेकडे नेऊ पाहते, दुसरी परावलंबित्वाकडे, पराधिनतेकडे नेऊ पाहते. मनुष्याला त्याच्या जन्मापासूनच कळत-नकळत जाणवत असत की मातेच्या गर्भातला 'स्वर्ग' आपण गमविला आहे आणि काही केले तरी तो पुन्हा आपणास गवसणार नाही. आपणाला आपल्याच पायावर उभे राहावयास हवे. जगात संकटे आणि अनिश्चितता कायम राहणार आहेत. आपल्याच प्रयत्नावर आपणास विसंबून राहावयास हवे आपल्या मानसिक व बौद्धिक शक्ती वाढविल्या तरच आपला तरणोपाय आहे. हे त्याला एकीकडे जाणवत असते तर दुसरीकडे या सगळ्या त्रासाला कटाळलेले त्याचे मन गर्भातील स्वर्गाच्या स्थितीचीही इच्छा करीत असते. जवळजवळ जन्मापासून या दोन्ही इच्छा मानवी मनात काम करीत असतात. एक इच्छा प्रकाशाकडे जाऊ पाहते. दुसरी काळोखाकडे, विश्रांतीकडे जाऊ पाहाते, एक साहस, कर्तृत्वाकडे जाऊ पाहते दुसरी निश्चिंतता व मानसिक स्वस्थ्याकडे जाऊ पाहते. एक अनिश्चततेबरोबर येणाऱ्या अधिक स्वातंत्र्याकडे जाऊ पाहते, दुसरी पराधीनता व सुरक्षितता आणि निर्धास्तपणा यांच्याकडे जाऊ पाहते.

केवळ जननाचीच पातळी विचारात घेतल्यास संरक्षक आणि निःसंदेहत्वाच्या शक्तीचा पहिला साक्षात्कार प्रत्येक बालकाला त्याच्या मातेपासून होत असतो. माता हे ठामपणाचे व निर्धास्तपणाचे बालकाचे पहिले प्रतिक मागाहून वडील, आजोबा वगैरे येतात. पण आयुष्यातला पहिला धीर माता पुरविते. संरक्षण ती देते. प्रेम व माया ती देते. परंतु प्रतीकनिर्मितीची ही

प्रक्रिया केवळ मातेपाशी थांबत नाही. मूल थोडे वयाने वाढले की ह्या प्रतिकाची व्याप्ती वाढत जाते. मग कुटुंब ते प्रतीक होते. घराणे, वर्ग, वर्ण, धर्म, देश ही तो प्रतीके होतात आपापल्या परीने ही सर्व मानसिक धीर पुरविणारी असतात. जगात आणि राष्ट्र, धर्म आणि राजकीय पक्ष या सर्व एकपरीच्या मनुष्याच्या "आया" त्याच्या सुरक्षिततेच्या व मायेच्या हमीदार असतात. कारण सुरक्षितता व सहानुभूती आणि माया यांची अपेक्षा मनुष्य त्यांच्याकडून करीत राहतो. ज्याचे मन अधिक अप्रगत आहे अशा मनुष्याच्या बाबतीत निसर्ग, सागर, वृक्ष ह्या त्या मातेची प्रतिनिधी असतात. सांगायचा मुद्दा असा की हाडा-मांसाच्या मातेकडून ज्या दिलाशाच्या व धीराच्या अपेक्षा मनुष्य करतो त्याच अपेक्षा बदलत्या पातळीवर, वंश, राष्ट्र, धर्म, पक्ष, निसर्ग, भूमी इत्यादींपासून तो करीत असतो. हाडामांसाची माता हे मातेचे एक रूप व ही इतर रूपे. या प्रकारच्या अमूर्त व तात्विक कल्पनांना माता मानण्यात मनुष्यजातीचा हा फायदा असतो की या माता कधीही मृत होत नाहीत. त्या चिरंतन जगतात. खऱ्या मातेपेक्षा त्या अधिक सबळ व शक्तिमान असतात. त्यांची व्याप्ती फार मोठी असते. इतरांबरोबर त्या वाटून घेता येतात. हाडामांसाची माता ही माझी एकट्याची माता असते. तिच्या हक्कात वाटेकरी घेता येत नाही. तिच्यामुळे मनुष्य पृथगात्म बनतो. धर्म अथवा जन्मभूमी ही एकावेळी सर्वांची माता असू शकते. परमेश्वर हा देखील एकावेळी सर्वांची माता बनू शकतो. मातृपूजाही अशा प्रकारे व्यक्ति-कडून सार्वत्रिकाकडे नेते. व व्यक्तीला समूहाशी एकरूप बनविते. काली पूजेचे निरनिराळे प्रकार, राष्ट्रधर्म, राष्ट्रभक्ती या सर्वांतून या प्रकारच्या भावनेची तीव्रता कळून येते.

या ठिकाणी फ्रॉईडच्या एका मताविषयी स्पष्टीकरण द्यावयास हवे. फ्रॉईडच्या प्रतिपादनाप्रमाणे मातेविषयीच्या पुत्राच्या आकर्षणात लैंगिक भावना प्राथमिक महत्त्वाच्या असतात. दोन वेगवेगळ्या वस्तुस्थितीच्या निरीक्षणातून व त्यांच्या एकत्रीकरणातून फ्रॉईडने आपल्या या मताची उभारणी केलेली आहे. त्यातील पहिले निरीक्षण हे की मुलगे बापापेक्षा आईला अधिक धरून असतात. दुसरे निरीक्षण हे की लैंगिक भावनांचा उद्भव मुलांमध्ये फार बालपणापासूनच होत असतो. या दोन निरीक्षणांचे संयुक्तीकरण करून मुलांच्या मातेविषयीच्या प्रेमात लैंगिक भावनेचा भाग फार असतो अशा प्रकारचा निष्कर्ष फ्रॉईडने काढला. अनेक मुलांच्या मातेविषयीच्या प्रेमात लैंगिकतेचा अंश असतो ही गोष्ट खरी आहे. परंतु ही भावना प्राथमिक नसून दुय्यम आहे. मातेकडून ज्या प्रकारे मुलाला आंजारले-गोंजारले जाते, त्याला हाताळले जाते त्यातून निर्माण झालेली आहे.

ही निसर्गसिद्ध अशी गोष्ट नाही. मुलाच्या मनात मातेविषयी लैंगिक आकर्षण असते म्हणून तो मातेवरोबर एकरूप ( fixation ) झालेला असतो असे नसून, तो मातेशी एकजीव झालेला असल्याने त्याच्या मनात लैंगिक आकर्षण उत्पन्न होते. लैंगिक आकर्षण हा परिणाम आहे, कारण नाही, मुलांप्रमाणेच मुलीसुद्धा मातेशी एकजीव झालेल्या असतात. त्याही मातेत अडकलेल्या असतात. या एकाच घटनेवरून मातृप्रतिमाबद्धतेत लैंगिक घटकाचे कार्य फार कमी असते हे सिद्ध होते.

मातेशी हा जो गोत्रगामी बंध मुलांच्या बाबतीत निर्माण झालेला असतो. त्याचे मूळ नेहमी प्रेमाची व सुरक्षिततेची अपेक्षा यातच असते असे नाही. कधी कधी भीतीपायीही मुले मातेच्या प्रतिमेत अडकून पडलेली असतात. ही भीती पराधीनतेची भीती असते. मूल आईवर इतके अवलंबून राहू लागलेले असते की आई आपल्याला वाढू देईल की नाही याच्याच भीतीने ते तिच्यात अडकून पडते. त्याला आपली सुटका करून घेता येत नाही. काही काही आया इतक्या कमालीच्या आत्मकेंद्रित व स्वार्थी असतात की आपल्या समाधानात बिघाड येईल म्हणून त्या मुलांची मानसिक व भावनिक वाढ होऊच देत नाही. मूल मूल राहण्यात त्यांच्या आत्मगंडाला समाधान असते. कारण कोणीतरी त्यांच्यावर कायमचे अवलंबून असल्याने त्यांच्या अहंगंडाला आपण कोणीतरी आहोत याचे समाधान मिळत असते.

जीवनप्रेम व जीवनविरोध आणि आत्मानुरक्तीच्या बाबतीत जसे आपण सुष्ट आणि दुष्ट असे दोन प्रकार त्या-त्या धारणांचे पाहिले, त्याच प्रकारे गोत्रगामी अनुबंधाचेही सुष्ट आणि दुष्ट प्रकार पाहता येतात. सुष्ट प्रकारात स्त्रीकडून केली जाणारी प्रेमाची, मायेची, कौतुकाची अपेक्षा मोडते. पुरुषाला स्त्रीकडून प्रेम, माया, जिव्हाळा व कौतुक हवे असते. हे मिळते तेव्हा तो उल्लसित होतो. हे मिळत नाही तेव्हा तो नाराज व काहीसा चिंताग्रस्त होतो. हे मातृस्थिरीकरण जेव्हा थोडे अधिक तीव्र असते तेव्हा पुरुष दुबळा असतो. अधिक पराधिन असतो. हाच गंड अधिक तीव्र बनला की भावनिक व लैंगिक समस्या निर्माण होतात.

गोत्रगामी स्थिरीकरणाचा दुसरा जो प्रकार आहे तो अधिक दुष्ट अशा प्रकारचा आहे. त्यात मनुष्याचे भावनिक व वैचारिक स्वातंत्र्य संपूर्णच गेलेले असते. या अर्थाने हा प्रकार नसविकृतीचा व गंभीर गणता येईल. यात स्थिरीकरणाची पातळी अधिकच खोल असते. या मातृस्थिरीकरणाच्या स्तरावर मनुष्यामध्ये वैचारिक व भावनिक अलिप्तणा निर्माणच झालेला नसतो. यातही सौम्य व तीव्र असे भेद आहेत. सौम्य भेदात ज्याच्यावर विसंबून राहता येईल अशी कोणी ना कोणी व्यक्ती त्या इसमाच्या सतत जवळ असावी लागते. अधिक तीव्र प्रकारात आईसारखी कुणी कठोर व उग्र अशी मातृआकृती नेहमी जवळ

असावी लागते. तरच त्यांचे जीवन सुरळीत चालते. नाहीतर ते अगतिक बनतात.

याच प्रकारचे भावनात्मक स्थिरीकरण वडिलांच्याही बाबतीत घडून येऊ शकते. परंतु मातृस्थिरीकरण हे पितृस्थिरीकरणापेक्षा कितीतरी पटींनी अधिक तीव्र असते. त्यामुळे मातृस्थिरीकरणातून जशा मानसिक समस्या निर्माण होतात, विकृतीगंड उत्पन्न होतात तशा समस्या व गंड पितृस्थिरीकरणातून निर्माण होत नाहीत. काही अपवादात्मक केसिसमध्ये पिता मातेची भूमिका करीत असला तरी पित्याची बालकांच्या जीवनातील भूमिका मातेच्या भूमिकेपेक्षा सर्वस्वी वेगळी आहे. जेव्हा मूल अगदी अगतिक व पराधीन असते, तेव्हा माताच त्याला जरूर ते मानसिक व शारीरिक संरक्षण देते. अर्भकाचे जीवन तिच्यावर सर्वस्वी अवलंबून असते. ती जीवनदात्री असते तशी जीवनहर्ती पण असते. कालिमातेच्या ठिकाणी ही दोन्ही रूपे दिसतात. पिता हे परंपरेचे प्रतीक आहे. मनुष्यनिर्मित कायदा व सुव्यवस्था, सामाजिक संकेत व रूढी यांचे प्रतिनिधित्व पिता करीत असतो.

मानसशास्त्रात किंवा विकृतीच्या मानसशास्त्रात ज्याला "गोत्रगामी अन्योन्याश्रयत्व" ( incestuous symbiosis ) म्हणतात, ते सामान्यतः फक्त मातेबरोबरील अनुबंधातच घडू शकते. हा भावनिक गुंता फक्त मातेच्या प्रतिमेच्या बाबतीतच शक्य असतो. आता "अन्योन्याश्रयत्व" म्हणजे काय ? अन्योन्याश्रयत्व म्हणजे दोन व्यक्तिचे वा सजीव जीवांचे एकमेकांवर पूर्ण विसंबून असणे. प्राणी-जगतात काही प्राणी असे आहेत की जे जीवनरक्षणासाठी परस्परांवर पूर्णपणे अवलंबून असतात. या विसंबण्याला अन्योन्याश्रयत्व असे म्हणतात. अन्योन्याश्रयत्वाच्या अनेक पातळ्या आहेत. परंतु त्या सर्वांत एक गोष्ट अतिशय समान आहे. ती ही की, अन्योन्याश्रयाने जखडलेला जीव हा तो ज्याच्याशी जखडलेला असतो, त्याच्यापासून काही केले तरी विलग होऊ शकत नाही. हे अन्योन्याश्रयात्मक संबंध जर धोक्यात आले तर तो कमालीचा भयग्रस्त व चिंतातूर बनतो. मात्र दुसऱ्या जीवापासून दूर राहू शकत नाही याचा अर्थ शरिराने पहिल्या जीवाच्या सतत सान्निध्यात असावे लागते असा करायचा नाही. तो शारीरिक दृष्टया जवळ असेल अथवा नसेल; परंतु दुसऱ्या जीवाच्या व्यक्तिमत्वात तो इतका गुंतलेला असतो की त्याला स्वतंत्र अस्तित्व राहिलेले नसते. अन्योन्याश्रयाची घटना जिवंत व्यक्तीच्या बाबतीत घडू शकते, तशीच मृताच्या बाबतीतही घडू शकते. मृतपूजा हा एक अशाच जातीचा प्रकार आहे. अन्योन्याश्रयी बंध हा मानसिक व भावनिक बंध असतो. अशा गुंत्यात सापडलेल्या व्यक्तीला, ती स्वतः आणि ज्याच्याशी ती जखडलेली आहे ती व्यक्ती या दोहोतील अंतर फारसा चांगल्या प्रकारे जाणवत नाही. इतकी ती दुसरीशी एकजीव झालेली असते. या दोन्ही व्यक्ती मानसिक



अनुक्रमणिका

दृष्टया अविभाज्य असतात. या एकजीव संबंधाला जर उपमा द्यायची झाली तर ती माता आणि तिच्या पोटातील गर्भ यांच्यातील संबंधाची देता येईल. गर्भ आणि माता ही दोघेजणे विलग खरी परंतु ती एकही असतात. अन्योन्याश्रयत्वाची पातळी मागे मागे जाणारी आहे. जितकी ती अधिक मागे, तितकी ती अधिक तीव्र आणि तितके मानसिक अगतिकत्व अधिक. मनाने मागे जावे, मातेपासून वेगळे नसतानाच्या काळातील निर्धास्तपणा परत अनुभवावा ही ओढ कधी कधी इतक्या तीव्रतेला पोचते की परत मातेच्या गर्भात प्रवेश करावा अशीही ओढ तीमधून निर्माण होत असते. प्रतिकात्मक पातळीवर हीच ओढ आपण समुद्रात बुडत आहोत, पृथ्वीच्या पोटात गडप होत आहोत अशा स्वप्नांच्या स्वरुपात व्यक्त होत असते परागामी (Regressive) अन्योन्यश्रयत्वाची ही ओढ म्हणजे वस्तुतः स्वतःच्या वैशिष्टयतेची भीती होय काही लोकाना वेगळे होण्याचे, वेगळे दिसण्याचे भय निर्माण होते. त्यांना आपण अनामिकाच्या सागरात बुडून जावेसे वाटते. तसे बुडून जाणे हा त्यांच्या दृष्टीतील निर्धास्तपणा असतो. या सर्व निरीक्षणावरून जो एकमेव निष्कर्ष निघतो तो असा की, गर्भात मागे जाण्याची किंवा प्रत्यगामीत्वाची ओढ ही जीवनाच्या प्रतिकाराची, जीवनाच्या विरोधाची ओढ आहे. गर्भात असणे म्हणजे प्रतिकात्मक अर्थाने जीवनापासून दूर राहणे.

वरील सर्व विवेचनाचा मतितार्थ असा की मातृप्रतिमेबरोबरचा बंध–तिच्या प्रेमाची इच्छा आणि तिच्या विध्वंसकपणाची भीती– हा फ्रॉईडच्या इडिपस–बंधापेक्षा अधिक तीव्र आहे. तेव्हा मानवी जीवनाच्या एकूण प्रकृतीच्या संबंधात इडिपस–गंडापेक्षाही मातृप्रतिमापाशगंड ( fixation ) ही स्थिती आयुष्यावरील परिणामाच्या दृष्टीने अधिक महत्त्वपूर्ण आहे. असो. या ठिकाणी 'प्रेमाची इच्छा विध्वंसनाची भीती' या दोन कल्पनाविषयी स्पष्टीकरणाचे चार शब्द सांगणे आवश्यक आहे. या ठिकाणी मातेच्या बाबतीतील ज्या एकजीव पाशाच्या गोष्टी आपण करत आहोत त्या पाशाची पुरेपूर कल्पना 'प्रेमाची इच्छा' 'मातेवरचे अवलंबून राहणे' 'कामुक स्थिरीकरण' इत्यादी शब्दातून येण्यासारखी नाही. या विशिष्ट अनुभवाच्या सामर्थ्याच्या तुलनेत हे सर्व शब्द केवळ निरुपद्रवी, अर्थशून्य आहेत. जी गोष्ट प्रेम, पराधिनता या शब्दांची तीच गोष्ट 'मातेची भीती' याही शब्दाची आहे. एखाद्या मनुष्याची भीती वाटणे म्हणजे काय याची कल्पना आपण करू शकतो. तो इसम आपणाला काही बोलेल, आपला अपमान करील, कदाचित शिक्षा लावील ही ती भीती असते. अशा प्रकारच्या अनेक अनुभवातून आपण गेलेलो आहोत आणि या अनुभवाना तोंड कसे द्यावे यांची पुरेपूर कल्पना अनुभवातूनच आपणास आलेली असते. तेव्हा त्या दृष्टीने या भीतीचा पगडा



अनुक्रमणिका

वाटतो तितका खरा नाही. आता अशी कल्पना करा की सिंहाच्या पिंजऱ्यात किंवा सापाच्या कोटरीत तुम्हाला ढकलेले आहे आणि स्वतःचे संरक्षण करण्याचे कुठलेही साधन तुमच्यापाशी नाही. अशावेळी तुमच्या मनाची जी स्थिती होईल ती जीवाच्या आकांताची भीती, ही भीती या ठिकाणी सूचित आहे. ही भीती शब्दात मांडता येणार नाही. पण म्हणून ती भीती खोटी भीती मात्र नाही. मातेची 'भीती' ही या जातीची भीती आहे. गोत्रगामी पाशाची भीती ही ते पाश मनाच्या कुठल्या थरापर्यंत पोचले आहेत यावर अवलंबून असते. पाश जितका अधिक खोल तितकी भीती आकांताची. पाश वरवरचा असल्यास विकृतीचे प्रमाण फारसे सखोल नसते. स्त्रियांची भीती व त्यांच्यावरील मानसिक अवलंबून राहणे याव्यतिरिक्त या विकृतींची मजल जात नाही. परंतु परागतीची पातळी जितकी अधिक तितकी अवलंबून राहण्याची वृत्ती व भीती अधिक. ही परागती जेव्हा मनाच्या अगदी खोल व पूर्वप्राचीन थराला भिडते तेव्हा भीती आणि अवलंबित्व पराकोटीला पोचतात. शुद्धीपूर्ण जगणे अशक्य बनते. मनुष्य वेडाकडे झुकू लागतो. आत्म-प्रीतीच्या व्याधीत जशी मनुष्याची चिकित्सक बुद्धी व विचार आणि निर्णयशक्ती कमजोर होतात तशीच ती याही ठिकाणी होतात. माझी नाळ मी कापून टाकणार नसलो, कुठल्याही प्रकारचा धोका मी पत्करणार नसलो, आयुष्यभर निश्चितता व सुरक्षितता याच देवतेला मी भजणार असलो तर ती देवता पवित्र बनते. पण माझी वाढ खुंटते. कारण आता चिकित्सक टीका शक्य नसते. 'माता' जर कधीही चुकू शकत नाही तर माता आणि इतर यांच्या संघर्षात मी मातेच्या विरुद्ध बाजू कशी घेऊ शकेन ? माता ही जेव्हा फक्त हाडामांसाची माता असते तेव्हा या प्रकारच्या गुलामी वृत्तीचे फारसे दाईट परिणाम घडून येत नाहीत. परंतु ही माता म्हणजे जेव्हा धर्म, राष्ट्र, कुटुंब किंवा जमात ही अदृश्य व अमूर्त तत्त्वे असतात तेव्हा निर्णयशक्तीतील ह्या कमकुवतपणाचे फार भयानक परिणाम उत्पन्न होऊ शकतात. ह्या पाशांच्या बाबतीतील आपली धारणा जिव्हाळ्याची असल्याने, ते पाश आमचे आम्हीच पत्करल्याने व त्यांच्या बाबतीत मनाचा भाव अलिप्त न करता आल्याने आपण त्यांच्या पूर्ण आहारी असतो व त्यांच्या नादाने कुठलेही भयानक कृत्य करावयास प्रवृत्त होऊ शकतो. या प्रकारच्या स्थिरीकरणात अनेक लोक एकाच वेळी सामील असल्याने त्यांच्या खरेपणाची शंकाच मनात उद्भवू शकत नाही.

मानसिक व भावनिक बद्धतेमुळे विचारशक्तीला कमकुवतपणा येतो हा या प्रतिमाबद्धतांचा पहिला तोटा. परंतु प्रतिमाबद्धतेचा यापेक्षाही मोठा तोटा व धोका संभवतो. बद्धतेमुळे मनुष्याची विचारशक्ती विकृत बनते तशीच त्याची मानवताही



अनुक्रमणिका

कमकुवत बनते. इतर मनुष्यप्राण्यांविषयी तो उदासीन बनतो. जे त्याचे जातभाई, धर्मबांधव, राष्ट्रबांधव तेच तेवढे त्याच्या दृष्टीने मनुष्ये असतात. इतर परके अतएव " काफीर. " या विशिष्ट दृष्टिकोनाचा अर्थ असा की माझी भावनात्मक वाढ त्यामुळे खुंटली जाते. भावनात्मक वाढ मनुष्याच्या प्रेम करण्याच्या शक्तीवर अवलंबून असते. जिथे ही प्रेम करण्याचीच शक्ती खच्ची झाली. तिथे भावनात्मक वाढ कोठून असणार ? आणि जिथे भावनात्मक वाढ नाही तिथे माझ्या मानवतेची परिपूर्ती कशी होणार ?

गोत्रगामी स्थिरीकरणाचा तिसरा अपपरिणाम हा की ज्याच्या बाबतीत हे स्थिरीकरण घडते त्याला मानसिक व भावनात्मक स्वातंत्र्य आणि व्यक्तित्वाचे सुसूत्रीकरण साध्य करून घेता येत नाही. तो नेहमी मनाच्या अप्रगल्भ पातळीवरच राहतो. मातेला वा आपल्या जमातीला बद्ध राहिलेला पुरुष पूर्णवाढीसाठी केव्हाही मोकळा नसतो. त्याला स्वत.ची मते निर्माण करता येत नाहीत. त्याला स्वतःचे स्वतंत्र व्यक्तित्वही कमाविता येत नाही. जगाबरोबर मोकळेपणी वागावयास तो स्वतंत्र नसतो. मोकळेपणाने जगाचा स्वीकारही त्याला करता येत नाही. तो सदोदित मातृ-वंशीय-राष्ट्रीय-धार्मिक स्थिरीकरणाच्या तुरुंगात जगत असतो. सर्व प्रकारच्या आंतरिक बंधांपासून आणि गोत्रगामी स्थिरीकरणापासून मुक्त झाल्यावाचून कुणालाही स्वतःची पूर्ण वाढ करून घेता येत नाही हे एक मानसशास्त्रीय सत्य आहे.

गोत्रगामी स्थिरीकरण हे व्यक्तिमत्वाच्या वाढीवरील बंधन आहे याची जाण फार थोड्यांना असते. बरेचजण ते बंधनच नाही असे भासवायचा प्रयत्न करतात. हा बंध व्यक्तिक मातेच्या बाबतीत असले तर मातृसेवा हा धर्म आहे, माझ्याशिवाय तिला पाहणारे कोणी नाही, माझ्या खूप खस्ता तिने काढल्या आहेत, असे नाना-प्रकारचे युक्तिवाद करून सत्य स्वतःपासून लपविण्याचा प्रयत्न केला जातो. स्थिरी-करण राष्ट्र वा धर्म अशा वस्तूंच्या बाबतीत असेल तरीही अशाच प्रकारचा वंचक युक्तिवाद केला जातो.

सारांश, मातृभावी व्यक्ती किंवा अशा व्यक्तीचे समान पर्याय (रक्त, जमात, धर्म, राष्ट्र इत्यादि) यांच्याशी बद्ध राहण्याची प्रवृत्ती प्रत्येक मानवी मनात उपजतच असते. ही प्रवृत्ती प्रगतीच्या, पुढे जाण्याच्या, प्रगल्भता मिळविण्याच्या प्रवृत्तीला सतत विरोध करीत असते. सर्वसाधारण मनुष्याच्याबाबतीत प्रगतीची आणि वाढीची प्रवृत्ती विजयी होते. काही लोकांच्या बाबतीत जखडलेले राहण्याची प्रवृत्ती विजयी होते. मग विकृतींना सुरुवात होते. फ्रॉईड म्हणतो तशा गोत्रगामी प्रवृत्ती मानवी मनात असतात. परंतु फ्रॉईड म्हणतो तशा त्या लैंगिक प्रकारच्या नसतात. आपल्या जन्मस्थानाला घट्ट धरून राहावे असे ही प्रवृत्ती सांगते. त्यात पुढे जाण्याची,

प्रगती दाखविण्याची, विकास करून घेण्याची, स्वतंत्र बनण्याची भीती असते.

मृत्यूआसक्ती, आत्मानुरक्ती आणि गोत्रगामी स्थिरीकरण अशा तीन प्रवृत्ती वर आपण पाहिल्या. या प्रवृत्तींची तीव्रता फारशी नसते, तेव्हा या प्रवृत्ती फारशा त्रासदायक नसतात व तशा एकमेकींपासून त्या विलगही असतात. परंतु जेव्हा त्या तीव्र बनतात तेव्हा त्या एकत्रित येऊन त्यातून एकच एक अशी मृत्यूप्रेरणा आणि विध्वंसनप्रेरणा तयार होते. हिटलरमध्ये या तिन्ही प्रेरणांचे एकत्रीकरण आढळते. त्याला जीवनाचा द्वेष होता. तो कमालीचा आत्मानुरक्त होता आणि त्याचे मातृप्रतिमा स्थिरीकरणसुद्धा घडलेले होते. जेव्हा या तिन्ही प्रवृत्ती एकत्रित येतात तेव्हा त्यातून मृत्यू आणि विध्वंसनाची ओढ निर्माण होते. हिटलरमध्ये हा गंड पाहावयास सापडतो. त्याला नाशासाठी नाश आवडत होता. मृत्यू आणि मृत्युविषयक सर्व काही यांच्याकडे तो उपजतच आकर्षिला जात होता. तो कमालीचा आत्मानुरक्त होता व त्याच्या दृष्टीने जगातील सर्वोत्तम महत्त्वाची वस्तू म्हणजे तो व त्याच्या इच्छा या होत्या. तो आत्यंतिक गोत्रगामीही होता. हिटलर माथेफिरू वंशवादी होता याविषयी कुणालाही शंका असण्याची शक्यता नाही. जर्मन रक्त शुद्ध राखण्याचे कार्य आपल्या डोक्यावर येऊन पडले आहे असे तो समजत असे. आत्मानुरक्ती, मृत्यू व गोत्रगामीपणा या तीन घटकांमुळे हिटलरसारखा मनुष्य अखिल मानवजातीचा व जीवनाचा एक अत्यंत वाईट शत्रू बनविला गेला होता.

हिटलर हे विध्वंसन-गंडाचे एक अभूतपूर्व उदाहरण. परंतु विध्वंसन, हिंसा, अत्याचार, द्वेष, जातीयवाद आणि आत्मानुरक्त राष्ट्रवाद या रोगांनी जे आजारी आहेत असे अगणित लोक या घटकेला जगात वावरत आहेत. हिंसा, युद्ध आणि विध्वंसनाचे हे खरे पुढारी किंवा खरे श्रद्धाधारक होत. त्यांच्यापैकी ज्यांचा आजार अगदीच पराकोटीला पोचला आहे, असेच लोक आपल्या उक्तीतून वा कृतीतून स्वतःचे खरे हृदय प्रकट करीत असतात. बाकीचे सारे हे छुपे मानवताद्वेषी आहेत. त्यांचे खरे हेतू फार क्वचित उघड होतात. कारण आपल्या खऱ्या हेतूंचा मागमूसही जगाला लागू न देण्याइतके ते चतुर आहेत. कित्येकांना तर आपल्या खऱ्या मनाची कधी ओळखही होत नाही. परंतु देशांतर्गत अराजक किंवा असंतोष यांच्यामुळे नेहमीचे नागरी जीवन विस्कळीत होते तेव्हा त्यांचे खरे स्वरूप तात्काळ प्रकट होते. किंबहुना अशाच हिंसाचाराच्या प्रसंगात ते स्वतःसारखे खरोखर बनतात. किंवा खरोखर आपलेपणात येतात. बहुधा विध्वंसन-गंडाने पछाडलेल्या लोकांची मानवजातीतील संख्या फार कमी असावी. परंतु हे किंवा यांच्यासारख्या धारणेचे जे लोक असतात त्यांना आपल्या खऱ्या वृत्तीची जाण

नसते व त्यामुळेच ते विषारी रोग वाहून नेणाऱ्या संसर्गजन्य विषाणूंप्रमाणेच भयानक ठरतात. कारण दंगली, युद्धे, संघर्ष अशा काळात जमावाचे ते स्फूर्तिदायक नेते बनतात. जमाव त्यांच्याकडून हिंसक कृत्यांची स्फूर्ती घेतो. त्यामुळे असे लोक हे खरोखर काय प्रकारचे लोक आहेत याची नोंद घेणे हे सर्व शहाण्या लोकांचे काम आहे. विध्वंसक प्रवृत्तीचे हे लोक मृत्यूवर प्रेम करतात. त्यांना स्वतंत्र व्यक्तित्वाची भीती वाटते आणि ते व त्यांचे भाईबंद लोक यांच्याच तेवढ्या गरजा त्यांना खऱ्या वाटतात. त्यांच्या हिशेबी इतर माणसे ही न-माणसे असतात. जगा आणि जगू द्या हे तत्त्वज्ञान त्यांना कधीच पटत नाही. तेव्हा अशा लोकांना आपण ओळखले पाहिजे. हेच त्यांच्यापासूनचे आपले एकमेव संरक्षण आहे. त्यांच्या शब्दांनी आपण भारावून जाता नये. त्यांचे शब्द म्हणजे वास्तव नव्हे. ती बऱ्याचदा भयानक फसवणूकच असते. ही माणसे मनाने आजारी असतात. या आजाऱ्यांच्या शब्दावर विश्वास ठेवण्यापूर्वी आपण दहा वेळा विचार केला पाहिजे.

* * *

हिटलरसारख्या विध्वंसक प्रवृत्तीच्या मनुष्याचे मानसशास्त्र काय असते याचा आढावा वर आपण घेतला. इतक्या विस्ताराने आणि इतक्या चिकाटीने हा आढावा घेण्याचे कारण हे की, आपल्याही समाजात अनेक हिटलरभक्त आणि हिटलरही (छोटे-मोठे, खरे-खोटे, गोरे-काळे, जाडे-रोडे) वावरत आहेत. त्यांना ओळखणे आणि त्यांच्यापासून स्वतःला व इतरांना दूर ठेवणे ही आजच्या घटकेची फार मोठी राष्ट्रसेवा आणि जीवनसेवाही आहे.

पुढे हिटलरच्या आयुष्यातील निरनिराळे प्रसंग घेऊन हिटलरच्या स्वभावाच्या छटा दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे. अर्थात ते हिटलरचे सलग चरित्र नाही. हिटलर या माणसाचे व्यक्तिमत्व तुकडे तुकडे झालेले असेच होते. त्यात एकसूत्रीकरण कधीही आले नाही. म्हणून जसे त्याचे व्यक्तित्व होते तसेच ते येथे दिग्दर्शित करायचा प्रयत्न केलेला आहे. वाचताना ते पूर्ण वाटणार नाही. पण पूर्ण वाटू नये हीच इच्छा आहे. कारण हिटलर हा तसा पूर्ण कधीच नव्हता त्याची मानसिक व भावनिक पूर्णवाढ कधीच झाली नाही. त्याच्या स्वभावाची काही अंगे वाढली, पण इतर बरीच, की ज्यांच्यामुळे मनुष्याला मनुष्यत्व प्राप्त होते, तो अपूर्णच राहिली, असो.

* * *



अनुक्रमणिका

## हिटलर : एक मानसशास्त्रीय अभ्यास

१९३३ च्या मार्च महिन्यात हिटलर सत्तेवर आला. सत्तारुढ होण्याचा समारंभ मोठ्या विलक्षण प्रकारे साजरा केला गेला होता. हा समारंभ पोस्टडॅम येथील गॅरिकरच चर्चमध्ये घडवून आणला गेला. या चर्चमध्ये फ्रेडरिख द ग्रेटची समाधी आहे. समारंभाला हिटलर आपल्या एकूण एक दुय्यम मंत्र्यांसह हजर होता समारंभ पूर्णपणे धार्मिक होता. सत्तारोहणाचा विधी पार पडल्यानंतर हिटलरने फ्रेडरिखच्या समाधीला पुष्पचक्र वाहिले होते. हिटलर स्वतःला फ्रेडरिखचा वारस म्हणवून घेई. मनाने तो त्याच्याशी एकजीव होता.

ब्राऊन हाऊस नावाच्या इमारतीत हिटलर काम करीत असे. त्याच्या कमऱ्यात फ्रेडरिखची चार मोठी चित्रे होती. फ्रेडरिखच्या प्रेतमुखवट्याची एक प्रतिकृतीही तिथे होती. बरखटस्गाडेन येथील त्याच्या पर्वतराजीमधील बंगल्यामध्येही फ्रेडरिखचे अर्धपुतळे आणि तैलचित्रे असत. चॅन्सेलरीच्या बॉबहल्लाप्रतिबंधक आसरागृहात, जिथे हिटलरला मृत्यू आला, त्या हिटलरच्या कार्यालयातही फ्रेडरिखचे एक भव्य तैलचित्र होते. दुसरी अन्य कोठलीही वस्तू त्या खोलीत नसे. ( आपल्या खाजगी नोकराला हिटलरने बजावून ठेवले होते की, " माझ्या मृत्यूनंतर माझ्या व्यक्तिगत वापराच्या सर्वच्या सर्व वस्तू जाळून टाक. परंतु माझ्या डोक्यावर लटकत आहे ती फ्रेडरिखची चौकट मात्र काही झाले तरी जाळू नकोस. माझे शब्द विसरू नकोस. ")

* * * * *

ॲडॉल्फ हिटलर हा एका ऑस्ट्रीयन जकातअधिकाऱ्याचा पोरगा. आईविषयी त्याला तीव्र प्रेम असे. बापाविषयी तेवढाच द्वेष. त्याचे त्याच्या बापाशी कधीही पटले नाही. हिटलरचा बाप सरकारी सनदी नोकर होता. आपल्या मुलानेदेखिल सरकारी नोकरीच्या क्षेत्रातच उतरावे ही बापाची इच्छा. मुलाची इच्छा सरकारी नोकरी करायची नाही. कुठल्याही प्रकारच्या कंटाळवाण्या कामाची त्याला तीव्र नावड होती. बाराव्या वर्षी त्याने त्याच्या वडिलांना सांगितले की आयुष्यात. आपणाला चित्रकार व्हायचे आहे. वडिलाना मुलाची इच्छा पूर्णपणे नापसंत. वडिल मुलाला बजावितातही की आपल्या निर्णयात कुठल्याही कारणास्तव आपण

बदल करणार नाही. मुलगाही बापाइतकाच हट्टी. तोही बापाला सांगतो की त्यांनी जर त्याच्या बाबतीत आपलाच हेका चालविला तर तोही शिक्षणाला रामराम ठोकील. बापलेकातील या संघर्षाची हकीकत मेन काम्फ नावाच्या हिटलरच्या आत्मचरित्रात आलेली आहे. हिटलर लिहितो, ' पित्याच्या अधिकाराचे उल्लंघन वडिलांनी केल्यामुळे ( वडिलानी या प्रसंगी हिटलरला बडदन काढले असण्याचीही शक्यता आहे. ) यापुढील आपल्या कुठल्याही बेताचा सुगावा वडिलांना लागू न देण्याचा निश्चय आपण केला. परंतु काहीही झाले तरी पुढील आयुष्याविषयीचा आपला बेतही पुरा करण्याचे मी ठरविले." पितापुत्रांच्या भांडणात पुत्राने अभ्यासाकडे दुर्लक्ष केले. जागतिक इतिहास व भूगोल यासारखे मुळातच त्याला आवडणारे जे विषय होते किंवा चित्रकाराच्या व्यवसायासाठी जे त्याला उपयुक्त वाटत होते, त्यात तो चांगल्या प्रकारे उत्तीर्ण झाला आणि इतर विषयात त्याने आपटी खाल्ली. **हिटलरच्या स्वभावामध्ये कलाप्रेम आणि लढवय्येपणा हे दोन्ही गुण पहिल्यापासूनच समसमान होते.** मेन काम्फमध्ये, आपल्या वडिलांच्या ग्रंथसंग्रहातील १८७०-७१ सालच्या फ्रेंच-जर्मन युद्धावरचा ग्रंथ आपणास कसा गवसला, आपण मोठ्या चवीने त्याचे वाचन कसे केले, लष्करी पेशा व युद्ध याविषयी आपल्या मनात आवड कशी उत्पन्न झाली याचे तपशीलवार वर्णन त्याने केलेले आहे. हिटलरच्या इतिहासप्रेमाविषयीची आणखी एक हकिकत प्रा. रॉबर्टस यांनीही दिली आहे. ती हकिकत हिटलरच्या एका मित्राकडून त्यांना मिळाली. हा मित्र त्यांना म्हणाला की, " हिटलर रात्ररात्र जागरणे करीत वाचन करीत असे. त्याचे वडील अनेकदा त्याला या सवयीविरुद्ध ओरडत असत." हिटलरच्या इतिहासध्यासाची आणखी एक हकिकत सांगता येण्यासारखी आहे. शाळेत असताना हिटलर एकदा नकाशाच्या एका पुस्तकावर एकाग्र नजर लावून बसला होता. त्याची ती तंद्री पाहून कुणी तरी त्याला म्हणाले की, एवढे त्या नकाशात तू काय पाहतो आहेस ? या प्रश्नाला हिटलरने जे उत्तर दिले ते विचार करण्यासारखे आहे. हिटलर त्या मित्राला बोलला की " जर्मन राष्ट्राच्या जुन्या सीमा पुसून त्या मी पुढे नेत आहे." हिटलर हे शब्द इतक्या काही ताठ्यात बोलला की ते शब्द ऐकून त्याला हसू पाहणारे त्याचे मित्र जिथल्या तिथे गप्प झाले.

* * * * *

हिटलरला चौदावे वर्ष सुरू झाले आणि त्याचे वडील वारले. त्यातच







त्याला फुप्फुसांचा रोग झाल्याचे आढळून आले. म्हणून त्यातल्यात्यात कमी श्रमांचा व्यवसाय म्हणून त्याच्या आईने चित्रकाराचा व्यवसाय स्वीकारायची परवानगी त्याला दिली. आई जिवंत असतानाच ( म्हणजे १९०५ साली ) त्याने म्यूनिच येथील एका कलाशाळेत काही दिवस शिक्षण घेतले. ऑक्टोबर १९०७ मध्ये तो व्हिएन्नाला गेला. तेथील कलामहाविद्यालयात प्रवेश मिळविण्यासाठी लागोपाठ दोन वर्षे ( ऑक्टोबर १९०७ व ऑक्टोबर १९०८ ) त्याने प्रयत्न केला, पण ते काही जमले नाही. आत्मचरित्रात मात्र आपणास एकदाच नकार मिळाला असे तो सांगतो व पुढे लिहितो की, तेथील कलासंचालकांनी त्याला सांगितले की "त्याच्या मनाचा कल वास्तुशास्त्राकडे अधिक आहे."

हिटलरलासुद्धा हे मत पटलेले असावे. कारण रेखाटन व चित्रकला यांच्या-पेक्षाही वास्तुकलाच आपणास अधिक आवडते असे तोही म्हणतो. त्याला वास्तुशास्त्राच्या वर्गाला जायचे होते. परंतु एव्हाना त्याही वर्गांना प्रवेश बंद झाला होता. हिटलर म्हणतो की या वर्गांना प्रवेश मिळविण्यासाठी ज्या दोन पूर्वपरीक्षा पास होणे आवश्यक असते त्या त्याने दिलेल्या नव्हत्या. हिटलरच्या ह्या कैफीयतीत एक महत्त्वाचा तपशील गाळलेला आहे. तो असा की पूर्वपरीक्षेची अट असली तरी 'असामान्य बुद्धीमत्तेच्या विद्यार्थ्यांच्या बाबतीत ही अट बाजूला सारली जाऊ शकत असे.'

१९०८ त हिटलरची आई वारली. त्याचे वय त्या वेळी जवळ जवळ वीस वर्षांचे होते. आईच्या मृत्युनंतर पुन्हा एकदा तो व्हिएन्नाला आला. तेथेच त्याने पुढील पाच वर्षे घालविली. ही त्याची वर्षे फार हलाखीत गेली. अनेक सटर-फटर व्यवसाय त्या वेळी त्याला करावे लागले. कधी तो भींतीवर जाहिराती रंगविण्याचे काम करी. कधी रंगीत कार्डे विको. तर कधी घरे रंगविण्याचे काम करी. कधी कधी तर तो चक्क मोलमजुरी देखिल करी. या काळात त्याचे जेवणखाण्याचे फारच हाल झाले.

ही सर्व वर्षे तो अगदी कंगाल वस्तीत राहत असे. परंतु याचा अर्थ तो त्यांच्यापैकी एक बनला होता असे नाही. मनाने हिटलर गरिबांशी वा श्रीमंतांशी कुणाशीच एकरूप झाला नाही. त्या काळात तो फारसा कुणात मिसळतही नसे. एवढेच नव्हे तर जरी तो वयाने तरुण होता तरी त्याच्या सामाजिक वर्तुळातील तरुण मुलींशीही घसट वाढविण्याचा प्रयत्न त्याने कधी केलेला नव्हता.

• • • • •



अनुक्रमणिका

हिटलरच्या कलाकृतींमध्ये कलादृष्टया काहीच वैशिष्टचपूर्ण नाही. परतु हिटलरला कोणे एके काळी कलावंत व्हायचे होते ही वस्तुस्थिती बोलकी व महत्त्वाची उरतेच ! मोठेपणी व जर्मनीचा सर्वसत्ताधिश झाल्यानंतर जगाची जी पुनर्रचना तो करू पाहत होता ती एक कलावंत म्हणून तो करु पाहत होता. हिटलरचा एक निकटचा स्नेही लिहितो की, 'हिटलरच्या मताप्रमाणे कला ही मानवी जीवनातील एक सर्वोत्तम महत्वाची गोष्ट होती' आणि हिटलर वास्तुशिल्प-शास्त्रात फार रस घेत असे. हिटलरचा कलाविषयातील रस शेवटपर्यंत कायम होता व आपण कलावंत आहोत हे दाखवावयास त्याला फार आवडे. हर्मन राउशनिगने १९३४ मध्ये हिटलरची मुलाखत घेतली होती. त्यात ते लिहितात की, "हिटलर हा एक हुकूमशहा असून तो स्वतःच्या योजना इतरांवर लादीत आहे ही कल्पना जेव्हा हिटलरसमोर मांडली तेव्हा ती कल्पना खोडून काढण्याचा प्रयत्न हिटलरने केला. तो म्हणाला की तो हुकूमशहा नसून शिल्पकार आहे. मात्र सामान्य शिल्पकार नसून जुन्या काळच्या कॅथड्रिल वास्तुशास्त्रज्ञांच्या जातीचा शिल्पकार होता. हे शिल्पकार पिढयानपिढया एकाच वास्तूवर काम करीत. ते असे म्हणत की त्यानी हातात घेतलेल्या वास्तूच्याच गर्भात एक भव्य योजना दडलेली असते व तीच बाहेर काढणे हे खऱ्या वास्तुततज्ज्ञाचे कर्तव्य असते. म्हणून वास्तुतज्ज्ञाने आपली योजना राबवायची नसते तर, जे आत आहे ते बाहेर आणावयास मदत करायची असते. हिटलर तेच करीत होता. असा हिटलरचा दावा आहे."

मीसुद्धा कॅथड्रिल शिल्पज्ञांसारखा शिल्पज्ञ आहे. त्यांच्यागतच नव्या जर्मनीची उभारणी मी चालविली आहे. नव्या आत्मकेंद्रित कलावंतांसारखा कलावंत मी नव्हे. कारण माझ्या दृष्टीने हे सगळे नवकलाकार असर्जनशील आहेत. मी त्यांच्यात बसत नाही. मध्ययुगातील श्रद्धावान कॅथड्रिल शिल्पकारांशी माझे साम्य अधिक आहे.

१९३८ साली फ्लॉरेन्स येथे हिटलर मुसोलिनीला भेटला. तेव्हा अंतर्यामी आपण कसे कलावंत आहोत हे त्याने त्याच्या मनावर ठिवविण्याचा प्रयत्न केला. तासचे तास तो त्या शहरातील कलावस्तूंच्या सौंदर्याचे आकंठ पान करीत घालवी. बॉट्टीसेली, टिशिअन, लिओनार्दो ह्या चित्रकारांच्या कलेविषयी मुसोलिनी व इतरांबरोबर तासान तास बोलत राही. एकदा तर तो असेही म्हणाला कीं,

"मला जर माझ्या मनासारखे वागता आले तर वेष पालटून ह्या फ्लॉरेन्स शहरातून मी अहोरात्र दहा दिवस भटकेन....मी खोटी दाढी लावीन' माझ्या केसांचे वळण बदलीन, फाटका पोषाख चढवीन आणि ह्या शहरातील वस्तु-

संग्रहालयातून मनसोक्त फिरेन. त्यातील महान कलावंतांच्या कलेचा आदर करीत वेळ घालवीन."

"हिटलरच्या काळातील कुठलीही महत्त्वाची इमारत हिटलरच्या संमती-विना कधी बांधली गेली नाही. त्याच्या वास्तुशिल्पज्ञाच्या तज्ज्ञ दृष्टीखालून त्या इमारतीचीं संकल्पनचित्रे गेल्यावाचून तिला परवाना मिळत नसे. त्याच्या मेजावर नेहमी विविध रंगांच्या व टोक करून तयार अशपेन्सिली ठेविलेल्या असत. बर्लिन शहराचा शहर-नकाशा म्युनिचची स्मारकगृहे, संगीतगृहे, नाटचगृहे, नाझी पक्षाची सभागृहे, उद्याने, सैनिक-संचलनाची मैदाने इत्यादींची विविध रंगांच्या पेन्सिलींनी सतत आखणी करणे हे त्याचे मोठचा आवडीचे काम असे."

राईख-चॅन्सलरीची इमारत १९३८-३९ साली बांधण्यात आली. तिची संकल्पनचित्रे तयार करण्यात हिटलरने सर्वात अधिक भाग घेतला होता. "त्या इमारतीचे जे आराखडे उपलब्ध आहेत त्यातील कितीकांवर हिटलरच्या हस्ता-क्षरातील सामासिक सूचना आढळतात तसेच त्या इमारतीच्या आराखड्यावर त्याने अनेक खुणाही केलेल्या आढळतात. प्रचंड, भव्य, उंच, वास्तू उभारण्याचे हिटलरला वेड होते. हिटलरला चित्रकलेत रस असला तरी त्याला खरी आस्था वास्तुशास्त्राविषयीच होती. अशा प्रकारची रेखाटने करावयास त्याला फार आवडे."
( This is the Enemy - Frederick Oechsner. )

केह्लस्टीन येथे सहा हजार फूट उंचीवर हिटलरने स्वत:साठी एक बंगला बांधला होता. त्या बंगल्याचे वर्णन फ्रेंच परराष्ट्र वकिलाने पुढीलप्रमाणे केले आहे. " दूर अंतरावरून हा वाडा ही एक वेधशाळा असावी असा भास होई किंवा सहा हजार फूट उंच कडयाच्या टोकावरील एखाद्या प्रचंड खडकावर बांधलेल्या मठी-सारखा तो भासे. वाड्याकडे पोचणारा रस्ता नऊ मैल लांबीचा होता. तो चक्राकार असून त्याला अनेक वळणे होती. खडक फोडून तो तयार करण्यात आला होता. ह्या बांधकामाच्या धिटाईकडे पाहताना ती बांधणाऱ्या टाउट् ह्या इंजिनियरच्या कौशल्याविषयी जितके कौतुक मनाला वाटू लागते, तितकेच तीन वर्षे दिवसरात्र तिथे खपणाऱ्या मजुरांच्या चिकाटीविषयीही वाटू लागते. हा नऊ मैलांचा रस्ता एका भुयारी मार्गापाशी येऊन थांबतो. ह्या भुयारी मार्गाने आपण शेवटच्या टेकडीच्या पायथ्याशी येऊन पोचतो. त्या पुढील मार्ग पितळेच्या दुहेरी दरवाजाने बंद केलेला आहे. भुयारी रस्त्याच्या टोकाला एक प्रशस्त लिफ्ट उभी असते. तिच्या बाजू तांब्याच्या पत्र्याच्या आहेत. त्या पत्र्यावर अनेक प्रकारचे नक्षी-काम खोदलेले आहे. ह्या लिफ्टमध्ये बसून ३३० फूट वर गेले की मग हिटलरची राहण्याची जागा येते. ही जागा पाहताच मन अगदी थक्क होऊन जाते. .. ...

रोमन स्तंभांच्या पद्धतीवर बांधलेली प्रचंड व मजबूत इमारत तिथे पाहुणाऱ्याच्या नजरेस पडते. वर्तुळाकार भिंतीत बसविलेल्या बैठ्या खिडक्यातून त्याला सभोवतालच्या पर्वतराजी पाहता आल्या असत्या . . . घरासभोवती पाहू लागल्यास हे संपूर्ण घर अधांतरी लटकत असल्यासारखे भासले असते . . . ते घर हा एखादा चित्तभ्रम किंवा इंद्रजाल आहे असाच भास होतो . . . ते घर पाहताना प्रेक्षकाच्या मनात विचार येऊ लागतात की घर बांधण्याची ही कल्पना हे निकोप मनाचे कृत्य आहे, की एखाद्या भ्रमिष्ट वेड्याचे ते लोकविलक्षण वेड आहे; जगावर हुकूमत गाजवू पाहणाऱ्या आणि एकांत जीवनाच्या कल्पनेने पछाडलेल्या मनाची कृती आहे, की भयाने त्रस्त झालेल्या भीतीग्रस्त मनाची ती पळवाट आहे."

"ह्या सर्व प्रकारातील एक तपशील कुणाच्याही नजरेतून सहसा सुटण्यासारखा नाही. तुम्ही पाहणार नाही म्हटले तरी तुम्हाला तो जाणवल्यावाचून राहत नाही. ॲडॉल्फ हिटलरची मनोरचना समजावून घेण्याच्या दृष्टीने तर तो फारच महत्त्वाची आहे. ह्या प्रचंड वास्तूकडे जाणारा प्रत्येक मार्ग, भुयारी रस्त्याची प्रवेशद्वारे, त्यातून बाहेर पडण्याचे मार्ग मुख्य इमारतीकडे जाणारे मार्ग ह्या सर्व ठिकाणी हत्यारबंद शिपायांचा जथ्याच्या जथा पहाऱ्यावर असलेला तुम्हाला आढळतो. शेकडो मशिनगन्स हिटलरच्या रक्षणासाठी सज्ज असतात.

* * *

दुसऱ्या महायुद्धाला सुरुवात होण्यापूर्वी थोडेच दिवस अगोदर २५ ऑगस्ट १९३९ रोजी ब्रिटिश वकील नोवेल हेंडरसन ह्यांनी हिटलरची मुलाखत घेतली होती. त्या मुलाखतीत अनेक प्रश्नांची चर्चा झाली. चर्चेच्या ओघात एकदा हिटलर म्हणाला की, "वृत्तीने मी कलावंत आहे. राजकारणी नव्हे. एकदा हा पोलिश प्रश्न मिटू द्या. की मी राजकारणातून निवृत्त होणार व कलासाधनेला वाहून घेणार. मला कलावंत म्हणून मरायचे आहे. युद्धपिपासू राजकारणी म्हणून नव्हे. जर्मनीला युद्धछावणीचे रूप यावे असे मला वाटत नाही. एकदा हा पोलिश प्रश्न सुटला की मी स्वतःही सुटेन..."

आल्बर्ट स्पिअर (शस्त्रास्त्रे व युद्धसाहित्य पुरवठा मंत्री) लिहितात की, "हिटलरला स्वतःचे जीवितकार्य (mission) आवडत नसावेसे मला वाटते. मला वाटते की तो मनातून वास्तुशास्त्रज्ञच आहे. अनेक वेळा राजकारणाविषयीची नावड त्याने दाखविली आहे. तसेच युद्धसमाप्तीनंतर राजकारणातून निवृत्त होण्याचा व लिन्झ येथे एक घर बांधून आपले उर्वरित दिवस तेथे घालविण्याचा

वेत त्याने मला बोलून दाखविलेला आहे. राजकारणातून अंग काढून घेण्याची भाषा तो बोलतो. आपल्या राजकीय वारसाना कोटल्याही प्रकारे अवघडल्यासारखे होऊ नये ही काळजी मी घेईन असेही तो सांगतो. लोक त्याला थोड्याच काळात विसरतील व मग अगदी एकट्याने जीवन घालविणे त्याला शक्य होईल असे त्याला वाटते. कदाचित आपल्या पूर्वीच्या सहकाऱ्यांपैकी काहीजण आपणास येऊन भेटतील, पण त्याचीही निश्चित शाश्वती नाही असे तो म्हणतो. श्रीमती ब्राईनखेरीज इतर कुणालाच तो आपल्याबरोबर घेणार नव्हता. दीर्घकाल त्याच्या सहवासात राहणे इतर कुणाला जमले देखिल नसते...... परंतु युद्ध सुरू झाले आणि हे सारेच पालटले. जेव्हा तो महान युद्धसेनानी, जगातील सर्वश्रेष्ठ असा युद्धव्यूहरचनाकार बनला, तेव्हा त्याचे मित्रमंडळही बदलले. त्याची कामाची पद्धती यंत्रवत आणि कंटाळवाणी झाली. परिस्थितीचा दाब मनावर असह्य ताण निर्माण करू लागला. त्याच्या जीवाला स्वस्थता लाभेनाशी झाली. सगळेच गाडे फिरले. त्याने चित्रपटाना जाणे थांबले. कलावंत आणि मित्रांच्या मैफली बंद झाल्या. आता तो गावढळ सैनिकांच्या गराड्यात वावरत होता. ज्यांना तो स्वतःच्या खोट्या अहंकाराच्या गंडात कमी मानी आणि ज्यांचा आत्यंतिक तिरस्कार करी ! सामाजिक व राजकीय दृष्टचा नव्हे तर सैनिकी दृष्टचाही !" १९४१ मधील एका भोजनप्रसंगी सुद्धा "माझी अंतर्यामीची खरी इच्छा एक अज्ञान कलावंत म्हणून इटलीभर फिरावे अशी आहे" असे बोलल्याची नोंद आहे. हिटलरच्या मनाचे कलावंत आणि युद्धप्रेमिक असे विभाजन अगदी प्रथमपासून झालेले होते हे यावरून दिसून येते.

गोबेल्सने आपल्या रोजनिशीत पुढील नोंद केलेली आढळते. ( १० मे १९४३.) " युद्ध संपल्यानंतर येऊ घातलेल्या आनंदी दिवसाविषयी आज फ्युरेर बोलले. तेव्हा ते अति उत्तेजित झाले होते. सध्याचा आपला करडा गणवेश टाकून देऊन केव्हा एकदा आपण खाकी कपडे पेहनतो असे मला झाले आहे असे ते मला सांगत होते. मग सिनेमांना, नाटकांना जाता येईल; संध्याकाळ कलावंतांच्या सहवासात घालविता येतील; माणसातील एक अधिक चांगला माणूस बनता येईल असे ते म्हणाले."

• • •

लेफ्टनंट कर्नल एडमंड हॉफमेस्टर नावाच्या सेनाधिकाऱ्याने हिटलरविषयी पुढील हकीकत सांगितली आहे. नाझी सैन्याधिकारी व नाझी सरकारचे बरेच







पदाधिकारी ह्यांच्यासमोर मे १९४४ मध्ये हिटलरने एक भाषण केले होते. त्याची ही हकिकत आहे. "हिटलर आजारी दिसत होता. त्याचा चेहरा सुजल्यासारखा वाटत होता. आवाज क्षीण होता. बोलणे असंबद्ध होते. तो दीड तास बोलला. भाषणात नॅशनल सोशालिस्ट पक्षाला सत्तेवर येताना किती अडचणींना तोंड द्यावे लागले याचेच वारंवार उल्लेख होते. एकदा तो म्हणाला की त्याला कलावंताचा पेशा स्वीकारायचा होता; परंतु पहिल्या महायुद्धात जर्मनीला भयंकर अपयशाचे धनी व्हावे लागले नि व्हर्सायच्या तहामुळे त्याला राजकारणात उतरावे लागले. नाही तर तो वास्तुशास्त्रज्ञच झाला असता.

२० जुलै १९४४ रोजी हिटलरच्या वधाचा प्रयत्न झाला. त्या घटनेनंतर "लिन्झ येथे जाऊन उर्वरित आयुष्य राजकारणनिवृत्तीत घालवावे असे त्याला अधिकाधिक प्रकर्षाने वाटू लागले व तसे तो बोलून दाखवू लागला. एकीकडे जर्मनी धुळीस मिळत होता, तर दुसरीकडे हिटलर अधिक उत्तुंग प्रासादरचनांचे नकाशे काढण्यात व्यग्र होता.—नवे नाट्यगृह बांधण्याचा तो विचार करीत होता. लिन्झसाठी नवे चित्रप्रदर्शनगृह बांधण्याचा बेत आखित होता." वस्तुस्थीती आणि त्याच्या कल्पनेत तो जगत होता ते आयुष्य ह्यातील तफावत अभ्रामण्यासारखी आहे. त्याच्या मनातील विचार व भावना ह्यांच्यातील मूळ दरी न मिटण्याइतकी रुंदावली होती.

फ्रॉईलन श्राडर ही हिटलरची चिटणीस. तिनेही हिटलरविषयी अशीच माहिती दिली आहे. ती सांगते की, "बर्लिन बॉम्बच्या वर्षावाखाली भाजून निघत असताना हिटलर संगीत, नाट्य व वास्तुशास्त्रांविषयी बोलत होता. जर्मन शहरांच्या पुनर्बांधणीच्या योजना आखीत होता."

बर्लिनच्या पाडावानंतर एका वर्तमानपत्रात लिहून आले होते की, "हिटलरच्या श्रीमंती अभ्यासिकेत व अंतर्गृहात गेलेल्या एका सोव्हिएट वार्ताहर चमूला जे दिसले त्याने ते सर्वजण बुचकळ्यात पडले होते. हिटलरच्या अभ्यासिकेत त्यांना हिटलरने रेखाटलेली काही चित्रे आढळली होती. ही चित्रे एकजात भावविवश होती. त्यांचा विषय पर्णराजीतून डोकावणारी घरे किंवा चंद्रप्रकाशात न्हाऊन निघालेली घरे अशासारखा कल्पनारम्य होता. ज्या गृहस्थाने आख्ख्या युरोपला रक्ताच्या नदीत बुडवून काढले त्याने अशी चित्रे काढावीत हे एक आश्चर्यच होते."

* * *

हिटलरला संगीताचा षोक होता. विशेषतः वॅग्नरचे संगीत तर त्याला

फारच आवडत असे. " राजकारणाचा कितीही ताण पडला तरी संगीत ऐकल्या-वाचून तो झोपत नसे. संगीतश्रवणाची शक्यता नसे तेव्हा एकटयाने अथवा एखाद्या निवडक मित्राच्या संगीत यांत्रिक वाद्यवृंदाच्या संगतीत तो श्रमपरिहार करीत असे."

खुद्द हिटलरला संगीतकाचे अंग अजिबात नव्हते त्याला साधी शीळ देखिल सुरेल वाजविता येत नसे. गाताही येत नसे. बेल्जियन फॅसिस्ट पुढारी द ग्रेय ह्याने १९३५ मध्ये त्याला एक बासरी भेट दिली होती. पण प्राथमिक सूर काढण्यापलिकडे बासरीवादनात हिटलरची मजल गेली नाही. हार्मोनियमवर तो फक्त साधे सूर काढू शके.

* * * *

हिटलरचे वाचन फारसे नव्हते आणि अवांतर विषयांचा त्याचा अभ्यासही फारसा नव्हता असा एक सार्वत्रिक प्रवाद आहे. परंतु तो खोटा असावा. हैडन नावाच्या लेखकाने हिटलरच्या एका निकटवर्तीयाचे पुढील उद्गार आपल्या पुस्तकात उद्धृत केले आहेत. " हिटलरचा ग्रंथसंग्रह फार समृद्ध होता. पण तो पाहून कुणालाही आश्चर्य वाटले असते. कारण त्यातील एकही पुस्तक त्याने वाचलेले नव्हते. " हिटलरच्या खाजगी ग्रंथसंग्रहालयात १६,३०० पुस्तके होती. त्यासंबंधी ओएशनेर ह्याने जे लिहून ठेविले आहे ते वाचले की, वरील विधान खोडसाळ असावेसे वाटते. तो लिहितो की, " हिटलर अमाप व चौफेर वाचन करी. अनेक वर्षांच्या ह्या वाचनाच्या सवयीमुळे इतिहास व सैनिकशास्त्रात त्याला सूक्ष्मदृष्टी अवगत झाली होती. तो फारसा शिकलेला नव्हता ही गोष्ट विसरता नये. " तरुणवयात व्हिएन्नामध्ये राहात असतानासुद्धा तो " मेहनत घेऊन वाचन करीत असे." तो वाचनाचा आधाशीच होता. वास्तुशास्त्रविषयक ग्रंथ, जर्मन योद्धयांच्या वीरगाथा, त्यांच्या आख्यायिका, ग्रीक अभिजात ग्रंथ, तत्त्वज्ञ, अनेक विषयांची व प्रकारची पुस्तके तो वाची. त्याची स्मरणशक्तीही अद्‌भुत होती. जादूटोणा इत्यादि विषयांवरील त्याचा ग्रंथसंग्रह तर पहिल्या दर्जाचा होता."

हिटलरपाशी व्यक्तिमत्व असे नव्हतेच. केवळ सामूहिक शक्तींच्या जोरावर तो वर आला असेही आणखी म्हटले जाते. हे निखालस खोटे आहे. इतरांना आकर्षित करून घेण्याची प्रचंड शक्ती त्याच्यात होती. केवढाही मोठा जनसमुदाय तो आपल्या भाषणाने हलवून टाकीत असे. तो म्हणेच की झुंडीचे मानसशास्त्र आपण बरोबर जाणतो. केवढाही मोठा समुदाय माझ्यासमोर असूद्या. त्याच्यापुढे



अनुक्रमणिका



मळा दहाच मिनिटे बोलू द्या. दहा मिनिटानंतर मला जिकडे त्या लोकांनी जावेसे वाटत असेल, त्या वाटेकडे ते निघालेले असतील. तो जनतेसमोर येई तेव्हा त्याच्यात विलक्षण बदल झाल्याचे दिसून येई. त्याच्यात जणू जादूचा फरक होत असे. "तो एकदम उंच वाटू लागे. ज्यांनी त्याला जाहीर सभेत पाहिलेला असे, ते जेव्हा त्याला खाजगी बैठकीत पाहत तेव्हा त्याचा खुजेपणा पाहून चाटच पडत. जाहीर सभात त्याचा चेहरा देखिल पालटत असे. मग तो करडा व हुकूमत गाजविणारा पुरुष भासू लागे. मन हेलावून सोडणाऱ्या भाषणाच्या नशेत त्याचा चेहरा विकृत बनला नसेल तर त्याचा चेहरा आक्रमक दिसे. अशा वेळी हिटलरचे संपूर्ण शरीर ताठरल्यागत होई. याचे डोळे माथेफिरूसारखे धुंद बनत. त्याचा आवाज खालच्या पट्टीतून चिरका होईपर्यंत चढे." दुसरा एक लेखक लिहितो की, "भाषणाच्या सुरुवातीपूर्वी अवघडलेला, हळुवार व काहीसा जनानी दिसणारा हिटलर भाषणाला सुरुवात होताच एकदम कठोर बने. त्याच्या सर्व हालचाली सैनिकी हालचालीसारख्या मोजक्या व यांत्रिक बनत ...... नुकतेच नाजूक स्मित केलेला त्याचा बायकी चेहरा एकदम उग्र व ओठ घट्ट मिटलेला बने. थोडक्यात तो आतूनबाहेरून कडक शिस्तीचा सैनिक बने."

"त्याचे डोळे तर भलतेच पालटून जात...त्याच्या डोळ्यांमध्ये विलक्षण थंडपणा येई. ते भावनाशून्य बनत. मला वाटते की धार्मिक माथेफिरूंचे डोळे जसे त्यांच्या मनातील तीव्र द्वेषामुळे एकदम विचित्र बनतात तसे त्याचे डोळे बनत. ते डोळे मानवी वाटतच नसत."

हिटलरच्या एका घनिष्ट स्नेह्यानेदेखिल त्याच्या व्यक्तिमत्वाचे असेच वर्णन केलेले आहे. तो लिहितो की, "ज्याचे संपूर्ण व्यक्तिमत्व केवळ दोन डोळ्यात साठविले गेले आहे अशी दुसरी कुठलीही व्यक्ती माझ्या आयुष्यात मी पाहिलेली नाही. . . . . त्याच्या डोळ्यातील भाव ज्या प्रकारे बदलत असत ते मोठे विलक्षणच म्हटले पाहिजे. . . . .

बर्लिनचा पाडाव होईपर्यंत त्याच्या डोळ्यातील ते विलक्षण तेज तसेच कायम होते. त्याची हाडे वर आली होती; शरीर थकले होते; चेहरा सुकला होता; शरीर वाकले होत; त्याचे हात कापू लागले होते; त्याचा आवाज घोगरा वा थरथरणारा बनला होता. पण त्याचे डोळे पूर्वीइतकेच तेजदार होते . . . अनेक स्थिरवृत्तीच्या माणसांनाही ज्या डोळ्यांनी भुरळ घातली होती त्या डोळ्यांची आकर्षक शक्ती कायमच होती. त्याचे डॉक्टर देखिल ते कबूल करतात आणि, त्यांच्यापैकी काही खरोखरच उत्तम डॉक्टर होते. ते सर्व म्हणतात की त्याच्या मंद निळसर करड्या डोळ्यांची आकर्षक शक्ती काही वेगळीच होती. त्याचे इतर

अवयव त्या मानाने बोजड व ओबडधोबडच होते. पण ती सगळी कमतरता त्याच्या दोन डोळ्यांनी भरून काढली होती. त्याच्या चेहऱ्यात जी सूचनशक्ती होती ती त्याच्या छायाचित्रात उतरत नाही."

राउशनिंग ह्यांनीही हिटलरच्या व्यक्तिमत्त्वाविषयी बरीच माहिती लिहून ठेविली आहे. हिटलरचा व त्यांचा चांगला परिचय होता. हिटलरच्या डोळ्यांविषयी ते लिहितात की, "हिटलरचे डोळे फार खोल नव्हते व फार निळेही नव्हते. त्याची नजर टवकारलेली परंतु थंड, मृतवत असे. त्यात पाणीदारपणा व खरेखुरे चैतन्य यांचा अभाव होता." मात्र ते असेही कबूल करतात की "भेटावयास आलेले लोक ह्या माणसाचे व्यक्तित्व पाहून भारून जात. ते त्याला अलौकिक व्यक्ती समजत." खुद्द त्यांच्यावरही हिटलरच्या व्यक्तिमत्त्वाची मोहिनी पडली होती. अनेकदा ते या मोहिनीला बळी पडत. "खूप काळानंतर हिटलरच्या व्यक्तिमत्त्वाची मोहिनी ते दूर करू शकले." हिटलरची तुलना ते "मृतात्म्यांशी संपर्क साधू शकणाऱ्या प्रेतमाध्यमांशी" करतात. ते म्हणतात की त्यांच्या शक्तीपेक्षाही कितीतरी मोठी शक्ती ह्या माध्यमांना बाहेरून मिळत असते. हिटलर ह्या माध्यमांसारखाच होता. मृतात्मा शरीरामध्ये शिरल्यानंतर माध्यम ज्याप्रमाणे विलक्षण रूप धारण करते त्याप्रमाणे हिटलरही करीत असे. एकदा त्याच्या अंगात ती अमानुष, सैतानी शक्ती शिरली की त्याचे संपूर्ण व्यक्तिमत्व बदलून जाई. ह्या सैतानी शक्तीमुळेच माणसे त्याच्या हातची बाहुली बनत,



हिटलर सतरा वर्षांचा असतानाचा त्याच्या मित्राचा एक अनुभव सांगण्यासारखा आहे. हिटलर व त्याचा मित्र असे दोघेजण त्या दिवशी वॅग्नरचे रिएन्झी हे संगीत नाटय पाहावयास गेलेले असतात. नाटक संपल्यानंतर घरी जाण्याऐवजी हिटलर व त्याचा मित्र जवळच्याच टेकडीवर जातात. रात्र चांदणी होती. त्या चांदण्यारात्री जे घडले त्याचे वर्णन त्या मित्राच्याच शब्दात वाचलेले चांगले. तो लिहितो, "जणू दुसरीच कुणीतरी व्यक्ती हिटलरच्या शरिराच्या माध्यमातून बोलत होती व माझ्याप्रमाणेच त्यालाही भारून टाकीत होती. कधी कधी एखादा वक्ता स्वतःच्या शब्दांनी भारला जाऊन त्यात वाहत जातो. पण जे घडत होते ते त्यापैकी नव्हते. हिटलर स्वतःच्या शब्दांनी भारला गेलेला नव्हता. उलट, मला असे वाटत होते की त्याच्या तोंडातून आदिम वेगाने जे काही बाहेर पडत होते ते तो स्वतःच मोठ्या विस्मयाने व भावनातिरेकाने ऐकत होता...

त्या क्षणी हिटलरने भव्य उदात्त शब्दात स्वतःचे व स्वतःच्या देशबांधवांचे भविष्य-कालीन चित्र रंगविले."

"आजवर मला वाटत होते की कलावंत, चित्रकार किंवा कदाचित वास्तु-शास्त्रज्ञ व्हावे अशी माझ्या मित्राची इच्छा असावी. परंतु ते भाषण ऐकताच माझी खात्री पटली की इतःपर यापैकी काहीही शक्य नाही. तो आता काहीतरी भव्य, उदात्त गोष्टीच्या मागे होता. ते काय होते हे अद्यापी माझ्या पुरते लक्षात आले नव्हते माझ्या मित्राच्या त्या बोलण्याचा मला विस्मयही वाटत होता. कारण माझी अशी समजूत होती की कलावंताचे ध्येय हे माझ्या मित्राच्या मताने सर्वो-त्तम ध्येय होते. आता ते सारे बदलेले. आता तो जनतेकडून त्याला मिळणाऱ्या फर्मानाच्या व त्या फर्मानाप्रमाणे जनतेला पारतंत्र्यातून मुक्त करण्याच्या गोष्टी बोलत होता." ह्या प्रसंगानंतर बरोबर तेहतीस वर्षांनंतर–१९३९ च्या दुसऱ्या महायुद्धापूर्वी फक्त काही दिवसच आधी–हिटलरचा हा मित्र बेरूथ येथील चॅन्सेलरचा पाहुणा होता व हिटलर त्या ठिकाणी आला असताना श्रीमती वॅगनरना हा प्रसंग सांगत होता. "त्या क्षणी या सर्व गोष्टींचा आरंभ झाला."

मंत्रतंत्र, जादूटोणा, पैशाचिक शक्ती अशा सारख्या गूढ गोष्टीत हिटलरला अतोनात रस होता असे सांगणारा बराच पुरावा उपलब्ध आहे. राऊशनिंग ह्यांनी हिटलरचे पुढील शब्द उद्धृत केले आहेत. "नवीन युग अवतरत आहे. या युगाच्या पर-वलीचा शब्द कठोर इच्छाशक्ती हा आहे. विचक्षण बुद्धी हा नाही." "तिसरा डोळा असतो." "आकसत आकसत हा डोळा आता पिनिअलग्रंथीच्या आकाराचा बनला मनुष्याच्या भ्रूमध्याच्या ठिकाणी कपाळाच्या बरोबर मध्याच्या जागी तो आहे. असल्या प्रकारच्या गूढवाद्यांच्या बोलण्यात व लिहिण्यात त्याला खूप रस असे. राउशनिंग पुढे लिहितात की "गूढ आध्यात्मिक प्रकारच्या उपपत्ती मांडण्यामध्ये त्याला फार गोडी होती. कधी कधी तर ह्या उपपत्तीच्या नादातच तो वावरत असे. त्याला त्यांचे यश हे त्या शक्तींच्या अस्तित्वाचा सज्जड पुरावा वाटे. त्या शक्तिच्या अस्तित्वाचा पुरावा वाटे. नव्या युगाचा व येऊ घातलेल्या नव्या जातींच्या मानवाचा प्रेषित म्हणून ह्या शक्तींनी त्याला निवडले आहे, अशी त्याची स्वतःची खात्री होती." मानवजातीच्या एकूण आयुष्यात व जीवनपद्धतीत अमूलाग्र बदल होणार आहे व त्यासाठी अमुक इतक्या संख्येचा नरमेध आवश्यक आहे अशीही त्याची समजूत होती. युद्ध व त्यात होणारा नरसंहार हे त्याला देवकार्य वाटत होते. कारण नव्या मनुष्याच्या जन्माला हा नरमेधयज्ञ आवश्यक होता. त्याचा ग्रहज्योतिषावर विश्वास होता. ज्योतिषांशी तो विचारविनिमय करीत असे. महत्त्वाच्या निर्णयासाठी शुभ दिवस विचारीत असे. ओएशनरने पुढील प्रसंग

- सांगितला आहे. तो म्हणतो की, "अनेक पेचप्रसंग निकालात निघण्यापूर्वी एके दुपारी तीन तास हिटलर कुठेतरी नाहीसा झाला होता. तीन तास आपण कुणालाही भेटणार नाही अशी सक्त ताकीद त्याने गृहरक्षकास व आपल्या चिटणीसास देऊन ठेवली होती. हे तीन तास तो "त्याच्या ज्योतिषांसमवेत, आपल्या निर्णयाच्या युक्तायुक्ततेविषयी सल्लामसलत करीत होता ......त्याच्या पुस्तक संग्रहालयाचा तिसरा भाग ज्योतिष, जादूटोणा, मंत्रतंत्र, गूढ-पिशाच्चविद्या इत्यादि ग्रंथांनी भरलेला होता. हे ग्रंथ त्याने सगळ्या जगभरच्या विक्रेत्यांकडून जमा केले होते. जिथे त्याला आवश्यक वाटले तिथे त्यांची भाषांतरेही त्याच्यापाशी उपलब्ध होती. त्यात गूढ यंत्रे वगैरेंचेही फोटो होते. तसेच त्याच्या आयुष्यात महत्त्वाच्या ठरू शकणाऱ्या दिवशी जी ग्रहांची स्थिती होती त्यांचेही दोनशे फोटोग्राफ त्यात होते. ह्या सर्व वस्तू कडीकुलपात ठेवलेल्या असत. फोटो वेगवेगळ्या पाकिटात ठेवलेले असत व त्याच्यावर खुद्द त्याच्या हस्ताक्षरात टिपणे लिहिलेली होती." मंत्रतंत्र, जादूटोण्यासाठी त्याने तिबेटमधून अनेक लोक जर्मनीत नेले होते. त्याच्या मृत्यूची वार्ता बाहेर फुटताच १५०० तिबेटी लोकांनी बर्लिनच्या रस्त्यात येऊन आत्महत्या करून प्राणत्याग केल्याची यावेळच्या वर्तमानपत्रातून नोंद आहे. उलटे स्वस्तिक ही हिटलरची कल्पना आहे. हे स्वस्तिक त्याला एका तिबेटात जादुगाराने तयार करून दिले. सुलट स्वस्तिकाची गती डावीकडून उजवीकडे असते; म्हणजे अंधाराकडून प्रकाशाकडे, नेणिवेकडून जाणीवेकडे असते. उलटे स्वस्तिक प्रकाशाकडून अंधाराकडे, जाणीवेकडून नेणीवेकडे, बुद्धीकडून भावनांकडे जाते.

गूढविद्येच्या सिद्धांतातच हिटलरला रस होता असे नसून गूढविद्येचे अंगही त्याला स्वतःला होते असे वाटते. त्याच्या स्वतःच्या अंगात काही गूढ शक्ती वास करीत असाव्यात. निदान मोहिनीविद्येसारखी वा वशीकरणासारखी काही पिशाच्च विद्या त्याला अवगत असली पाहिजे. आपण जनतेचे नेतृत्व कसे करतो ह्याविषयी बोलताना राउशनिगना एकदा तो म्हणाला की, "धार्मिक माथे-फिरूपणाच्या मानसिक अवस्थेला पोचलेल्या जमावाला तुम्ही जे सांगता ते त्यांच्या स्मरणात अगदी खोल रुतून बसते. आत्यंतिक प्रयासानेही ते तेथून पुसून टाकता येत नाही. संमोहित अवस्थेत ऐकलेल्या शब्दांवर बुद्धिवादाचा किंवा चिकित्सक युक्तिवादाचा कसलाही परिणाम चालत नाही." "राजकीय युद्धाचे हिटलरी तंत्र हे खास हिटलरचे वैशिष्ट्य होते. खूप अभ्यास व मानस-शास्त्रीय अनुभव ह्यांच्या जोरावर आपण हे तंत्र आत्मसात केले असे तो "म्हणत असे जे योग्यच होते." राउशनिगला एकदा हिटलरने सांगितले की, जनतेला



अनुक्रमणिका



काय हवे आहे समजण्याचे मला एक वेगळे इंद्रियच प्राप्त झालेले आहे. अगदी उपजतवृद्धीने मला त्यांच्या अपेक्षा कळतात. त्यांच्या आशा-आकांक्षा काय आहेत, त्यांच्याकडून कोणत्या अपेक्षा करता येतील व कुठल्याही परिस्थितीत जनतेशी संबंध ठेवताना कोणत्या गोष्टी टाळल्या पाहिजेत याचे ज्ञान जन्मतःच मला आहे. हिटलरला झुंडीच्या मानसशास्त्राची जाण उपजतच अवगत असावी व त्या क्षेत्रात कुणीही त्याचा हात धरू शकला नसता."

आपल्या दृश्य जगाच्या बाहेर दुसरे एक अदृश्य विश्व आहे व त्यातील शक्ती आपल्या जगातील लोकांशी संपर्क जोडू पाहतात असाही त्याचा विश्वास होता. त्या विश्वातील काही शक्ती आपणाला अधूनमधून येऊन भेटतात अशी त्याची ठाम समजूत होती. राउशनिंगनी ह्या बाबतीत काही गंमतीदार माहिती सांगितली आहे. ते सांगतात की, "हिटलर कधी कधी घाबऱ्या घाबऱ्या झोपेतून उठतो. अशा वेळी त्याचे सारे अंग थरथरत असते. त्याच्या तोंडातून किंकाळ्या येत असतात व तो मदतीसाठी ओरडत असतो. मधून मधून तो आपल्या अंगाला झटके देतो. परंतु बसल्या जागेवरून तो हलू शकत नाही. जणू काही पलंगाच्या कडेला त्याला कोणी घट्ट जखडून ठेवलेले असते. या प्रसंगात तो इतका घाबरलेला असतो की, त्याच्या घाबरण्याने तो पलंग देखील गदगदा हालतो. तो मोठमोठ्याने बरळतो. पण त्याचे शब्द स्पष्ट नसतात. त्यामुळे कुणालाच अर्थबोध होत नाही. श्वास कोंडल्यागत तो धापा टाकीत असतो."

मला ज्याने ही माहिती दिली तो इसम अतिशय प्रामाणिक आहे. तसे नसते तर पुढील हकिकत मी सांगितलीच नसती. एके रात्री हिटलर झोपेतून उठला तो झोकांड्या देत. त्याचे डोळे विस्फारले होते. तो घाबऱ्या नजरेने इतस्ततः पाहत होता. अकस्मात तो ओरडला 'अरे, तो पाहा, तो तिथे उभा होता.' त्याचे ओठ भीतीने निळे पडले होते. त्याच्या तोंडातून काही चमत्कारिक आकडे व शब्द बाहेर पडत होते. पण त्यांचा अर्थ लागत नव्हता. कारण ते शब्द व उच्चार जर्मन भाषेतील नव्हते. त्या शब्दांचा उच्चार तर कानाला फारच भयंकर भासत होता. एकाएकी तो स्तब्ध झाला. त्याचे ओठ तेवढे हालत होते. त्याच्या शरीराला मसाज करण्यात आला. त्याला उत्तेजक पेय देण्यात आले. अकस्मात तो किंचाळू लागला. 'तो पाहा, तो पाहा, त्या कोपऱ्यात तो कोण आहे?'

* * *

हिटलर स्वतःला जगत्त्राता समजत असे. तो म्हणे की प्रत्येक गोष्टीचा मी थंड व निर्विकार मनाने विचार करतो. (राउशनिंग)

"मानवजातीचा मी मुक्तिदाता व्हावे अशी ईश्वरी योजनाच आहे. विचाराच्या दडपणातून मानवजातीची मी सुटका करू इच्छितो. नैतिक कल्पना आणि सद्सद्विवेकबुद्धी व आत्मदमन हा शुद्ध वेडगळपणा आहे. मानवजातीला या वेडातून मी मुक्त करू इच्छितो. आत्मस्वातंत्र्य आणि व्यक्तिगत जबाबदारी यांचे दडपण फारच थोड्यांना पेलू शकते. मी त्यातून मानवजातीची सुटका करू इच्छितो" या उद्गाराच्या उलटही उद्गार काही प्रसंगी त्याने काढले आहेत. १९४२ त घडून आलेल्या एका भोजनप्रसंगी तो बोलला की, "लोक अतिउत्साही असतात. राष्ट्राच्या पुनरुज्जीवनाच्या उत्साहाच्या भरात काही लोक मला दुसरा प्रेषित, दुसरा मोहम्मद व जगदुद्धारक बनवू पाहत आहेत. मी त्याना हे सांगू इच्छितो की मी प्रेषित नाही आणि जगदुद्धारकही नाही. प्रेषितपणाचा अंशही माझ्यात नाही."

अहंकाराचे निर्मूलन म्हणजे जर ख्रिस्तपण असेल तर हिटलर हा सैतान किंवा ख्रिस्तशत्रूच होता. इतका त्याने स्वतःचा उदोउदो करून घेतला होता. "व्यक्ती ही एक क्षुद्र वस्तू असून तिला यत्किंचितही किंमत नाही." हे हिटलरचे तत्वज्ञान म्हणजे एका राज्यकर्त्याचे दैवत्तीकरण होते. व्यक्ती हा क्षुद्र जंतू आहे असे म्हणणारा हिटलर स्वतःला मात्र प्रतिपरमेश्वर मानीत होता व एकट्याच्या वेड्या लहरीखातर हजारो नव्हे लाखो निरपराध जीवांना रक्ताच्या समुद्रात ओढीत होता. स्वतःच्या खोट्या अहंकारासाठी स्वतःबरोबर सगळ्या जगाचा नाश घडवून आणीत होता. सर्व जग एका क्रांतिकारक अवस्थेच्या अगदी तोंडावर उभे असून आजवर होऊन गेली ती युगे व आता येऊ घातलेले युग यात भयंकर तफावत असणार आहे, जुन्या संस्कृतींचे विघटन होत असून, धर्माचे जुने स्वरूप विलयाला जात आहे याची सुस्पष्ट जाण त्याच्या समकालीनांपेक्षा हिटलरला अधिक चांगल्या प्रकारे होती असे दिसते. इतिहासात आता एक अपूर्व बदल घडून येणार आहे, आजवर मूल्ये म्हणून जोपासलेल्या अनेक समजुती व श्रद्धा त्यात जळून खाक होणार आहेत ही गोष्ट हिटलरच्या समकालिनांना जितकी जाणवली नव्हती तितकी हिटलरला जाणवली होती. कॅथॉलिक चर्च ही एक फार मोठी व महान वस्तू होती असे तो म्हणे. परंतु प्रॉटेस्टंट चर्चविषयी तितकाच तिरस्कार दाखवी. "जग ही एक अंत नसलेली गती आहे कधीही न संपणारी क्रांती आहे' असे तो म्हणे व ह्या म्हणण्यातून अपरिवर्तनीय, गतीहीन संस्थाच्या विघटनाचे तत्व त्याला समजले आहे असे जरी वाटत असले, तरी ख्रिस्ती धर्मविषयीचा त्याचा द्वेष आणि एकूण परिस्थितीविषयीची त्याची जाण ह्यात

फरक आहे. परिस्थितीची त्याला जाण होती. परंतु ती पूर्ण नव्हती. हिटलर स्वत: कमालीचा अहंकेंद्रित होता. त्यामुळे परिस्थितीचे आकलन त्याला होत असले तरी ते पूर्ण सत्याच्या स्वरूपात होत नसे. चर्च हीं संस्था मृत होत होती, कारण चर्चच्या शिकवणुकीतील आत्मविसंगती सामान्य जनांनाही दिसू लागली होती. जग अनंत काळपर्यंत टिकणार असून व्यक्तिगत आत्माही अनंत काळपर्यंत जिवंत राहणार आहे ह्या चर्चच्या मतांविषयी फारसा विश्वास कुणाच्या मनामध्ये राहिला, नव्हता. किंबहुना आत्मा ह्या वस्तूच्या अस्तित्वाविषयीच लोकांना शंका निर्माण झाली होती व याच दृष्टीने चर्चच्या विघटनाला प्रारंभ झाला होता. परंतु हिटलर स्वतःच्या आत्म्याचे दैवतीकरण करू इच्छित होता. आपल्या 'स्व'ला देवकोटीत बसवू इच्छित होता व त्या दृष्टीने ख्रिस्ताचे उच्चाटन करू पाहत होतो. ख्रिस्ताचा द्वेष करीत होता व ख्रिस्ती मताचे निर्मूलन इच्छित होता. ख्रिस्ताचे उच्चाटन झाल्यावाचून त्याचे प्रस्थापन झालेच नसते. म्हणून त्याची सारी धडपड होती. त्यासाठी त्याने जुन्या नीतितत्त्वांचीही अप्रतिष्ठा चालविली होतो. ज्यू-ख्रिस्ती धर्मातील प्राण्यांवर दया करा. शत्रूवर व शेजाऱ्यांवर प्रेम करा, अशा प्रकारच्या दया-करुणा नीतितत्त्वांच्या जागी तो देश हाच धर्म 'देश हाच परमेश्वर. निसर्ग हाच परमेश्वर. ..देव आणि परमेश्वर आमच्या रक्तात आहे, आमच्या नियतीत आहे' अशा प्रकारच्या कठोर, अहंकारपूर्ण नीतिचा अवलंब त्याने केला होता. दया-करुणावादी ख्रिस्ती धर्माचे उच्चाटण करण्यासाठी शेतकरीवर्गाला त्याने हाताशी धरले. त्या वर्गाच्या 'रक्तपिपासू देवताधर्माचे' पुनरुज्जीवन केले. हिटलर रोमन सम्राट ज्यूलिअन दि ॲपोस्टेटची स्तुती करी व कॉस्टंटाईनला कमी लेखी. ज्यूलियन प्रारंभी ख्रिस्ती बनलेला असतो, पण मागाहून त्या धर्माचा त्याने त्याग केला. तो रोमन देवतांचा भक्त बनला. हिटलर ज्यूलियनच्या याच कृतीचा आदराने उल्लेख करी. हिटलर त्याला 'स्वच्छ नजरेचा' थोरवीर समजे व म्हणे की, "ख्रिस्ताच्या धर्मासंबंधीची त्याची मते हजारो, लाखो लोकांच्यापर्यंत नेऊन पोचविली गेली पाहिजेत." ज्यूलिअनच्या "सूक्ष्मदृष्टीची, त्याच्या शहाणपणाची व बुद्धिमत्तेची" तो स्तुती करी. कॉन्स्टांटिनोपलचा संस्थापक कॉन्स्टंटाईन हा रोमन सम्राट म्हणून गादीवर आला व मागाहून त्याने रोमन धर्माला चाट देऊन ख्रिस्ती धर्म स्वीकारला ह्याचा उल्लेख करून तो म्हणे की, "खरा धर्मघातकी ज्यूलिअन नव्हता, खरा धर्मघातकी कॉन्स्टंटाईन होता. कॉस्टंटाईन हा धर्मबुडव्या होता. ज्यूलिअन त्याच्या धर्माशी प्रामाणिक होता. ख्रिस्त्यांनी ज्यूलिअनविषयी जे गरळ लिहिले आहे, त्याची जात ज्यूंनी आम्हा जर्मनांविषयी जे लिहिले आहे त्याच्यासारखी आहे.



अनुक्रमणिका

त्याउलट सम्राट ज्युलिअनचे लिखाण हा बुद्धीचा व शहाणपणाचा अत्युच्च विलास आहे "

● ● ●

हिटलर एकोणीस वर्षांचा असताना त्याने एक नाटक लिहिले होते; नाटकाचे कथानक जर्मनीच्या ख्रिस्तीकरणाच्या पार्श्वभूमीवर घडल्याचे दाखविलेले होते. एकूण ख्रिस्ती नैतिक आचारधर्माला व तत्त्वज्ञानालाच हिटलरचा विरोध असल्याकारणाने त्या नाटकातही हिटलरने तीच बाजू रंगविलेली आढळते. त्यात असे दाखविलेले असते की कित्येक योद्धे व धर्मगुरू ख्रिस्ती धर्मोपदेशकांची कत्तल करण्याची शपथ घेतात. त्यासाठी रोमन पद्धतीचा एक धार्मिक विधी घडवून आणतात. हिटलरच्या भावनांचा कल काय होता हे दाखविण्यासाठी व कोणती मूल्ये तो श्रेष्ठ मानीत होता हे स्पष्ट करण्यासाठी हे नाटक हा एक अत्युत्तम दस्तऐवज आहे. हिटलर हा धार्मिक माथेफिरूच्या जातीचा पुरुष होता हे त्यावरून स्पष्ट दिसून येते.

राऊशनिंग ह्यांनी असे लिहून ठेविले आहे की दुसऱ्या महायुद्धाला प्रारंभ होण्याआधीच्या काळात हिटलरच्या मनात नवधर्म स्थापनेचे व नवमानवता-निर्मितीचे विचार येत होते. तो असे ठाम समजून चालला होता की जगातील सर्व धर्म आता विलयास जाणार असून जुनी मानवजातही नष्ट होणार आहे. नवी मानवजात पूर्वीपेक्षा उच्च प्रतीची असणार आहे. तिची मूल्ये उच्च असणार आहेत व तिचा धर्मही उच्च असणार आहे. हा धर्म देण्याचे काम हिटलरवर पडले आहे असा हिटलरचा दावा होता. दुसऱ्या महायुद्धात जो नरसंहार घडून येत होता ती नव्या धर्माच्या आणि नव्या मानवजातीच्या निर्मितीसाठी चाललेल्या यज्ञातील समिधा होती. राऊशनिंग लिहितात की नव्या जागतिक धर्माच्या व नव मानवजातीच्या निर्मितीच्या कल्पना हिटलरच्या मनात तेव्हा येत होत्या तरी " त्या कल्पनांच्या सार्वत्रिक वाच्यतेची वेळ अद्यापि आलेली नसल्याने सामान्य-जनांसमोर तो त्या कल्पना बोलून दाखवीत नव्हता आणि युद्ध करण्यामागील स्वतःच्या खऱ्या हेतूंचा थांगपत्ता कुणास लागू देत नव्हता.. प्रथम त्याला देशांतर्गत राजकीय संघर्ष शेवटाला न्यायचे होते. हे संघर्ष शेवटाला गेले व की मग पुढे जे भयंकर युद्ध येणार होते त्याची तयारी करायची होती. हे निर्णायक युद्ध काही झाले तरी येणारच होते. मग जेव्हा त्याच्या स्फूर्तिदात्या वीराप्रमाणे, जुन्या फ्रेडरिक राजाप्रमाणे तो युद्ध मागे टाकणार होता, तेव्हा जर्मनीच्या पुनर्बांधणीचे





काम तो हाती घेणार होता. खाजगी संभाषणात अनेकदा तो ह्या गोष्टी बोलून दाखवीत असे. त्याची एकंदर वृत्ती जरी धीरसनुरीची होती व वरवर जरी आपण परिस्थितींविवश आहोत असे तो दाखवीत होता तरी त्याच्या त्या शांततेच्या मुखवटयामागे त्याची खरी बेचैनी दडलेली होती. कधी एकदा हे सर्व प्रकरण संपते आणि कधी एकदा आपण नवधर्मसंस्थापनेच्या कामाला हात घालतो; कधी एकदा सर्जनशील व प्रतिभावान राजकारणपटू, विधीदाता नवनिर्मितीक्षम कलावंत, नगरसंयोजक, नव्यायुगाचा प्रेषित व नवधर्मप्रवर्तक आपण बनतो ह्याची उतावीळ त्याला झाली होती."

* * * * *

माकिअॅव्हेलीचा राजा (Prince) हा ग्रंथ हिटलरने चांगला अभ्यासला होता. कित्येक दिवस हा ग्रंथ उशाशी घेऊन तो झोपत असे. "ह्या ग्रंथाच्या वाचनाने त्याचे मन स्वच्छ व शुद्ध झाले होते. असा अनुभव ह्यापूर्वी त्याला कधीच आला नव्हता. जणू काही त्याचे मन अग्नीनें धुतले जाऊन शुद्ध झाले होते. त्याला मुक्ततेचा अनुभव आला होता. भावुक अति भावविवश विचारांपासून व चुकीच्या कल्पनांपासून त्या ग्रंथाने त्याची सुटका केली होती. पदोपदी किती प्रकारच्या भावनांचा खोडा आपल्या मनावर असतो हे त्याला त्या ग्रंथाने दाखवून दिले होते. किती प्रकारची आंतरिक मानसिक बंधने आपणास मागे खेचित असतात हे त्याला त्या ग्रंथावरून समजून आले होते. माकिअॅवेलीचे पुस्तक वाचल्यानंतर राजकारणशास्त्र हे काय आहे व ते शिकण्यासाठी काय केले पाहिजे ह्याची जाण त्याला आली होती." राउशनिंग बरोबरच्या एका संभाषणात तो असेही म्हणाला की, "दिवसात शंभर वेळा शपथ घेऊन खोटे बोलण्याची आपली तयारी आहे. त्यामुळे फारसा मोठा फरक तो काय पडणार असतो? दुसऱ्या एका वेळी तो असेही बोलला होता की राजकारणात आपण 'कुठल्याही प्रकारचे नैतिक मत' मानीत नाही. येथे तुम्ही काहीही केले तरी ते योग्य असते. राजकारणामध्ये कुठलीही गोष्ट पाप नसते राजकारणाचे कायदे खेळी करणाराच्या सोयीप्रमाणे बदलत असतात. पुढे जे काही घडले त्याने हिटलरचे हे बोल त्याच्याबाबतीत किती सार्थ होते हेच दाखवून दिले.

* * * * *

हिटलरला आर्यन वंशाचा अभिमान होता. जर्मन लोक हे तो शुद्ध आर्यन



अनुक्रमणिका



रक्ताचे लोक मानीत असे. यहुदी किंवा ज्यू ह्या रक्तात भेसळ करू पाहतात असे तो समजे. शुद्ध आर्यवंशीय जर्मन वाचायचे असतील तर अशुद्ध रक्ताचे लोक नष्ट झाले पाहिजेत अशी त्याची धारणा होती. या संदर्भात राउशनिंगशी बोलताना (१९३४) एकदा तो म्हणाला की "जर्मनवंशीयांना वाचविण्यासाठी नरसंहार करावा लागला तरी तो आपण करणार आहोत. असा नरसंहार केल्याबाचून आपणाला सुटकाच नाही. तेव्हा लोकसंख्या कमी करण्याचे शास्त्र शोधून काढणे भागच आहे. तुम्ही विचाराल की म्हणजे काय? लोकसंख्या तुम्ही कशी काय कमी करणार? तर त्यावर माझे उत्तर असे की एक संबंध मानववंशाच्या वंश नाहीसा करणे म्हणजे माझ्या दृष्टीने लोकसंख्या कमी करणे. माझे जीवितकार्य तेच आहे. निसर्ग आत्यंतीक क्रूर असतो तेव्हा आपणही क्रूर बनावयास हरकत नाही. जर्मन राष्ट्राच्या तेजस्वी पुत्रांना युद्धाच्या कठोर खाईत ढकलावयास जर मी मागेपुढे पाहत नाही, तर कीडमुंगीवत प्रसवणाऱ्या एका नीच वंशाच्या पाचपंचवीस लाख लोकांना उडवायला" मी मागे का पाहावे? मला वाटते की मला तो नैतिक अधिकार आहेच. उडवायचे ह्या शब्दाचा अर्थ नेहमी "हत्या" असाच करायचा असे काही नाही. उडवायचे म्हणजे त्यांची संख्या कमी करायची असाही अर्थ घेता येईल. त्याची वीण थांबविली म्हणजे झाले."

* * *

विध्वंसन आणि विद्वेष ह्या दोन कल्पनांनी हिटलरच्या मनावर आपला संपूर्ण पगडा बसविला होता. हिटलर राऊशनिंगपाशी एकदा बोलतो की, "समजा, युद्धात आमचा विजय झाला नाही तरीही आमची हरकत नाही. कारण काहीही झाले तरी सगळ्या जगाला आम्ही आमच्याबरोबर युद्धाच्या खाईत लोटू व जर्मनीवर वर्चस्व गाजवावयासच आम्ही कुणाला शिल्लक ठेवणार नाही (१९३४). राउशनिंग लिहितात की, हिटलरच्या बाबतीत द्वेष ही वस्तू झींग आणणाऱ्या कडक दारूसारखी झाली होती. द्वेषाने त्याचा द्वेष वाढत चालला होता."

ट्रेव्हर-रोपर ह्यांनीही हिटलरच्या ह्या रक्तपिपासू वृत्तीविषयी लिहून ठेविले आहे. ते लिहितात की हिटलरची ही रक्तलालसा दिवसानुगतिक वाढतच होती. प्रत्यक्ष रक्त पाहावयास त्यास आवडत नसे. परंतु रक्तरंजित कल्पनाचित्रे मनाशी रंगवावयास त्यास फार आवडत असत. रक्तपाताचे वर्णन तो मिटक्या मारीत करू शके. अशा वेळी, पाहणाऱ्याच्या लक्ष्यात येईल इतक्या स्पष्ट प्रमाणात तो उत्तेजित झालेला असे. रक्तपाताच्या केवळ विचारानेही त्याला झींग चढल्या-

सारख होत असे. मात्र रक्तपाताचे दृश्य शारीरिक दृष्ट्या तो सहन करु शकत नसे. हिटलरची मूलभूत प्रकृती विनाशवाद्याची असावी. कारण सर्व प्रकारचा विध्वंस, विनाश, मोडतोड, छिन्नविच्छिन्नता ह्या गोष्टींचे त्याला मुळातच आकर्षण होते. . . . हिटलरच्या रक्तलालसेचा कितीतरी पुरावा युद्धकाळात मिळालेला आहे. रक्तपाताच्या केवळ कल्पनेनेही तो उत्तेजित होत असे. हत्येकरिता त्याला हत्या आवडत होती. हिटलरची ही विचित्र लालसा पाहून अनेक युद्धात ज्यांनी भाग घेतला होता व रक्तपात हाच ज्यांचा धंदा होता असे मी मी म्हणविणारे युद्धवीर व सेनापती देखिल मनातल्या मनात थरकाप होत असत. रक्तपाताच्या बाबतीत निर्ढावलेले असे हे पोलादी हृदयाचे पुरुष ज्याला घाबरत त्या हिटलरच्या रक्त लालसेची तीव्रता काय भयंकर असली पाहिजे ह्याची कल्पनाच करावयास हवी. पोलंडविरुद्धची मोहीम चालू असताना हाल्डेरने हिटलरपाशी आग्रह धरला की वॉर्सावर बॉबहल्ला करण्याची गरज आता उरलेली नाही. तेथे सैन्य शिल्लक नाही व म्हणून आपोआपच ते शहर शरण येणार आहे. बॉंबहल्ला ह्या अशा वेळी नाहक प्राणहानीस व वित्तहानीस कारणीभूत होईल. परंतु एव्हाना हिटलरची कल्पनाशक्ती उत्तेजित झाली होती. मनातल्या मनात त्याने वॉर्सावरील बॉंबवर्षावाचे, वॉर्साच्या विध्वंसाचे, तेथील जनतेच्या किंकाळ्यांचे व धावाधावीचे चित्र स्वतःपाशी रंगविले होते. तेव्हा वॉर्सावर बॉंबहल्ला केला गेलाच पाहिजे असा हट्ट त्याने धरला, एवढेच नव्हे तर हल्ल्यानंतर त्याला कोठली दृश्ये पाहावयाची आहेत याचेही चित्र आपल्या सेनानींच्या सोयीसाठी त्याने रेखाटले. हे चित्र इतके भयानक होते की त्याचे सेनानीदेखिल ते वर्णन ऐकून हबकून गेले— त्याला बॉंबवर्षावाच्या धुराने काळवंडून गेलेले वॉर्सा शहरावरील आकाश पाहायचे होते. शहरावर केली जाणार असलेली लाखो टन बॉबची वृष्टी पाहायची होती. उध्वस्त झालेले शहर व माणसांची शरीरे पाहायची होती. रक्ताने रंगलेले स्त्रीपुरुष पाहायचे होते. हे सर्व वर्णन चालू असताना एकाएकी त्याचा चेहरा पालटला. 'त्याचे डोळे जणू काही खोबणीतून बाहेर पडतात असे दिसू लागले. तो एकदम भयंकर व निराळाच पुरुष दिसू लागला. रक्ताच्या लालसेने तो अगदी वेडा झाल्यासारखा वाटत होता. हिटलरच्या जीवनाच्या अखेरीअखेरीस आपल्याच मंदिर-देवळांचा नाश पाहून आनंदानं बेहोष बनलेल्या एखाद्या क्रूर, रानटी, रक्तपिपासू, नरमांसभक्षक देवतेप्रमाणे हिटलरचा चेहरा दिसू लागला. आयुष्याच्या अखेरीस त्याने दिलेल्या सर्व आज्ञा ह्या कुणाच्या ना कुणाच्या हत्येच्या आज्ञा होत्या. कैद्यांची कत्तल करा. माझ्या जुन्या शस्त्रवैद्याला ठार मारा. आपल्या सख्ख्या मेहुण्याला देखिल त्याने फासावर चढविले. देशद्रोह्यांच्या सगळ्या वंशाना



अनुक्रमणिका

ठार केले. त्यांची साधी चौकशी देखिल करण्याची तसदी त्याने घेतली नाही. अतिप्राचीन काळच्या वीरपुरुषांप्रमाणे आपल्याबरोबरच आपल्या थडग्यात अनेक नरबळी पुरले जावेत अशीच जणू हिटलरची इच्छा असावी. विध्वंसाच्या क्रांतीचा हा अगदी उचित आणि तर्कशुद्ध प्रतीकात्मक शेवट होता.

* * * * *

हिटलरच्या त्यातल्या त्यात भल्या अनुयायांना हिटलरच्या क्रूरपणाविषयी काहीच माहीत नसे. ते आपले समजत की ही क्रूर कृत्ये हिटलरच्या नकळत घडत आहेत; त्यांच्याविषयी हिटलरला अजिबात काही माहिती नाही. परंतु हे सर्व हिटलरला कळूनसवरून होत होते याचा संशयातीत पुरावा इतिहासापाशी उपलब्ध आहे. राउशनिंग ह्यांनी हिटलरचे काही उद्‌गार टिपून ठेवले आहेत त्यावरून खरी परिस्थिती तावडतोब ध्यानात येते. छळशिबिरात घडत असणाऱ्या भयंकर छळाच्या व हृदयद्रावक अत्याचारांच्या हकीकती व तक्रारी हिटलरपर्यंत पोचू लागल्यावर १९३३ मध्ये एकदा संभाषणाच्या ओघात हिटलर बोलून गेला की, "साध्या, सरळमार्गी लोकांना अत्याचार, पाशवी सामर्थ्याचे प्रदर्शन आणि दरारा याच्याइतके दुसरे कशाचेही आकर्षण नसते. या गोष्टी त्यांना जितक्या चांगल्या कळतात तितका चांगुलपणा त्यांना कळत नाही. त्यांना दरारा दाखविण्याचा भीती हाच एकमेव उपाय आहे. फक्त भीतीलाच ते मानतात. म्हणून त्यांना जास्तीत जास्त घाबरवून सोडले पाहिजे. जास्तीत जास्त दटाविले पाहिजे. कसले ना कसले भय वाळगावयास. कशाला ना कशाला घाबरून राहावयास त्यांना आवडते. कुणाला ना कुणाला मनोभावे शरण जावयास आवडते. आत्यंतिक दरारा निर्माण करू शकेल असा पुरुष त्यांना हवा असतो. जो पुरुष त्यांना भीतीने थरथरा कापावयास लावतो तो त्यांच्या आदराचे व भक्तीचे स्थान बनतो. ... आम्ही क्रौर्याचा धिक्कार करतो. पण सामान्य लोकांना त्याच्याइतके दुसरे काहीच प्यार नसते. आम्ही शारीरिक छळाचा धिक्कार करतो. कशासाठी ? लोकांना छळ करावयास व छळ पाहावयास आवडत नाही असे तुम्हाला वाटते की काय ? तशी तुमची समजूत असेल तर ती अजिबात चूक आहे. क्रूरपणाइतके लोक कशानेही दबत नाहीत आणि कशानेही उत्तेजित होत नाहीत. ही छळशिबिरे म्हणजे निवांतपणे पश्चात्ताप करता येण्याच्या पश्चात्ताप मठी नव्हेत. दहशत, भीती, दरारा हेच सर्वात परिणामकारक राजकीय शस्त्र आहे.... जर्मन लोकांना कठोर, कडवे आणि

करडे बनविणे हे मी माझे जीवितकार्य मानतो. त्याशिवाय ते युद्धातील ह्रास-अपेष्टांना निर्ढावणार नाहीत."

" आज शांततेच्या काळात जसा मी वागत आहे तसाच युद्धाच्या काळातही मी वागणार आहे. माझ्या वागण्यात नंतरही कसला बदल होणार नाही. अधिक क्रूर युद्ध हेच खरे अधिक दयाशील युद्ध असते. माझ्यापाशी जे–जे उपाय आहेत ते सर्वच्या सर्व वापरून मी जगात दशहत पसरविण्याचा प्रयत्न करणार आहे. हे काम मी इतक्या आकस्मिकपणे करणार आहे की, काय होत आहे याचा विचार करावयास देखिल लोकांना फुरसत मिळू नये. महत्त्वाची गोष्ट, मृत्यूचा दरारा लोकांच्या मनात निर्माण करणे. लोकांना मृत्यूच्या घाल्याची दशहत वाटली पाहिजे. जे उपाय मी बाहेरच्या शत्रूंच्या बाबतींत वापरू पाहतो तेच मी अंतर्गत शत्रूंच्या बाबतीत वापरणार ! या बाबतीत अंतर्गत शत्रूंचा अपवाद मी का करावा ? तुम्ही ज्याला नृशंस कृती म्हणता, त्या नृशंस कृतीमुळे माझा त्रास किती वाचतो हे तुम्ही पाहत नाही. मी जर असा क्रूर वागलो नसतो आणि माझ्याविषयी लोकमानसात दहशत निर्माण केली नसती. तर आज अवज्ञा आणि राजकीय-सामाजिक असंतोषासाठी ज्या थोडक्या कारवायांवर काम भागत आहे ते तसे भागले नसते. मला प्रत्येक मनुष्याविरुद्ध ही कारवाई करावी लागली असती. आज काय होते की माझा क्रूरपणा पाहून माझी अवज्ञा करावयासच कुणी धजत नाही. माझी तेवढीच शक्ती वाचते. कारण माझी अवज्ञा करणारांच्या बाबतीत मी काय करू शकतो हे ज्यांनी एकदा पाहिले आहे, ते पुन्हा तसे करण्यापूर्वी शंभर वेळा स्वत:शी विचार करतील. छळशिबिरात त्यांची जी दशा होते ती पाहिल्यावर आम्हाला विरोध करण्यापूर्वी त्यांना खराखुरा विचार करावा लागेल."

मुळातच जे विकृत मनाचे होते अशाना हिटलरच्या कृत्यांचे आकर्षण वाटत असे ते हिटलरच्या गोटात शिरत असत व राजरोसपणे आपल्या क्रूर, विकृत वासना पुरवून घेत असत. हिटलर आणि त्याचे असे क्रूर हस्तक यांच्या हातून हजारोच नव्हे, तर लाखो निरपराध लोक भयानक मरणे मरण पावले. काही मशिनगनच्या गोळ्यांनी, काही कुत्र्यांच्या तोंडी पडून, काही विजेच्या धक्क्याने, काही शरीराचे अवयव छिन्नभिन्न केले जाऊन, काही जिवंतपणी पुरले जाऊन, काही पेटत्या अग्नीत फेकले जाऊन–हिटलरच्या कृत्यांची तुलना तैमूरलंगाच्या क्रूर कृत्यांशीच फक्त होऊ शकेल.

अनेक वेळा हिटलरच्या आज्ञेने लोकांचे बळी घेतले गेले होते. काही वेळा मात्र हिटलरच्या अधिकाऱ्यांच्या वैयक्तिक आज्ञामुळे हा प्रकार घडला होता. ऑशविझ छळछावणीचा अधिकारी रुडॉल्फ होएस् कबूल करतो की, " १९४१–४३ मध्ये हिमलरच्या आज्ञेवरून निदान २५,००,००० इतके लोक तरी गॅसने व



अनुक्रमणिका

घालून मारण्यात आले व निदान ५,००,००० तरी उपासमार व रोगराईला बळी पडले. थोडक्यात जवळ जवळ तीस लाख लोकांचा प्राण अशा प्रकारे घेतला गेला. मेजर जनरल ऑटो ओहलनडॉर्फ कबूल करतो की, "त्याच्या मार्गदर्शनाखाली रशियात जवळजवळ नव्वद हजार ज्यूंना ठार करण्यात आले." हिमलरची अशी आज्ञा होती की ज्यू-लोकांचा त्यांच्या मुलाबाळांसकट नायनाट करावा. ओहलेनडॉर्फ आणि जर्मन एस्. एस् संघटनेचे आणखी दहा अधिकारी यांना अमेरिकेच्या सैनिकी न्यायालयाने न्यूरेंबर्ग येथे दोषी ठरवून फाशावर लटकाविले. ह्या दहा जणांनी सोव्हिएट रशियामध्ये ज्यूंच्या सरसकट कत्तलीत भाग घेतला होता. कमीत कमी २०,००,००० स्त्रीपुरुष व मुले त्यांच्यामुळे प्राणास मुकली असावीत.

• • •

एका मनुष्यामुळे लक्षावधी स्त्रीपुरुष-मुले हालहाल केले जाऊन मारली जावीत ही कल्पनाही अंगावर शहारे आणणारी आहे. पूर्वजन्मीच्या पापाचा सिद्धांत खरा असेल, तर एका व्यक्तीच्या हातून इतके पाप घडण्याकरिता किती युगे तो आत्मा पाप करीत आला असला पाहिजे व हे संपूर्ण पाप फिटण्याकरिता आणखी किती युगे तो आत्मा तडफडणार आहे याची कल्पनाच करवत नाही !

• • •

हिटलररूपी दुःस्वप्न संपल्यानंतर त्यात सामील झालेल्यासमोर जेव्हा त्याच्या पापांचा घडा ठेवण्यात आला तेव्हा त्यापैकी अनेकजण विजेचा धक्का बसावा तसे शुद्धीवर आले. " न्यूरेम्बर्ग खटल्याच्या वेळी तरुण हिटलर संघटनेचा पुढारी फॉन शिराख म्हणतो की, " लाखो लोकांना यमसदनी पाठविणारा हिटलर आणि त्याचा वंशवाद यावर जर्मन तरुणांनी विश्वास ठेवला ह्याचा सर्व दोष माझ्यावर आहे .... त्या मनुष्यावर माझी श्रद्धा होती. माझ्या वागणुकीचे स्पष्टीकरण म्हणून मी फक्त एवढेच सांगू शकतो." व्यापित पोलंडच्या नाझी गव्हर्नर-जनरलच्या दैनंदिनीत पुढील नोंद आहे—(१९४२). " १२,००,००० ज्यूंना ते उपासमारीने मरतील इतक्या कमी शिध्यावर ठेवण्यात आले होते." व्यापित प्रदेशात प्रारंभी २५ ते ३० लक्ष ज्यू होते. " त्यांना घेटोत म्हणजे बंदिस्त वसाहतीत ढकलण्यात आले व नंतर पद्धतशीरपणे नि क्रूरपणे त्यांचा नाश करण्यात आला. फ्रँकच्या म्हणण्याप्रमाणे २५ जानेवारी १९४४ पर्यंत



अनुक्रमणिका

त्याच्यापैकी फक्त एक लाख ज्यू तेवढे उरले होते. युद्ध-गुन्हेगारीसाठी न्यायालया-पुढे उभा असताना ह्याच गृहस्थ म्हणतो "की हजार वर्षे गेली तरी जर्मनीचे हे पाप फिटणार नाही."

नाझी वर्चस्वाखालील युरोपमध्ये ९६ लाख ज्यू राहत होते असा अंदाज आहे. त्यातील तीनपंचमांश खलास झाले असले पाहिजेत असा अंदाज आहे.

* * *

सत्तेवर येताक्षणीच हिटलरने युद्धाची योजना आखली असली पाहिजे. कदाचित त्याच्याही पूर्वी त्याने ती आखली असण्याची शक्यता आहे. ( ह्या ठिकाणी त्याची युद्धपिपासू वृत्ती आपण लक्षात घेतली पाहिजे. पहिल्या महायुद्धात मोठ्या उत्साहाने त्याने भाग घेतला होता. युद्धाला आपण कंटाळलो असे एका शब्दानेही तो कधी तेव्हा बोलल्याचे ऐकिवात नाही. ) राउशर्निग यांच्या म्हणण्याप्रमाणे "मला युद्ध हवे आहे......मीच युद्ध सुरू करणार" असे तो बोलत असे. राऊशर्निग लिहितात की "हिटलरची मनोभूमिका फ्रेडरिख द ग्रेटसारखी असावी. त्याच्या डोक्यात सतत युद्धाचे विचार घोळत असत. हिटलर युद्धाची प्रतिक्षा करीत आहे, पण युद्धाची त्याला भीतीही वाटत आहे. कारण त्याच्या जन्मपत्रिकेतील ग्रहांप्रमाणे युद्ध त्याला अनिष्ट ठरणार होते. त्याने जे आजवर कमाविले होते ते तो युद्धात गमावून बसणार होता. परंतु त्याची महत्वाकांक्षा पुन्हा पुन्हा त्याला युद्धविचारांकडे आकर्षित करीत होती...... हिटलर हा सैनिकी व्यूहरचनाशास्त्राचा फार अभ्यासू विद्यार्थी होता."

हिटलर दोन पातळ्यांवर युद्ध खेळत असे. त्यातील एक पातळी मानसिक युद्धाची होती. दुसरी पाशवी सामर्थ्याच्या युद्धाची होती. मनुष्यामनुष्यांमध्ये भेद पाडण्याची हिटलरची शक्ती अलौकिकच म्हणावी लागेल, त्यामुळे कधी कधी हिटलर असामान्य पुरुष वाटू लागतो व त्याच्या अंगी काहीतरी अतिमानवी सैतानी गुण असले पाहिजे असे वाटू लागते. हिटलर अनेकदा अमानवी भासतो. त्याला स्वत:ला आपल्या ह्या अपूर्व गुणाची पूर्ण जाणीव असावी. तो म्हणत असे की, "युद्ध ही एक कला आहे. उत्तम युद्धकार हा उत्तम संगीतकारासारखा असतो. बारीकश्याही बदलांना तो संवेदनशील असतो. विसंगत स्वर, ताल, नाद, टप्पा यांचा बरोबर एकमिलाफ करून घेण्याची कला त्याला असावी लागते. या सगळ्या पृथकातून एक संपूर्ण पूर्ण निर्माण करण्याची साधना त्याला साध्य व्हावी लागते." एका वॅग्नरमहोत्सवाच्यावेळी मध्यंतरात हिटलरने हे भाषण केल्याचे

सांगतात. जर्मन वृत्तपत्रांनी त्याचे हे उद्गार अनेकवेळा छापले होते. प्रत्येक राजकीय व सैनिकी डाव मोजक्या व नेमक्या क्षणी स्वतःच्या वर्तमान फायद्यासाठी वापरण्याच्या त्याच्या कौशल्याला उद्देशून हे शब्द वारंवार उद्धृत केले जात. त्याचे चाहते म्हणत की कुठल्या वाद्यावर कुठल्या क्षणी जोर द्यावा हे जसे एखाद्या उत्तम संगीतकाला समजते, तसे आता राजकीय डाव खेळावा की सैनिकी डाव हे हिटलरला समजते.



हिटलरला अखिल जगावर प्रभुत्व गाजवायचे होते. पूर्वी कोणी गाजविले नसेल एवढे प्रभुत्व गाजवायचे होते व हा उद्देश डोळ्यासमोर ठेऊन आपल्या योजनेत उपयोगी पडतील अशी माणसे घडवावयास त्याने प्रारंभ केला होता. माणसात हे परिवर्तन घडून आले की पूर्वी कोणी पाहिली नाही अशी क्रांती घडून येईल असे तो म्हणे. ही देखील क्रांती खरीच, पण खऱ्या क्रांतीच्या ती किती विरुद्ध होती हे सांगावयास नको. हिटलर हा ख्रिस्त-शत्रू होता व त्याची क्रांती ही दैत्याची क्रांती होती. तो म्हणे "बँका आणि कारखान्यांचे सामाजिकीकरण कशासाठी? आपण मनुष्याचेच सामाजिकीकरण करू."

त्याला मनुष्यप्राण्याची एक नवी जातच पृथ्वीवर संवर्धित करावयाची होती. आपल्या मित्रांमध्ये तो असे बोलत असे की मानवी वंशाची कल्पना तो फार व्यापक अर्थाने वापरीत होता. एका राष्ट्राचे वा एका इतिहासाचे लोक ते एक लोक नव्हेत. एका विचाराचे व एका दिशेने जाऊ पाहणारे लोक ते एक लोक. तो एक वंश. त्याची मानवी वंशाविषयीची कल्पना अधिक प्रगल्भ होती. याच कल्पनेच्या आधारावर तो विद्यमान राष्ट्रांची अधिक उच्च स्तरावरील पुनर्मांडणी करणार होता. या पुनर्मांडणीबरोबरच झुंजार नॉर्डिक वंश पुन्हा एकदा सर्वसत्ताधीश बनायचा होता. हिटलर म्हणे की एक दिवस असा उजडेल की, "इंग्लंड, फ्रान्स, अमेरिकेतील नवमानवाच्या बरोबर आपण हातमिळवणी करू. जगाच्या पुनर्रचनेच्या कामात जेव्हा हे लोक आपणाशी सहकार्य करू लागतील व त्या कार्यातील आपला योग्य तो वाटा उचलतील तेव्हा त्यांना आपण आपल्यात सामील करून घेऊ जगाच्या पुनर्रचनेनंतर राष्ट्रवाद वगैरे जुनी नाणी चलनातून बाद होतील." राऊशनिंग ह्यांनी हिटलरचे पुढील उद्गार मुद्दाम नमूद करून ठेवले होते. हिटलरची इच्छा अशी होती की त्याच्या मृत्यूनंतर या उद्गारास प्रसिद्धी मिळावी. या उद्गारांच्या बाबतीत तो असेही म्हणाला होता

की जेव्हा जगाला हे उद्गार ज्ञात होतील तेव्हा त्यांना माझे व माझ्या शब्दांचे मोल कळून येईल. हिटलरचे हे शब्द असे : "मी एक महान शैक्षणिक प्रयोग करीत आहे. ह्या माझ्या प्रयोगाला मी नवयुवकांपासून सुरवात करीत आहे. आम्ही आता वयस्क झालो. आमच्या उपजतप्रवृत्तींना तेवढी धार उरलेली नाही. आम्ही कचखाऊ आणि भावविवश आहोत. लज्जास्पद भूतकाळाचे ओझे आमच्या उरावर नांदत आहे. एकेकाळच्या गुलामगिरीच्या व खुषमस्करेपणाच्या आठवणी आमच्या रक्तात खोल भिनल्या आहेत परंतु माझे हे शूर युवक ! त्यांच्यासारखे शूर आणि उमदे तरूण जगाच्या पाठीवर दुसरीकडे कोठे तुम्हाला आढळतील काय ? या माझ्या युवकांकडे आणि तरुणांकडे पाहा. त्यांच्याच जोरावर मी नव्या जगाची पायाभरणी करणार आहे."

"माझे तत्त्वज्ञान फार बिकट आणि कठोर आहे. मला मनुष्यातला दुबळेपणा जरा देखिल सहन होत नसतो. ह्या सर्व युवकांमधील दुबळेपणा पूर्णपणे घालवून दिला गेला पाहिजे. माझ्या तालमीत हे युवक असे काही तयार होतील की त्यांच्याकडे पाहताच सगळे जग थरथरा कापू लागेल. मला जे युवक हवे आहेत ते अशाच प्रकारचे धैर्यवान, कृतीशील, मनस्वी, मग्रूर, ताठ मानेचे व निष्ठुर मनाचे युवक हवे आहेत. त्यांच्या ठायी कोमल भावना आणि कमकुवत हृदय याचा एवढाही अंश असता नये. दुःख आणि यातनांच्या प्रदर्शनापासून ते मुक्त असावेत. दुःख त्यांना वाकवू शकता नये. यातना त्यांना दुखवू शकता नयेत. त्यांच्या नजरेत हिंस्रश्वापदाचा बेगुमानपणा असावा. कुणालाही ते डरता नयेत. प्रकृतीने ते सुडौल आणि दणकट असावेत. शरीर सुदृढ व सुडौल बनवू शकणाऱ्या अंग-मेहनतीचे शिक्षण मी त्यांना देईन. त्यांना तालिमबाज व कसरतपटू करीन. कारण मला तसले तरूण हवे आहेत. माझ्या राष्ट्राची ती पहिली आणि महत्त्वाची गरज आहे. गेली हजारो वर्षे मनुष्याला माणसाळविण्याची प्रक्रिया चालू आहे. त्याने मनुष्याचा अगदी लोळागोळा बनविला गेला आहे. मला ती सर्व प्रक्रिया पुसून टाकायची आहे व त्या ठिकाणी हिंस्र, कणखर, निर्भय आणि निष्ठुर तरूण निर्माण करायचा आहे."

हिटलरने तरुण मुलांचे काय केले आणि कोणती मूल्ये त्याच्या मनावर बिंबविली याचे एवढे वर्णन पुरे. त्याला कोमल मनाची मनुष्ये नको होती; त्याला क्रूर, निष्ठुर मनाचे हैवान हवे होते.

• • •



अनुक्रमणिका

हिटलरचा ज्यू–द्वेष किती प्रखर होता याची यत्किंचितही कल्पना त्याच्या कारकीर्दीच्या प्रारंभी कुणास आली नव्हती. परंतु हिटलरचा ज्यू–द्वेष अतिशय कडवा नि क्रूर होता. १९३५ साली हिटलरने इटालियन वकिलाला भोजन दिले होते. त्या प्रसंगी जे संभाषण झाले त्याची नोंद उपलब्ध आहे. त्यात हिटलर बोलला होता की "येत्या दशकात संपूर्ण ज्यूंचे जर्मनीतून उच्चाटण केले जाईल."

ज्यूंचे उच्चाटण या शब्दावर इटालियन वकील हिटलरला बोलला होता की, "ज्यूंचे उच्चाटण म्हणजे व्यापारउदीम व उद्योगधंदे यांच्यातील उच्चाटण की काय" त्यावर हिटलरचे उत्तर होते की, "छे, छे, नुसते तेवढेच नाही. मला म्हणायचे आहे की जर्मनीच्या रस्त्यावरदेखिल ज्यू दिसणार नाही.

वकिलाच्या चेहऱ्यावर संशय दिसला. त्याला हिटलरचे म्हणणे पटले नसावे. तो म्हणाला की, "जर्मनीतील सगळे ज्यू सामावून घेण्याइतक्या मोठ्या श्मशानछावण्या तुम्ही कशा काय बांधणार ? त्यांचे काय करायचा तुमचा बेत आहे ?

हिटलरने तपशिलात जायचे नाकारले. त्याने ओठ घट्ट मिटून घेतले नि वकीलमहाशयांकडे रोखून पाहत तो बोलला की, "ठीक आहे. परंतु मी आज तुम्हाला वचन देतो की येत्या दहा वर्षात हे सगळे ज्यू तुम्हाला नाहीसे झालेले दिसतील." पुढे ३० जानेवारी १९३९ रोजी राईशटॅग येथे जे एक भाषण त्याने केले त्यातही त्याने ज्यू-निर्मूलनाच्या आपल्या प्रतिज्ञेचा पुनरुच्चार केला. तो बोलला की, "या देशात आजवर सार्वजनिकरीत्या मी अनेक राष्ट्रीय भाकिते केली आणि काही लोक मला त्यासाठी हसले. सत्तेकरिता जेव्हा मी पहिल्याने झगडत होतो तेव्हा मी भाकित केले होते की एक ना एक दिवस या राष्ट्राची सूत्रे माझ्या हाती मी घेणार. नंतर संपूर्ण देशाचे नेतृत्व मी करणार व जे अनेक प्रश्न कायमचे सोडविणार त्यात या ज्यू-लोकांचा प्रश्न असेल. माझे ते भाकित ऐकून चेष्टेने जर प्रथम कोण हसले असेल तर हे ज्यू-लोक. मला वाटते की एव्हांना त्यांचे हास्य बंद झाले असेल. आज मी पुन्हा एकदा भाकित करीत आहे. जागतिक महायुद्धाच्या संकटात जगातील राष्ट्रांना ढकलण्यामध्ये जर या ज्यू-धनिकांना आणि भांडवलदारांना यश आले, जर जगाचे बोल्शेविकीकरण होणार नाही तर जगाच्या पाठीवरून ज्यू-जमातीचे निर्मूलन मात्र होईल." हिटलरने आपली ही भविष्यवाणी भयानक प्रकारे खरी करून दाखविल्याचे इतिहास सांगतो. लक्षावधी ज्यू–जनतेची त्याने क्रूर हत्या घडवून आणली.

● ● ●

हिटलरच्या कल्पनेमध्ये संपूर्ण जगावर राज्य करण्यासाठीच केवळ त्याचा जन्म झाला होता. परंतु हुकूमशहा म्हणून नव्हे, तर ख्रिस्त आणि मोहम्मद यांच्यासारखा तारक पुरुष म्हणून ! ११ डिसेम्बर १९४९ रोजी राईशटॅग-समोर त्याने जे भाषण केले त्यात ही कल्पना स्पष्ट दिसते. तो म्हणाला की, "पुढील हजार वर्षांचा जगाचा इतिहास व जगाचे भवितव्य ठरविण्याकरिता जगन्निर्मात्याने माझी नियुक्ती केली आहे आणि त्यासाठी मी त्याचा फार ऋणी आहे ....... जर्मनीच्या नेतृत्वाची जबाबदारी माझ्यावर असून हे नेतृत्व केवळ जर्मनीचेच भवितव्य ठरविणार नसून ते अखिल जगाचे भवितव्य ठरविणार आहे." एक–एक प्रेषित हजार वर्षे भूतलावर राज्य करतो ही कल्पना जुन्या झोरोस्टर (इराणी) धर्माची. प्रेषिताने दिलेली मूल्ये व कायदे एक हजार वर्षेपर्यंत पृथ्वीतलावरील मानवजातीच्या जीवनाचे मार्गदर्शन करतात आणि ही हजार वर्षे संपली की नवा प्रेषित नवी मूल्ये व नवा जीवनमार्ग मानवजातीला देतो अशी ही कल्पना. हिटलरवर ह्या कल्पनेचा फार मोठा पगडा होता. तो स्वतःला धार्मिक जातीचा प्रेषित मानीत होता. ओएशनर यांनी सांगितलेली एक हकिकत याच संदर्भात मोठी देण्यासारखी आहे. "पुढील पिढीतील लोकांना योग्य पार्श्वभूमीवर आपले स्मरण करता यावे म्हणून हिटलरने स्वतःचे एक भव्य तैलचित्र तयार करून घेतले होते व त्याच्या अनेक प्रती काढल्या होत्या. फिडूस नावाच्या चित्रकाराची ह्या खास कामावर नेमणूक करण्यात आली होती. प्रत्येक घर, शाळा, सार्वजनिक उपयोगाच्या जागा या ठिकाणी ठळक जागी, सर्वांना दिसेल अशा प्रकारे हे तैलचित्र लावण्यात यावयाचे होते. चित्रामध्ये हिटलर एका टेकडीवर उभा असल्याचे दाखविलेले होते व त्याच्या मुखाभोवती देवादिकांच्या असते तसे प्रभावलय दाखविण्यात आले होते." हिटलरची आत्म-प्रीती किती तीव्र प्रकारची होती हे यावरून दिसून येते. (आपल्याकडीलही किती तरी हिटलर–वारसांनी आपले 'फोटो' छापून ते जनतेत वाटण्याचा उपक्रम केलेला आहे. कॅलेंडरे छापली आहेत, साधे 'फोटो' छापले आहेत. हा उपक्रम हास्यास्पद असला तरी अपक्व आणि रानटी मनावर त्याचा फार मोठा प्रभाव पडतो.) हिटलरच्या स्वतःच्या कल्पनेमध्ये तो परमेश्वराइतकाच अस्खलनीय होता. आपल्या हातून चूक घडूच शकणार नाही असा त्याचा ठाम विश्वास होता. एकदा तर तो कुणावर तरी डाफरला की, "मी चूक कधी करूच शकत नाही. मी जे-जे बोलतो आणि जे-जे करतो तो सगळा इतिहास असतो." हिटलरच्या या समजुती-वर गोअरिंगसारख्यांचा देखिल विश्वास होता. गोअरिंगच्या मते 'राजकीय आणि सामाजिक प्रश्नांच्या बाबतीत हिटलर कधीही चूक करीत नाही.' ह्या अपूर्व

इसमामध्ये अशी काही अद्भुत 'गूढ शक्ती आहे की जिच्यामुळे तो ह्या गोष्टी करू शकत असावा.' तो लिहितो,

हिटलरला मधूनमधून संतापाचे तीव्र झटके येत असत. मात्र कधी-कधी संतापाचे तो ढोंगही करीत असावा. कारण त्याचा अंतस्थ नकली हेतू साध्य करावयास ते ढोंग उपयोगी पडत असे. ह्या खऱ्या वा नकली संतापाच्या प्रसंगी तो कसा वागत असे ह्याचे वर्णन राउशनिंगनी लिहून ठेविले आहे. राउशनिंग लिहितात की, "एखादे लाडावलेले पोर व उन्माद झालेली बाई जसे वागतील तसे ह्या प्रसंगी त्याचे वर्तन असे." अशा वेळी तो मोठमोठ्याने चिरक्या आवाजात दमबाजी करी, चूक करणाराची खरडपट्टी काढी; पाय आपटी; मुठी जोरजोराने टेबलावर किंवा भींतीवर आपटी. हैडेनने लिहून ठेवले आहे की आपल्या तारुण्यातही हिटलर असाच वागत असे. १९०५ साली मुनिक येथे एका खाजगी कलाशाळेत शिकतानाच्या त्याच्या सहाध्यायांच्या काही आठवणी हैडेनने जमा केल्या आहेत. हैडेन लिहितो की, "हिडलरच्या सहाध्यायांच्या म्हणण्याप्रमाणे हिटलर हा मितभाषी, अबोल, कुणात फारसा न मिसळणारा, जवळजवळ बुजरा असा मुलगा होता. परंतु कधी-कधी अकस्मात तो अगदी बेफाम बनत असे. अशा प्रसंगी तो फारच दंगल व गडबड करी. . शब्दांपेक्षा हातवाऱ्यांनीच आपले म्हणणे सांगायची त्याची सवय होती. अशा वेळी त्याच्या मानेच्या व डोक्याच्या ज्या झटकेबाज, तिरकस, रागीट हालचाली होत त्या मोठ्या पाहाण्यासारख्या असत ..व्हिएन्नामधील त्याच्या एकेकाळच्या सहाध्यायांना हीच त्याची वैशिष्ट्ये कित्येक वर्षानंतरही त्याच्यात आढळून आली. हिटलर-विषयीची आठवण सांगताना व्हिएन्नातील एका गृहस्थाने तर असे विधान केले की हिटलर बोलताना समोरच्या इसमाच्या नजरेशी नजर कधी भिडवित नाही. अपवाद फक्त बोलताना त्याची तंद्री लागत असे तेव्हाचा. अशा वेळी समोरच्या इसमाकडे रोखून पाहत बोलण्याची त्याची सवय होती. मग तो आपला नेहमीचा बुजरेपणा संपूर्णपणे विसरत असे. विशेषत: राजकारणाच्या विषयावर बोलत असताना हिटलरचे असे नेहमीच घडत असे."

हिटलरला दीर्घ भाषणे करण्याची वाईट खोड होती व ही गोष्ट जगजाहीर होती. समोर आपले भाषण ऐकावयास किती मनुष्ये हजर आहेत याचे त्यावेळी त्याला भान नसे. समोर फक्त दोनच श्रोते असले तरीही तो दीर्घ भाषण करी. त्याचे भाषण हे एक प्रकारचे स्वगतच असे. कित्येकदा तर हिटलरचे भाषण इतके लांबे की श्रोत्याला स्वत:चे म्हणणे न सांगताच हिटलरची रजा घ्यावी लागे. अगदी दोन जरी मनुष्ये समोर असली तरी प्रचंड मेळाव्यासमोर भाषण करावे तशा थाटात

तो बोलत राही. हे तो चार भींतीआड बोलत असे तेव्हाचे वर्णन आहे. परंतु जनतेच्या प्रचंड मेळाव्यासमोर जनतेला भूल घालण्यासाठी जेव्हा तो बोलत असे तेव्हाही अहंगंडाच्या तंद्रीतच तो बोलत असे. अहंगंडाच्या भरात स्वत:ला विसरून जाण्याची जन्मजात सवय हिटलरला असावी. तो महाआत्मकेंद्रित होता. स्वत:तच स्वत:ला हरवून बसण्याच्या सवयीमुळे बालपणी हिटलरच्या मोहोल्ल्यातील मुले 'भ्रमिष्ट' म्हणून त्याला कसे चिडवीत याचे वर्णन हिटलरच्या एका बालमित्राने केलेले आहे. लांबलाब प्रवचने देण्याची सवय बालपणापासून त्याला होती. समोर कोणी नसले तरी संथा देण्याचे त्याचे काम अडत नसे. श्रोता असो नसो, तो आपल्या 'तारेत' बोलत राही. त्याच्या गावाशेजारी फिडल नावाची एक छोटी टेकडी होती. तीवर चढून जाण्याची त्याला आवड होती. टेकडीवर चढून समोर उपस्थित नसलेल्या सभेसाठी तो भाषणे देत असे. हे तो दिवसाच करीत असे असे नव्हे, तर चांदण्या रात्रीचाही त्याचा ह्या कार्यक्रम असे."

भावोत्कट प्रसंगी हुंदके देऊन रडण्याची हिटलरला सवय होती. ज्यांच्यावर त्याला वर्चस्व गाजवायचे असे त्यांना आत्महत्येचा धाक घालण्याचीही त्याला सवय होती; आयुष्यात काही वेळा तरी आत्महत्येचा विचार अधिक गंभीरपणे त्याने केला असण्याची शक्यता आहे. बाल्डुर फॉं शिराख ह्यांनी आपल्या आत्मचरित्रात लिहिले आहे की १९३२ च्या राजकीय पराभवानंतर अनेक दिवस हिटलर आत्महत्येचा विचार करीत होता.

वॉर्ड प्राईस ह्या इंग्रज वृत्तपत्रकाराच्या म्हणण्याप्रमाणे, "राजकीय जीवनात मी नेहमीच भाग्यवान ठरलो आहे. परंतु खाजगी जीवनात माझ्याइतका दुर्दैवी दुसरा कुणीही नसेल" असे हिटलर आपल्या एका मित्राला बोलला होता.

हिटलर स्वत:च्या खाजगी आयुष्याबद्दल नेहमी मौन पाळीत असे. त्यामुळे ह्या प्रसंगी खाजगी आयुष्याविषयी बोलताना त्याच्या मनात काय होते हे आपणाला नेमके सांगता येण्यासारखे नाही.



लैंगिकतेच्या बाबतीत हिटलरचा दृष्टिकोन कसा होता ? ह्या बाबतीतील हिटलरचा दृष्टिकोन काहीसा विचित्र होता. स्त्रियांच्या संगतीत तो अस्वस्थ बनत असे, असे अनेक लोकांच्या पाहण्यात आहे. त्याच्या तरुणपणापासूनच तो असा वागत होता. व्हिएन्नात असताना हिटलर कुबिझेक नावाच्या गृहस्थांवरोबर



अनुक्रमणिका

राहत असे. त्यांनीही हिटलरविषयी बरीच माहिती लिहून ठेविली आहे. ते म्हणतात की "स्त्रियांच्या बाबतीत हिटलर उदासीन असे." कुबिझेक हिटलरच्या "संन्यस्तवृत्ती"चेही वर्णन करतात, रात्रीच्या रात्री त्यांच्या गप्पा चालत. त्यात लैंगिकता, विवाह, प्रीती यासारखे विषय येत." अनेकदा बोलताना हिटलर म्हणे की "कामशक्ती ही जीवनाची ज्योत" आहे. ती "पवित्र व निष्कलंक ठेविली पाहिजे" सोळाव्या वर्षापासून तो वीस वर्षांचा होईपर्यंत स्टेफानी नावाच्या एका मुलीवर तो प्रेम करीत होता. हे प्रेम मात्र एकतर्फी होते. कारण हिटलर एकदाही त्या मुलीशी बोलला नव्हता. तरी हिटलरची मात्र खात्री होती की तो तिला लग्नाची मागणी घालावयास येईपर्यंत ती मुलगी त्याची वाट पाहात थांबून राहील. "तो प्राणप्रिय जीव जणू काही त्याला पूर्ण वश होता अशा थाटात आपल्या पुढील आयुष्याची आखणी त्याने केली होती. ती मुलगी जरी ह्या भूतलावरीलच होती तरी हिटलर मात्र तिला प्रत्यक्षपणे एकदाही भेटला नव्हता. त्यामुळे ही मुलगी जरी हाडामांसाची व्यक्ती होती तरी हिटलरच्या आयुष्यातील तिचे स्थान स्वप्नसुंदरीचे होते. हिटलर तिला प्रत्यक्षात कधी भेटत नसल्याने आपल्या योजना, इच्छा, संकल्प यांचा वर्षाव मनमोकळेपणाने तिच्यावर करू शके. हिटलरच्या या अपूर्वप्रेमप्रकरणाचा एक उपयुक्त फायदा हिटलरच्या स्वभाव घडण्याच्या दृष्टीने हिटलरला मिळाला होता. काल्पनिक का होईना परंतु प्रेमदेवतेच्या प्रभावाखाली वावरत राहिलेला हिटलर स्खलनशील वयातही शेवटपर्यंत सोप्या मार्गावर राहिला. तसेच तिच्या ध्यासामुळे त्याची इच्छाशक्ती एकाग्र बनली."

मे १९१३ त हिटलरने व्हिएन्ना सोडले व तो म्युनिकला आला. या ठिकाणचा त्याचा खोली-मित्र एक अतिशय रंगेल प्राणी होता. त्याला अनेक मैत्रिणी असत त्यातील एकीस हिटलरच्या गळ्यात अडकविण्याचा त्याचा बेत होता. हिटलरला जेव्हा त्याच्या ह्या कपटी बेताची दाद लागली तेव्हा तो त्या मित्रावर इतका गरम झाला की त्याचा तो भयंकर अवतार पाहून तो मित्रही गर्भगळीत झाला. प्रथम असा बेत हिटलरच्या बाबतीत आखल्याबद्दल हिटलरने त्याची चांगली खरडपट्टी काढली. हिटलर त्याला म्हणाला की तरुण मुलींच्या जीवनाशी असा प्रकारचे खेळ खेळू नयेत. त्यांना हा खेळ आहे हे उमजत नाही. त्या पुरुषांवर मनापासून विश्वास ठेवतात व आयुष्याच्या दुःखी बनतात.

सर्वसामान्य मनुष्यापेक्षा लैंगिक बाबतीत कुठल्या दृष्टीने हिटलर वेगळा होता? "...त्याच्या भाषणात आणि लिखाणात तो मृत्यू, वध, हत्या, विशेषतः मृत्युदंड अशा गोष्टींवर अतिशय भर देताना दिसतो. हानिश नावाचा त्याचा एक

मित्र सांगतो की वडिलांबरोबर अप्पर ऑस्ट्रियातील एका न्यायालयात आपण एकदा गेल्याची हकिकत हिटलर सांगत असे. ह्या ठिकाणी त्याच्या वडिलांनी त्याला खुनाची विविध प्रकारची आयुधे दाखविली होती. भांडणारे शेतकरी किंवा खरेखुरे गुन्हेगार ह्यांच्याकडून पोलिसांनी ती शस्त्रे हस्तगत केली होती. त्यात पिस्तुले होती, सुरे होते, लोखंडी कांबी होत्या. हिटलर हानिशला बोलला की ती शस्त्रे पाहून तो कमालीचा रोमांचित झाला होता. याच संदर्भात दुसरीही एक आठवण सांगण्यासारखी आहे. हिटलर-पर्वाच्या आरंभीच्या हिटलर-पक्षाने प्रॉमिसरी नोटा छापल्या होत्या. या प्रॉमिसरी नोटा पक्षासाठी कर्ज उभारण्यासाठी छापलेल्या होत्या. नोट किंवा कर्जरोखा ही पैसा मिळाल्याची पावती होती. ह्या कर्जरोख्यावर जी नक्षी छापलेली होती तिचा नमुना खुद्द हिटलरने तयार केला होता. हा नमुनादेखिल हिटलरच्या स्त्रीविषयक दृष्टीकोनावर प्रकाश पाडतो. ह्या नक्षीच्या डाव्या कोपऱ्यात मनुष्यशरीराचे चित्र होते हे चित्रही मोठे नमुनेदार होते. चित्रांत उघडया गळयाचा शर्ट घातलेला तरुण दाखविलेला होता त्याच्या मस्तकावर शिरस्त्राणासारखे काहीतरी होते. कारण ते स्पष्ट दिसत नव्हते. चित्रातील तरुणाला मिशा नव्हत्या तरी एकूण उग्र-गंभीर चेहऱ्यावरून तो चेहरा हिटलरचाच आदर्श चेहरा असावा असा कयास करता येतो. तरुणाने आपल्या उजव्या हातात मोकळी तलवार धारण केली होती. डाव्या हातात स्त्रीचे छाटलेले मुंडके केसांना धरून लोंबकळत होते. . . . . पाठीमागे स्वस्तिकांकित निशाण फडकत होते. निशाणावर फक्त पाचच शब्द कोरलेले होते. –– " सत्याच्या लढवय्यानो असत्याचा शिरच्छेद करा. सत्याच्या लढवय्यांकडून असत्याच्या भेदाची अपेक्षा असते. असत्याच्या शिरच्छेदाची नव्हे. असत्याबरोबरच्या लढयाची अपेक्षा असते. असत्याच्या वधाची नव्हे. अबलेचा शिरच्छेद, मग तो प्रतीकात्मक का असेना, वीराचे कर्तव्य नव्हे. पण कलावंत हिटलरला प्रतीक सुचले ते "अबलेच्या वधाचे, निःशस्त्र अबलेच्या शिरच्छेदाचे." हिटलरची परपीडक वृत्ती त्या प्रतीकातून प्रकट होत होती.

हिटलरची वृत्ती परपीडकाची होती असे सर्वसाधारण मत आहे. परंतु काहीं लोक असेही म्हणतात की हिटलर मनाचा फार कोमल होता व आपला हा कोमलपणा जगापासून लपविण्यासाठी आणि आपण फार कठोर आहोत असा आपला दरारा जगात निर्माण करण्यासाठी तो क्रूर वागत होता. क्रूरपणा हा त्याने स्वतःचा दुबळेपणा स्वतःपासून व इतरांपासून लपविण्यासाठी घेतलेला मुखवटा होता. हेडेन हा हिटलरचा एक चरित्रकार हिटलरविषयी लिहितो की खाजगी जीवनामध्ये क्रूर असण्याऐवजी हिटलर भावविवशच अधिक होता. आपल्या

मनाच्या पुष्टीकरिता हैडेनने हिटलरचे त्याच्या पुतणीबरोबरचे संबंध वर्णिले आहेत. हिटलरच्या ह्या पुतणीचे नाव गेली. ती अप्रतिम रूपवती होती. हिटलर तिच्या प्रेमात पडला होता. सप्टेंबर १९३१ मध्ये तिने आत्महत्त्या केली.[1] हैडेन लिहितो की, " १९२९ सालच्या आरंभालाच हिटलरने ह्या तरुण मुलीस एक प्रेमपत्र पाठविले होते. त्या पत्राची भाषा इतकी उघड होती की ते लिहिणाऱ्या मनुष्याच्या मनाच्या स्थितीविषयी सामान्य मनुष्यालाही शंका राहू नये. काका-प्रियकराचे हे पत्र हिटलरच्या मनाची खरी अवस्था स्पष्ट दर्शविते. त्यात आलेली प्रतीके-प्रतिमा, आत्मपीडक-परपीडकवृत्ती आणि दुर्गंधीविषयीची ओढ स्पष्टपणे दाखवितात." हिटलरने पुतणीस लिहिलेले हे पत्र पत्रमालकिणीस कधीच पोचले नाही. हिटलरने ते पत्र तिला मिळावे अशा बेताने घरातच उघड्यावर एका जागी ठेवून दिले होते. ते पत्र पत्रमालकीणीच्या हाती न पडता घरमालकिणीच्या मुलाच्या हाती पडले. त्याने ते पत्र स्वत:पाशी ठेवले. हैडिनच्या म्हणण्याप्रमाणे हिटलरच्या सार्वजनिक अब्रूला धक्का लागू नये म्हणून हिटलरच्या काही मित्रांनी मोठ्या किमतीस त्याच्यापासून पुढे ते विकत घेतले.

काही लोक हिटलरला क्रूर व हृदयशून्य मानीत नाहीत. तर काही त्याला नृशंस आणि क्रूर मानतात. राउशनिंग हिटलरसंबंधी लिहितात की, " हिटलरची मूलभूत धारणा परपीडकाचीच होती. शारीरिक पीडा पाहिल्यानंतर त्याच्या कामवृत्ती उत्तेजित होत असत. रोमन इतिहासातील त्याच्या आवडीचा पुरुष सुल्ला. सुल्ला हा दडपशाहीचा पुरस्कर्ता अमानुष व अकारण जनताकत्तली-साठी कुप्रसिद्ध असलेला पुरुष होता."

" हिटलरच्या सभोवतालचे मानसिक वातावरण विकृत कामव्यवहाराच्या हवेने दूषित झालेले होते. हिटलरच्या भोवताली काहीही नैसर्गिक नाही. तेथील सर्व काही खोटे, चोरटे, विकृत, अनैसर्गिक गुप्त व्यवहारानी भरलेले आहे. चोरटे अनैसर्गिक प्रणयसंबंध, विकृत कामोपभोग, खोट्या भावना, खोटी प्रतिके, वासना लंपटता हाच तेथील मुख्यव्यवहार आहे. नैसर्गिक प्रवृत्तींचा उत्स्फूर्तपणा तेथे नावालाही दिसत नाही. „

• • • • •

---

१ असे म्हणतात की हिटलरचे प्रेम गेलीवर असले तरी खुद्द तिचे प्रेम तिसऱ्याच कुणा तरुणावर होते. ते प्रेम सफल होऊ नये म्हणून हिटलरने तिला कडोपहाऱ्यात ठेविले होते. व त्या जाचाला कंटाळून तिने आत्महत्त्या केली..

हिटलरच्या वापराची स्वत:ची अशी खाजगी वापराची खास खोली होती. तीत चारी बाजूस नग्न स्त्रियांची चित्रे लटकत असत. अर्थात या प्रकारची चित्रे कलात्मक षोकासाठी कुणी वापरीत नसतो. त्यांचे आकर्षणही कलात्मक नसते. अशा प्रकारच्या नग्न चित्रांमध्ये हिटलरला फारच रस होता. नग्न स्त्रियांची चित्रे स्वत:च्या अंतर्गृहात टांगण्यात हिटलर खुद्द स्वत:ची विकृत आवड दाखवीत होता की फ्रेडरिख द ग्रेटची अंध नक्कल करीत होता ? नक्की सांगता येणार नाही. स्त्रियांच्या बाबतीत फ्रेडरिख अतिशय सिनिक होता. हिटलरचे सैनिक प्राग शहरावर मोर्चे आवळीत होते तेव्हा हिटलर नर्तकीना प्रेम अदा करण्यात व्यग्र होता पण प्रेम अदा करावे असाच त्याचा खरोखर हेतू होता काय ? की जगाला फसविण्यासाठी त्याने ते सोंग आणले होते ? जर्मन सैनिक हल्ल्यामध्ये गुंतले असताना आपण प्रेमप्रकरणात गुंतलो होतो, आपणाला राजकारणात काय घडत होते त्याची जाणीव नव्हती असे तर जगाला भासविण्याचा त्याचा तो प्रयत्न नव्हता ? असल्या राजकीय लांड्यालबाड्यातही तो फ्रेडरिखचीच नक्कल करीत होता किंवा काय ? सॅक्सोनीवरील चढाईच्या वेळी फ्रेडरिख नेमकी अशीच खेळी खेळला होता."

"प्रशियाचा दुसरा फ्रेडरिख हा हिटलरचा आदर्श पुरुष होता. हिटलर त्याला स्फूर्तिदात्याच्या ठिकाणी मानीत असे; स्वत:ला त्याचा वारस समजत असे."

हिटलर समलिंगीसंभोगी होता काय ? ह्या बाबतीत ओएशनेरने असे लिहून ठेविले आहे की, "हिटलरला या प्रकारची विकृत खोड होती असा जो पुरावा उपलब्ध आहे तो सर्व ऐकीव स्वरूपाचा आहे. मात्र त्याचा उगम विश्वासार्ह आहे. या माहितगारांच्या म्हणण्याप्रमाणे हिटलर अधूनमधून अशा संबंधात भाग घेई विशेषत: पहिल्या महायुद्धानंतर राजकीय क्षेत्रात जेव्हा तो उतरला तेव्हा तो अशा प्रकारच्या लैंगिक संबंधात गुंतलेला होता व तो active पुरुष-समसंभोगी होता. ह्या संदर्भात अर्न्स्ट रोहेम व रुडॉल्फ हेस ह्या दोघांची नावे त्याचे साथीदार म्हणून घेतली जातात. .... १९३४ सालच्या रक्तशुद्धीकरणाच्या मोहिमेत रोहेमचा वध करण्यात आला. रोहेमच्या वधाला हिटलरबरोबरील त्याचे वरील विकृत संबंध किती कारणीभूत होते हे कधीच बाहेर पडले नाही. स्त्रियांच्या बाबतीत हिटलर फार लाजाळू व बुजरा होता व शेवटपर्यंत तो तसाच राहिला फक्त एकट्या इव्हा ब्रॉनशी काय ते तो अधिक जवळिकेचे संबंध प्रस्थापित करू शकला. वास्तविक हिटलर तेव्हा सत्तेवर होता. सुंदर स्त्रियांची शिकार करण्याच्या मुबलक संधी त्याला उपलब्ध होत्या. परंतु जुजबी आस्थ-पलीकडे अधिक आस्था स्त्रियांच्या बाबतीत त्याने कधीही दाखविली नाही. इव्हा

ब्रॉनशी त्याचे संबंध काहीही असोत, परंतु हिटलरच्या बाबतीतील वैद्यकीय मत असे आहे की हिटलरच्या स्वभावात समसंभोगकारक लक्षणे बऱ्याच मोठ्या प्रमाणात असून शेवटपर्यंत ती तशीच कायम होती. ह्याचा पुरावा म्हणून हिटलरच्या खाजगी संभाषणांचा निर्देश करण्यात येतो. एखाद्या अबोध प्रेरणेने पुढे ढकलावे त्याप्रमाणे प्रत्येक संभाषणात समसंभोगाचा विषय येनकेनप्रकारेण तो आणीतच असे. हा विषय कधी अगदी निरुपद्रवी भासणाऱ्या कुतूहलजनक प्रश्नाच्या स्वरूपाचा असे. परंतु जे जाणकार असत त्यांना त्यामागील हिटलरच्या मनाचा सतत ध्यास तत्काळ कळून येई."

हिटलरला ही वाईट खोड होती ह्या संदर्भात ओएशनेरने पुढील माहिती दिली आहे. ह्या विषयाच्या एकूण संदर्भात ही माहिती अर्थपूर्ण वाटते. हिटलरच्या चॅन्सेलरी-गृहात "चौदा अप्रतिम सुंदर असे गालिचे होते. ह्या सर्वांची निवड खास हिटलरची होती व ह्या चौदांपैकी दहांवर घोड्याचा विषय रंगविलेला होता. कधी शिकार-पाठलागाच्या स्वरूपात, तरी कधी युद्धघुमश्चक्रीच्या स्वरूपात; परंतु घोडा ही त्यातील मध्यवर्ती कल्पना होती.

"ह्यातील प्रत्येक घोडा हा नरअश्व ( stallion ) आहे. नर ही हिटलरची ध्यास-वस्तू (fetish) होती. त्याला पाळीव प्राणी आवडत. परंतु फक्त नरच. तसेच ते शक्तिवान प्राणी असावे लागत. कॅस्टर व वुल्फ नावाचे त्याचे धनगरी जातीचे दोन कुत्रे होते युद्धमोहिमेच्या वेळीही हे त्याचे कुत्रे त्याच्याबरोबर असत. एखादा गालिचा वा छायाचित्रात प्राण्याचे चित्र आहे व लिंगभेद दर्शविणारे त्याचे अवयव झाकलेले आहेत, तर तो तज्ज्ञांकडून त्या प्राण्याचे लिंग निश्चित करून घेई. त्या प्राण्याच्या नाकपुड्या, त्याची आयाळ, त्याचे स्नायू किंवा अस्थिघडण यांच्या निरीक्षणातून ही पाहणी तो करून घेई. अश्वप्रेमिक असा कोणी इसम त्याच्याकडे आला तर त्याचा पहिला प्रश्न घोड्यासंबंधी असे. अशा वेळी सहज बोलावे तसे तो त्या इसमाला म्हणे की, "काय हो तुम्ही ह्या विषयातले दर्दी आहात; मग ह्या वळू-अश्वासंबंधी तुम्हाला काय म्हणायचे आहे? ह्या प्रश्नावर पाहुणा जर सावधगिरी म्हणून म्हणाला की, 'चित्रावरून तरी हा घोडा आहे की घोडी हे सांगता येत नाही;' तर लगेच हिटलर एखाद्या अश्वतज्ज्ञाच्या पवित्र्यात त्याला सांगे की, 'अहो हा वळू आहे. तुम्हाला तर घोड्यासंबंधी काहीच कळत नाही.' मग निरनिराळी लक्षणे दाखवून हिटलर त्याची आपल्या मताविषयी खात्री पटवून देत असे."

हिटलरला लैंगिक बाबतीत वाईट खोडी होती असे म्हटले की हिटलर-अभिमानी हिटलर व इव्हा ब्रॉनच्या संबंधांकडे बोट दाखवितात. ते म्हणतात

की आपल्या अखेरच्या क्षणी हिटलरने इव्हा ब्रॉनशी विवाह केला होता मग ह्या विवाहाचे काय ?

(निदान दहा ते बारा वर्षे तरी) इव्हा ब्रॉन व हिटलर एकत्र राहात होती नि त्यांचे संबंध अति जवळिकीचे होते. ट्रेव्हार-रोपर हिटलरच्या तिच्या-विषयीच्या भावनासंबंधी लिहितात की, २० जुलै १९४४ चा हिटलरच्या वधाचा कट उघडकीस आल्यानंतर "अखिल मानवजातीविषयी त्याला वाटणारा तिटकारा उत्तरोत्तर वाढत गेला असला तरी. . . इव्हा ब्रॉनविषयी मात्र त्याचे प्रेम वाढत गेले. हिटलरच्या दृष्टीने संपूर्ण जग विश्वासघातकी होते. एकटी इव्हा त्याला अपवाद होती. दुसरा अपवाद ब्लाँदी[1] नावाच्या त्याच्या कुत्र्याचा. हिटलरच्या मते एवढे दोन जीव काय ते त्याच्याशी एकनिष्ठ होते. तो वारंवार बोलून दाखवी, जीवनात त्याला फक्त एकच विश्वासू साथी असून हाच तेवढा त्याचा साथी शेवटपर्यंत त्याच्याशी एकनिष्ठ राहील. हा साथी म्हणजे इव्हा ब्रॉन . ...हिटलरची तिच्यावर उत्कट प्रीती होती व ही त्याची प्रीती कधीही कमी झाली नाही, जनतेचे मत आकृष्ट करून घेण्यासाठी व सार्वजनिक प्रतिमा तयार करण्याच्या हेतूने अनेक नटयांबरोबर जरी हिटलरचे फोटो वेळीअवेळी घेतले जात; तरी तशा प्रकारच्या स्त्रियांत हिटलरने कधीही रस दाखविला नाही. हिटलरचे स्त्रियांबरोबरचे संबंध याविषयी फक्त एक मत देता येईल. ते हे की हिटलर स्त्रियांना फार बिचकत असे. त्याला राजकारणात स्त्रियांनी केलेली ढवळाढवळ नको होती. जनानी राजकारणाला तो घाबरून होता.

---

१. हिटलरचा कुत्रा ब्लाँदी=ट्रेव्हार–रोपरनी गोबेल्सच्या दैनंदिनीवरून ( १० सप्टेंबर १९३६ ) ब्लाँदीविषयक हिटलरच्या भावनांची काही माहिती दिली आहे. गोबेल्सने दैनंदिनीत लिहून ठेविले आहे की, "ब्लाँदी ही फ्युरेरची आवडती व एकनिष्ठ कुत्री. फ्युरेर तिच्याबरोबर खूप गंमती करतो. ह्या प्राण्याने फ्युरेरला इतका लळा लावावा व फ्युरेरशी इतके एकरूप व्हावे ही आश्चर्याची गोष्ट आहे. बरे झाले निदान एक तरी सजीव प्राणी सतत फ्युरेरच्या संगतीत असतो." गोबेल्सच्या दैनंदिनीतील दुसरी नोंद २० मार्च १९४२ ची आहे. ह्यात त्याने लिहिले आहे की, " फ्युरेरला कोणीतरी एक कुत्र्याचे पिल्लू दिले आहे. आख्खा दिवस ते त्याच्या खोलीत धुडगूस घालीत असते. फ्यूररचे त्याच्यावर खूप प्रेम आहे. त्याच्या खोलीत त्याला वाटेल ते करू दिले जाते. निदान आज तरी इतर कुणाहिपेक्षा ते फ्यूररला जवळचे आहे."

( पुढील पानावर पाहा )



अनुक्रमणिका

हिटलरच्या लैंगिक विकृतीच्या संबंधात हेन्रिख हॉफमन ह्या छायाचित्रकाराने ही काही माहिती दिली आहे. इव्हाची हिटलरबरोबर ओळख त्यानेच करून दिली होती. इव्हा हॉफमनबरोबर काम करीत असे. हॉफमन म्हणतो की इव्हाला हिटलरचे वेड लागले होते. हिटलरचे चार प्रेमाचे शब्द व दोन पुष्पगुच्छ ह्यांनी तिचे डोके पार बिघडून गेले होते. तिला वाटे की ते गोड शब्द नि कधी-मधी दिली गेलेली फुले हे हिटलरच्या प्रेमाचे प्रतीक आहे. "हिटलरविषयी भावनोत्कटतेने बोलताना एकदा तिला मी ऐकले नि मी तिला म्हणालो देखील की, "इव्हा, मला थापा मारू नकोस. हिटलरनि तुझ्यात गेल्या रात्री विशेष काही घडलेले नाही आणि इतरही कुठल्या रात्री तसे घडलेले नाही. मी हिटलरला तुझ्यापेक्षा अधिक ओळखतो."

---

( मागील पानावरून )
याच संदर्भात फर्डिनांड सॉएरब्रुख ह्या शल्यकर्मविशारदानें लिहून ठेविलेली हकिकतही देता येण्यासारखी आहे. (A surgeons Life, १९५३, पृ. २४३.) १९४२ मध्ये हिटलरला भेटावयास तो हिटलरकडे गेला होता. हिटलरची वाट पाहत बाहेरच्या प्रतीक्षाकमऱ्यात बसला असताना अकस्मात एक गलेलठ्ठ कुत्रा दात विचकीत व गुरगुरत त्याच्या अंगावर आला सॉएरब्रुखला कुत्र्याची माहिती असल्याने त्याने त्याला चुचकारले, त्याच्या मानेखाली खाजविले, त्याच्याशी तो बोलला व अशा प्रकारे त्याने त्याला शांत केले. तेवढ्या थोड्या वेळात सॉएरब्रुखने त्या कुत्र्याशी इतकी मैत्री केली की आपले पुढील दोन पजे सॉएरब्रुखच्या मांडावर टेकवून तो कुत्रा त्याच्याकडून थोपटण्याची वाट पाहू लागला. इतक्यात हिटलर आत आला. आपले लाडके कुत्रे एका परक्या इसमाच्या इतके आहारी गेलेले पाहुन हिटलरचा राग इतका अनावार झाला की पहिले काही क्षण रागामुळे त्याच्या तोंडातून शब्दच फुटेना ! नंतर तो एकदम ओरडू लागला. त्याच्या मुठी वळलेल्या होत्या नि डोळे संतापाने नुसते पेटत होते. तो म्हणत होता.

"काय, काय केलेस तू माझ्या कुत्र्याला ? कसे तू त्याला फितवलेस?"

यावर काय बोलावे तेच मला समजेना. कुत्रा माझे हात चाटीतच होता. नि इकडे हिटलर तरसं तापाने व दुःखाने बेभान झालेला दिसत होता.

"एवढा एक जीव माझ्यावर एकनिष्ठ प्रेम करीत होता. त्यालाही तू माझ्यापासून दूर केलेस. आता त्याचा मला काहीही उपयोग नाही. त्याला आता गोळी घालून ठार करावयास हवे. तो एकटाच माझ्यापाशी येत असे. एकटाच माझे ऐकत असे."

" आपण ज्या अर्थाने विकृत ( abnormal ) हा शब्द वापरता त्या अर्थाने हिटलर विकृत नव्हता. तो आत्यंतिक लाजरा होता."

" इतरांसमोर आपले कपडे तो कधीच काढीत नसे. डॉक्टरना पण त्याला संपूर्ण नग्नावस्थेत केव्हा पाहिलेला नाही." [1]

हिटलरचा खाजगी डॉक्टर डॉ. मॉरेल ह्यानेही हिटलर-इव्हा संबंधांविषयी लिहून ठेविले आहे. तो लिहितो की " ती दोघे वेगवेगळ्या गादीवर झोपत. परंतु माझी अशी खात्री आहे... " हिटलर व इव्हा इतकी वर्षे एकत्रित राहत होती आणि तरीही विवाहपूर्तीचा प्रश्न त्यांच्या संबंधात उपस्थित व्हावा ही गोष्ट लक्षणीय आहे. डॉ. मॉरेल हिटलरविषयी पुढे लिहितो की, " हिटलरच्या शरीरामध्ये दोन मने वास करीत होती. त्यातील एक मन हिंसक, हृदयशून्य, क्रूर, निष्ठुर, आवेगी होते. तर दुसरे तितकेच दुबळे, भित्रे, साशंक, संशयी, स्त्रियांसमोर लाजाळू व अनिश्चयी होते.... हिटलर–इव्हा विवाहाची परिपूर्ती निश्चितपणे

---

१. हॉफमनने ही माहिती सिडने येथील ( Sun ) वार्तापत्राला ९ डिसेम्बर १९४५ ला दिली होती. हॉफमन आपल्या पुस्तकात लिहितो की इव्हा ब्रॉन हिटलरची प्रियतम मैत्रिण बनल्यानंतरही त्या दोघात शारीरिक जवळीक निर्माण झालेली नव्हती. इव्हा आपली जागा सोडून त्याच्या जागेत राहावयास गेली. फुरसतीच्या काळातील ती त्याची एकमेव सहचरी बनली. माझ्या माहितीप्रमाणे सर्व काही एवढ्यावरच संपत होते. परंतु पुढे पृष्ठ ६३ वर तो लिहितो की, " हिटलरच्या मृत्यूपूर्वी केव्हातरी इव्हा हिटलरची दयिता बनली यातही शंका नाही. परंतु ही घटना नेमकी केव्हा घडली हे मी किंवा दुसरा कुणीही सांगू शकणार नाही."

हिटलरविषयी हॉफमन आणखी लिहितो (पृ. १९५) की, " नागवेपणाची त्याला अत्यंत लाज वाटत असे. अर्थात कलेच्या बाबतीत नाही. ह्या ठिकाणी तो नग्नतेला प्रोत्साहन देत असे. परंतु स्वतःच्या व्यक्तित्वाच्या बाबतीत नग्नपणाला तो भारी बिचकत असे.... डॉ. मोरेल ह्यांनी मला सांगितले की फ्युरेर हा मोठा चमत्कारिक रुग्ण होता. तो आपल्या शरीराची नग्नावस्थेत कधीच पाहणी करू देत नाही. एवढेच नव्हे तर एक्स-रेसाठी त्याला तयार करणे ही गोष्टही अशक्य असे. अशा प्रसंगी हिटलर प्रथम आपल्या नोकराला एक्स-रे खोलीच्या बाहेर घालवून देत असे व मागाहून जेवढ्या शरीराच्या फोटोची गरज असे तेवढेच शरीर उघडे करीत असे."

घडून आली होती, परंतु त्यांच्या प्रेमजीवनाची मला अगदीच थोडी माहिती आहे."

• • •

डॉ. मॉरिल यांनी हिटलरकरिता जी औषधे वापरली त्यांची यादी उपलब्ध आहे. या औषधांमध्ये कामोद्दीपक औषधांचा भरणा आहे. याचा अर्थ असा होतो की हिटलरमध्ये कसली ना कसली लैंगिक कमतरता होती. हिटलरशी संबंध आलेल्या फेलिक्स कर्स्टन ह्या दुसऱ्या डॉक्टरनेही तेच मत दिले आहे. बर्लिनच्या नाझी पक्षातील अनेक नेते मंडळी डॉ. फेलिक्सचे रुग्ण होते. ह्या डॉक्टरनी आपल्या स्मृती प्रसिद्ध केल्या आहेत. (The Memoirs of Doctor Felix Kersten) त्यात ते लिहितात की हिटलरवर उपचार करावयास त्यांनी नकार दिला होता. हिटलरच्या रोगावर एकही औषध उपलब्ध नव्हते. कारण हिटलरचा रोग मानसिक होता शारीरिक नाही.

हिटलर–इव्हा प्रेमसंबंधाविषयी ट्रेव्हार–रोपर लिहितात की, "हिटलरचे तिच्यावर प्रेम होते हे निर्विवाद असल्याने त्यांच्या प्रेमाच्या बाबतीत प्रश्न उभा राहतो तो हा की इतका दीर्घ काळपर्यंत हिटलरने तिला अशा लटकत्या व स्त्रीच्या दृष्टीने निश्चितच शरमेच्या अवस्थेत का ठेविले ? हिटलर–इव्हा संबंधांचे गूढ जरी पुढेही रहस्यमच राहील तरी त्यासंबंधी एक उपपत्ती पुढे करता येण्या-सारखी आहे. मला वाटते की पत्नी न करण्यात अथवा प्रेयसी न स्वीकारण्यात आपण काहीतरी जगावेगळे वागत आहोत व आपण एक महामानव आहोत अशी बतावणी हिटलरला करायची असावी. हिटलर स्वतःला जर्मन जगदुद्धारक म्हणवून घेत होता. क्रांतिकारी महात्मा बोलून घेत होता. अशा वेळी सामान्य मनुष्यांच्या आयुष्यात असतात त्याच उणीवा त्याच्याही आयुष्यात असणे त्याच्या जगदुद्धारकाच्या भूमिकेशी विसंगत ठरणारे होते. मेसाया व जगदुद्धारक क्रांतिकारी पवित्र आत्मा शारीरिक प्रेमाच्या फंदात पडेलच कसा ? हिटलरला आपण हरएक बाबतीत अद्वितीय, अपूर्व पुरुष आहोत हे जगाच्या मनावर बिंबवायचे होते. म्हणून इव्हा ब्रॉनची प्रेयसी वा कांता ही भूमिका हिटलरच्या बाबतीत अडचणीची ठरली असती. मला वाटते की हिटलरच्या इव्हाबरोबरच्या संबंधाचे हे स्पष्टीकरण पटावयास हरकत नसावी. जर वर दिलेले स्पष्टीकरण खरे असेल तर मृत्यूपूर्वी एक रात्र आधी घडून आलेल्या इव्हा–हिटलर विवाहविधीला एक प्रतीकात्मक विधी ह्यावाचून दुसरा अर्थ नाही."







हिटलरची रोगपत्रिका हिमलरने डॉ. कर्स्टनना दाखविली होती. त्यात पहिल्या जागतिक युद्धात हिटलरला उपदंशाचा विकार जडला होता अशी नोंद त्यांना आढळून आली. "हिटलरच्या आरोग्यासंबंधीच्या कागदांवरून असे कळून आले की हिटलर अनेक वर्षे लैंगिक दृष्टया नपुंसक होता व स्त्रिशी तशा प्रकारचे संबंध ठेवावयास अपात्र बनला होता. त्याचप्रमाणे हिटलर समलिंगी संभोगवाला नव्हता असेही त्यात स्पष्टपणे लिहिलेले होते. त्यात आणखी असेही लिहिलेले होते की हिटलर जनसंमर्दासमोर जी उत्तेजक भाषणे देत असे त्यातून त्याला कामतृप्तीचे सुख मिळत असे. खुद्द हिटलरनेच अशा प्रकारची कबुली त्या डॉक्टर-पाशी दिली होती. हिमलरने कर्स्टनला असेही सांगितले की इव्हा ब्रानबरोबरचे हिटलरचे संबंध अशरीरी प्रेमाचे, आध्यात्मिक प्रकारचे होते. "इव्हा ही एक काम-अतृप्त व दयनीय अशी स्त्री होती."

हिमलरने कर्स्टनला हेही सांगितले की "हिटलरला घोडा हा प्राणी बिलकूल आवडत नसे. घोड्याचा त्याला कमालीचा तिटकारा होता हिटलरचा घोड्याविषयीचा तिटकारा हे एक मोठे गूढच होते."

" हिटलरला घोड्याचा तिटकार होता ही गोष्ट, वर आपण घोडा ही हिटलरची ध्यास-प्रतीकवस्तू ( fetish ) होती असे लिहिले आहे त्याच्याशी सकृद्दर्शनी तरी विसंगत दिसते. परंतु ज्या वस्तूचा वा व्यक्तिचा आपणास मना-पासून तिटकारा वाटतो त्याच व्यक्तिकडे वा वस्तूकडे आपले मन परतपरत ओढले जाते ही गोष्ट ध्यानात घेतल्यास हिटलरच्या अबोध वृत्तीचे आश्चर्य वाटावयास नको, हिटलरचे बोध मन घोडा या प्राण्याचा तीव्र द्वेष करीत होते परंतु त्याचे अबोध मन त्याच वेळी घोडा या विषयाकडे पुन्हा पुन्हा वळत होते. जाणिवेत तो जे टाळू पाहत होता तेच नेणीवेत त्याला आपणाकडे ओढीत होते. मानसशास्त्रात याला उभयभावीवर्तन असे म्हणतात. घोडा या प्राण्याचा आत्यंतिक द्वेष केल्या-मुळेच हिटलरचे मन घोड्याच्या प्रतीकात अडकून पडले होते.

युरोपमधील अमेरिकी गुप्तहेरखात्यानेही हिटलरच्या खाजगी आयुष्याची बारीक चौकशी केली होती. त्यात त्याना आढळून आले होते की, " हिटलरला इव्हा ब्रॉनपासून अपत्यप्राप्ती झाली नव्हती. दुसऱ्याही कुठल्या स्त्रीपासून याला अपत्यलाभ कधीं झाला नव्हता.

• • • • •

रॉम लँडो या पत्रकाराने हिटलरच्या चेहऱ्याचे वर्णन करून ठेविले आहे. तो लिहितो की "हिटलरच्या ओठांना सुंदर, रेखीव आणि संवेदनाक्षम बाह्यरेखा होती. परंतु पुरुष म्हणून त्याचे ओठ फारच नितळ होते. एखाद्या वयस्क, लग्न न झालेल्या स्त्रीलाच ते शोभले असते."

राउशनिंगने त्याच्या दिसण्याचे पुढील वर्णन केले आहे: "मागे वळलेले कपाळ, पुढे येणारे पातळ केस, ठेंगणी, विशेष छाप न टाकू शकणारी शरीराची ठेवण, शरीराचे अवयव काहीसे विशोभित व बेढब, रंगाच्या ब्रशसारख्या मोजक्याच मिशांचा पुंज, त्याच्याखाली भावनारहित चेहरा —हिटलरचे बाह्य दर्शन असे होते. त्याचे सगळे आकर्षण बहुधा त्याच्या हाताच्या सुंदर पंज्यात असावे. त्याच्या हाताचे पंजे अतिशय रेखीव, नाजूक व बोलके होते." हाताच्या संदर्भात ओगशनेरने असे लिहून ठेविले आहे की, "हाताच्या अभ्यासात हिटलरला फार आस्था असे. त्याला भेटणाऱ्या मनुष्यांची पारख तो त्यांच्या हाताच्या ठेवणीवरून करीत असे.... तो स्वतःच्या सुंदर हातांचा अभिमान बाळगीत असे. त्याच्या दृष्टीने त्याचा हात म्हणजे सुंदर हाताचा आदर्श नमुना असून परमेश्वराच्या कल्पकतेचा सर्वोत्तम नमुना होता."

राउशनिंगच्या म्हणण्याप्रमाणे हिटलर शाकाहारी होता. ह्या बाबतीत तो वॅग्नर ह्या संगीतक-तत्त्वज्ञाचा अनुयायी होता. आहाराच्या संदर्भात वॅग्नरने शाकाहार हा मांसाहारापेक्षा श्रेष्ठ असतो असे म्हटले आहे. राउशनिंगने पुढे असेही म्हटले आहे की हिटलरच्या मताप्रमाणे, "आपल्या संस्कृतीच्या ऱ्हासाच्या कारणांचा उगम पोटात आहे. कायम बद्धकोष्ठता, पाचकरसातील बिघाड व अतिरिक्त मद्यपान ह्या तिहींच्यामुळे आपल्या संस्कृतीचा ऱ्हास झाला आहे" असे तो म्हणे. आश्चर्याची गोष्ट म्हणजे पुढे लक्षावधी निरपराध लोकांचा काळ ठरलेल्या ह्या गृहस्थाने मानवतावादी दृष्टिकोनातून शाकाहाराची बाजू घेतली आहे. वॉर्ड प्राइस हे वर्तमानपत्रकार लिहितात की "आपल्या शाकाहारी आहाराच्या बाजूने डॉ. गोबेल्स व हिमलर्शी हिरीरीने वाद घालताना हिटलरला मी पाहिलेले आहे. मांसाहार हा त्याच्या दृष्टीने शुद्ध क्रूरपणा होता. आधाशीपणाच्या आहारी गेल्यामुळे शहाणी-सुरती मनुष्येही आपला शहाणपणा कसा गमावितात ह्याचे मांसाहार हे आणखी एक प्रात्यक्षिक आहे असे तो म्हणे. गुस्ताव अॅडॉल्फ फॉन हालेम ह्या नाझी वकिलानेही लिहून ठेविले आहे की, हिटलरचा दृष्टिकोन भूतदयावादी असल्याने किंवा तो शाकाहारी असल्याने त्याला प्राण्यांची शिकार करणे आवडत नसे."

" त्याच्या प्रभावळीतील गोअरिंगसारख्या शिकारी लोकांना तो विचारी की 'समजा, तुम्ही ज्यांची शिकार करता त्या श्वापदांच्या हातात जर तुमच्या-सारख्या बंदुका असत्या तर तुम्ही शिकारीच्या फंदात पडला असता काय? हिटलरच्या मताने प्राण्यांची शिकार हा प्राण्यांचा खून होता. शिकारी स्वतःवर हल्ला करण्याची समान संधी जोवर शिकारीतल्या श्वापदांना देत नाहीत तोवर शिकार म्हणजे खूनच असतो असे तो म्हणे. "

• • • • •

हिटलर स्वत: धूम्रपान करीत नसे व इतरांनी धूम्रपान केलेलेही त्याला आवडत नसे.

त्याला निद्रानाशाचा विकार होता. त्यामुळे पहाटेचे तीन–चार वाजेस्तवर तो बिछान्यावर पडत नसे. कधी-कधी तर यापेक्षाही उशीरा तो झोपी जाई. दिवस मध्यान्हीला आला की तो झोपून उठत असे.

युद्ध होणार असे जेव्हा हिटलर आपल्या मित्रांना सांगे तेव्हा त्या युद्धात काय घडणार आहे याची स्वच्छ कल्पना त्याला होती. ह्या खेपेस जर्मनभूमी युद्धाच्या झळीतून सुटणार नाही ही अटकळ त्याला होती. पण त्याला असेही वाटत होते की जर्मनी जरी उध्वस्त झाला तरी जर्मन लोकांच्या असामान्य धैर्यामुळे व जिद्दीमुळे लवकरच, पूर्वीपेक्षाही उत्तम स्वरूपात तो पुन्हा उभा राहील. युद्धानंतरची नवी जर्मन शहरे जगातील कुठल्याही शहरापेक्षा सुंदर असतील, कारण आपण ती बांधणार आहोत असे तो म्हणे.—युद्ध सुरू झाल्यानंतर युद्धाचा शेवट काय होणार हे अल्पावधीतच त्याला उमजले असावे. कारण युद्धाला पुरते तोड लागण्याच्या पूर्वीच तो असेही बोलला होता की "आमचा विनाश होईल. पण आमच्यावरोवरच साऱ्या जगाला त्या विनाशात ओढल्यावाचून आम्ही राहणार नाही ........ सारे जगही त्या वडवानलात जळून भस्म होईल. "

• • •

जर्मन जनतेच्या कल्याणासाठी आपण खपत आहोत असे तो म्हणे. परंतु जेव्हा पराभव जवळ आला, जर्मनीच्या नाशाचा क्षण उजाडला आणि त्याच्या कारभाराची इतिश्री जर्मनीच्या प्रचंड पराभवात होण्याची वेळ आली



अनुक्रमणिका



तेव्हा तो कुणाच्या कल्याणासाठी खपत होता आणि कुणाच्या नाही हे सर्व जगाला कळून आले. नव्हे त्यानेच आपल्या वर्तनाने ते सर्व जगाला दाखवून दिले.

तो स्वतःला जर्मनीशी एकजीव मानीत होता. जर्मनी आपला दुसरा प्राण आहे असे तो म्हणत असे. परंतु प्रत्यक्षात जर्मनी हे त्याला साध्य वाटत नव्हते तर साधन वाटत होते. त्याच्या महत्वाकांक्षेच्या, त्याच्या अहंपणाच्या परिपूर्तीचे साधन वाटत होते. जर्मन लोक जेव्हा उर्वरित जग त्याच्यासाठी, त्याच्या मोठेपणासाठी पादाक्रांत करू शकले नाहीत, त्यांच्या महत्वाकांक्षेसाठी जिंकू शकले नाहीत तेव्हा जर्मनीविषयीच्या त्याच्या प्रेमाचे रूपांतर कट्टर द्वेषात झाले. ८ नवंबर १९४३ ला म्युनिचला तो वर्धापनदिन साजरा झाला त्यात तो बोलला की, "या कसोटीला जर जर्मन वीर उतरले नाहीत. यात जर ते पराभूत झाले तर त्यांच्या दुर्दैवासाठी डोळ्यातून एक अश्रू देखील मी ढाळणार नाही. मी असे समजेन की त्यांच्या ह्या दुर्दशेला ते अगदीं लायक होते." ( हिटलरच्या उद्गारांना जर्मनीबाहेर प्रसिद्ध करू दिले गेले नव्हते. किंबहुना म्युनिचबाहेरही ते प्रसिद्ध होऊ शकले नव्हते. जर्मन वार्तासंस्थेने ते सेन्सॉर केले होते. ) २० जुलै १९४४ ला हिटलरचा प्राण घेण्याचा त्याच्या काही सेनापतींचा कट उघडकीस आला असताना त्याने जे भाषण केले होते त्यातही त्याने याच स्वरूपाचे उद्गार काढले होते. तेव्हा तो म्हणाला की, "माझ्या महान ध्येय-संपादनासाठी जर्मन देश व जर्मन लोक लायक आहेत किंवा नाहीत याचीच शंका मला येऊ लागली आहे." ऑगस्ट १९४४ च्या एका सभेत तो म्हणाला की, "ह्या संघर्षात जर्मन राष्ट्राचा पराभव झाला व ते राष्ट्र इतरांकडून जिंकले गेले तर त्याचा अर्थ इतिहासाच्या कसोटीत ते राष्ट्र नापास झाले आहे. ते राष्ट्र दुबळे ठरले आहे असा आहे. अशा परिस्थितीत त्या राष्ट्राचा नाश होणे हीच एकमेव उचित गोष्ट ठरते."

ज्यू आणि जर्मन लोक ह्या दोघांच्या स्वभावातील एका साम्याविषयी त्याला नेहमी आश्चर्य वाटे. तो म्हणे की "ज्यू आणि जर्मन दोघेही स्वतःला परमेश्वराचे लाडके समजात; ऐतिहासिक नियती असलेले लोक मानतात. ज्यू आणि जर्मन ह्या दोघांच्या स्वभावात महदंतर आहे. पण सख्ख्या भावाइतकेच त्यांच्यात साम्यही आहे. दोघेही ईश्वराचे लाडके आहेत." हिटलरने ज्यूंचे शिरकाण करून त्यांचे उच्चाटण केले. परंतु ज्यूंबरोबरच सगळ्या जर्मन देशाचाही नाश त्याने घडवून आणला होता. हिटलर स्वतःला 'परमेश्वरी लाडक्या लोकांचा' नेता म्हणवून घेत असे ही गोष्ट जर ध्यानात घेतली तर लाडक्या

लोकांच्या नेत्याने दोन्हीही 'लाडक्या लोकांचा' सर्वनाश घडवून आणला होता असे दिसून येईल.

*   *   *

३० एप्रिल १९४५ रोजी हिटलर व इव्हा ब्रॉन ह्यांनी आत्महत्या केली. आत्महत्या करण्यापूर्वी आपल्या अनुचरांना हिटलरने अशी आज्ञा दिली की आपल्या "शरीराचा कुठलाही अवशेष शिल्लक राहते कामा नये." इव्हा-हिटलरची शरीरे बर्लिन येथील चॅन्सेलरीमधील हवाई-हल्ला-संरक्षक तळघरात जाळली गेलीत. जाळण्यासाठी जे साहित्य हिटलरच्या मित्रांना त्यावेळी उपलब्ध होते त्याच्यात तीं शरीरे निःशेष जळली असतील असे ठामपणे सांगता येत नाही. "शरीरे पूर्णपणे जळाली असतील याची शंका आहे. . . . अस्थी तरी उरल्या असणार. ह्या अस्थी नंतर पुढे कधीच पाहण्यात आल्या नाहीत. ह्याचे स्पष्टीकरण कोणतेही असो परंतु हिटलरची शेवटची इच्छा पूर्ण झाली होती. ॲलरिक हा पहिला जर्मन रानटी सरदार. रोमवर त्याने कब्जा प्रस्थापित केला. (३ रे शतक.) त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या इच्छेवरून त्याचा देह व्युसेन्टो ह्या जर्मन नदीच्या पाण्यात गुप्तपणे पुरला गेला. ॲलरिक ह्या प्राचीन मानव-संहारका-प्रमाणे हिटलर ह्या आधुनिक मानव-संहारकाचा मृतदेहही शोधापलीकडे नाहीसा झाला आहे."

हिटलरच्या मृत्यूपूर्वी कितीतरी वर्षे आधीच हिटलरच्या मृत्यूविषयीची कल्पिते त्याच्या अनुयायात तयार होऊ लागली होती. त्याच्या अनुयायांच्या मते हिटलर हा मोझेसनंतरचा मानवजातीचा दुसरा प्रेषित व मनू. डोंगरमाथ्या-वरून मोझेससारखी नवी आचारधर्मसंहिता आणल्यानंतर तो जगाच्या पाठीवरून अदृश्य होणार आहे. त्याचे शरीर मग कुणाच्याही दृष्टीस पडणार नाही खुद्द हिटलरने देखिल आपल्या निकटवर्तीयास सांगून ठेविले होते की त्याचे लोककार्य सिद्धीस जाण्यासाठी त्याला हौतात्म्य येणे आवश्यक आहे. आपला खरा प्रभाव आपल्या मृत्यूनंतर जाणवू लागेल असा त्याचा स्वतःचा दृढ समज होता.

पिएर जे हुस ह्या गृहस्थांनी हिटलरच्या अशान्त प्रकारच्या उद्गारांची नोंद करून ठेवली आहे (जुलै १९४०, पॅरिस.) हिटलर म्हणत असे की, "मी गेल्यानंतरही माझ्या लोकांवरची माझी पक्कड कशी कायम राखायची हे मला बरोबर माहीत आहे. . . . मृत्यूबरोबर माझ्या आयुष्याचा शेवट

नाही. उलटपक्षी, मृत्यूनंतरच माझ्या खऱ्या आयुष्याला प्रारंभ होणार आहे."

हिटलरचे हे शब्द खरे ठरले आहेत. अनेकांना असे वाटत होते व आहे की बर्लिनचा पाडाव होण्यापूर्वीच हिटलर बर्लिनमधून बाहेर पडला होता व तो कुठेतरी अद्यापि जिवंत आहे. जर्मनी व ऑस्ट्रियात गुप्त हिटलरपंथ देखील कित्येक ठिकाणी निघाले. अनेकांच्या कल्पनेत हिटलर अद्यापि जिवंत होता व जर्मनराष्ट्राच्या उद्धारासाठी व जर्मन राष्ट्राला उद्धाराचा मार्ग दाखविण्यासाठी तो एका सुयोग्य क्षणी प्रकट होणार होता. काहींच्या म्हणण्याप्रमाणे तर हिटलर मरण पावला असला तरी गुप्त पंथाच्या लोकांना तो "दैवी मार्गदर्शन" देणार होता. एका दैनिकाच्या बातमीप्रमाणे दक्षिण आफ्रिकेतील आफ्रिकन लोकांच्या अतिरेकी गटाचे तो "दैवतही" बनला होता व त्याच्या नावाने अनेक ठिकाणी नाझी गटाची स्थापना झाली होती.

"हिटलरचे व्यक्तिमत्व पश्चिम युरोपीय संस्कृतीत बसत नाही. आशियाई बोल्शेविकवादाच्या विरुद्ध आपण युरोपियनांची बाजू घेत आहोत असा कितीही बकवास त्याने केला, तरी हिटलर युरोपीय नरशार्दूलांच्या पंक्तीत बसणार नाही. ... अलेक्झांडर, सीझर वा नेपोलियन ह्यांच्या पंक्तीत बसण्याची त्याची इच्छाही नसावी. रोम लुटणारा ॲलरिक, परमेश्वराचा कोप ॲटिला हूण आणि सोनेरी टोळधाडीचा नेता चंगीझखान यांचा तो नवा अवतार असावा.

( H. R. Trevor-Roper–The Last Days of Hitler, पृ. ५२.)

---

१. पीटर बॉमगार्ट नावाच्या एअरमनवर युद्धगुन्ह्यांसाठी पोलंडमध्ये खटला चालू असताना त्याने असे सांगितले की, २८ एप्रिल १९४५ रोजी "आपण हिटलर व इव्हा ब्रॉन, तिची बहीण, जनरल रोमर ह्या साऱ्यांना डेन्मार्कला पोचविले होते." ( The Times, १३ डिसेंबर १९४७ )

---

● रोम जळत असताना निरो फिडल वाजवित होता ही गोष्ट खोटी असावी. निरोने फिडल वाजविल्यामुळे लोकांनी रोम जाळले असण्याची शक्यता अधीक आहे.







# आन्द्रे मालरो आणि पाप-प्रकटनाचे तंत्र

आन्द्रे मालरो हे विश्वविख्यात फ्रेंच कादंबरीकार, कलाभिज्ञ, उत्कृष्ट निबंधकार आणि अग्रगण्य राजकारणी गृहस्थ आहेत. फ्रान्सच्या मंत्रिमंडळात त्यांचा समावेश झालेला आहे. त्यांची अनेक पुस्तके इंग्रजीत भाषांतरित झालेली आहेत. The Conquerers, The Royal Way, Man's Estate, Days of Hope, The Walnut Trees of Altenbury, Saturne, The Voices of Silence, The Metamorphosis of Gods, ही त्यांची गाजलेली पुस्तकें. त्यांच्या आठवणी **Antimemoirs** या नावाने १९६८ मध्ये प्रसिद्ध झाल्या—'प्रतिस्मरणे' असे त्याचे भाषांतर करता येईल. या पुस्तकात ठिक-ठिकाणी अतिशय सूक्ष्म चिंतन, उत्कृष्ट विचार आणि सुंदर अभिव्यक्ती आढळते. त्यातले काही उतारे व वचने खाली देत आहे :

पुस्तकाच्या प्रारंभीच मालरोंनी एक बौद्धवचन दिले आहे. ते असे :

हत्ती हा सर्व प्राण्यात फार बुद्धिवान आहे. फक्त त्यालाच पूर्वजन्म आठवतात. त्यामुळे दीर्घ काळ तो त्यांचे चिंतन न करता स्तब्ध उभा राहतो व्हेरकोरच्या चर्चच्या चॅपलेनचे एक संभाषण मालरोंनी सुरुवातीला दिले आहे. हे धर्मगुरू लोकांची पापाची कबुली घेत. पंधरा वर्षे ते या जबान्या घेत होते. "या जबान्या घेताना माणसाविषयी तुम्हाला काय बोध झाला?" असा प्रश्न मालरोंनी केला. त्यावर चॅपलेननी उत्तर दिले, 'या जबान्यावरून कुणाला काहीच शिकता येत नाही. एकतर लोक वाटतात त्याहून दुःखी असतात हे मला कळले नि दुसरी गोष्ट कळली ती ही की खऱ्या अर्थाने प्रौढपण आलेला, वाढ झालेला माणूस ही गोष्टच अस्तित्वात नसते ! माणूस कायम बाल्यावस्थेतच असतो."

यानंतर कन्फेशन किंवा अपराध-कबुली बद्दल मालरोंनी पुढे जे विवेचन केले ते अतिशय चिंतनीय आहे.

आपले पाप-प्रकटन सुबुद्ध माणसे विविध प्रकारे करतात. आन्द्रे गीदसारखे कलावंत लेखक आपल्या दैनिकीतून हे प्रकटन करतात. ख्रिस्ती आत्मप्रकटनांहून ते भिन्न असले व पापमुक्ती हे धार्मिक ध्येय इथे प्रत्यक्षात आढळले नाही, तरी बौद्धिक आत्मप्रकटनाचे कार्यही त्याच्याच जातीचे असते. डोस्टोयव्हस्कीचे पात्र स्टाव्हरोजिन पाप-कबुली देतो. ती कबुली वस्तुतः लेखकाचीच आहे. या बुद्धिवंतांचा पाप-स्वीकार व पाप-प्रकटन यातून काय निष्पन्न होते ? मालरो यांच्या मते त्याच्यामुळे माणूस आपल्या नियतीचे उन्नयन करतो. "भोगलेल्या नियतीचे उन्नत नियतीत रूपांतर करणे ही मानवाला साध्य करता येणाऱ्या

निर्मितीत सर्वात गंभीरोदात्त निर्मिती आहे," असे ते म्हणतात. लेखक ज्या संस्मरणिका किंवा स्मृती लिहितात त्यातही हे पाप-प्रकटन अनेकदा दिसून येते. मालरो सेंट ऑगस्टिनच्या पाप-प्रकटनाला प्रकटन म्हणत नाहीत; कारण त्यात मुख्यत: अध्यात्म आहे. विसाव्या शतकातल्या स्मृतीग्रंथांसंबंधी विचार करताना ते म्हणतात हे ग्रंथ दोन प्रकारचे असतात. एका प्रकारात घटनांचे वर्णन असते. उदाहरणार्थ जनरल द गॉल यांचे War Memoirs किंवा टी. इ. लॉरेन्सचा Seven Pillars of Wisdom; अशा पुस्तकात महान कर्तृत्वाचा आलेख आढळतो. दुसऱ्या प्रकारात मानवाचा अभ्यास म्हणून केलेले अंतर्मुख चिंतन असते. आन्द्रे गीद यांचे उदाहरण या बाबतीत प्रामुख्याने देता येते. इंग्रजीत 'यूलिसिस'[1] आणि फ्रेंचमध्ये 'आ ला रशर्श दु तां पर्दु[2] या दोन कादंबऱ्या म्हणजे आत्म-प्रकटनाचेच रूपांतर आहेत. इथे पाप-प्रकटनानेच कादंबरीचा आकार धारण केला आहे. अंतर्मुख आत्मचरित्राने स्वत:चे स्वरूप बदलले आहे. कारण मानसशास्त्रीय विश्लेषणामुळे उत्पाती स्मृतिलेखकाची पाप-प्रकटने देखिल मुक्कड ठरली. कारण मानसशास्त्रीय विश्लेषणातून जे भयानक असुर निघाले त्यांच्यापुढे आत्मप्रकटनातून निघालेला माणूस अगदीच किरकोळ दिसू लागला. विश्लेषणाच्या बैठकीत मानवी अंत:करणाची गुपिते जशी खोलली जातात तशी आत्मप्रकटी-करणाच्या कुठल्याही प्रकाराने होत नाहीत. फ्रॉईडच्या Man with Rats ('उंदरांसमवेत माणूस') या लिखाणाने व संकल्पनेने आपल्याला जसा धक्का बसतो, तसा स्टाव्ह्रोजिनच्या पाप-प्रकटनानेही बसत नाही.

## आन्द्रे मालरो व पौर्वात्य शिल्पकला

'अँटीमेम्वार, (Anti-Memoirs) ऊर्फ 'प्रतिस्मृती'त आन्द्रे मालरो १९३४, १९५० व १९६५ या सालातल्या कला व मृत्यूसंबंधी स्वत:च्या धारणा सांगतात.

ते म्हणतात, 'स्मृतींमध्ये खचितच कुणी लेखक स्वत:ला कल्पना कशा भेटल्या ते सांगतो. परंतु माझ्या व इतर बुद्धिवानांच्या मनात असे येते की काही कल्पना माणसाला जेव्हा प्रथम भेटतात, तेव्हा त्या एखाद्या माणसाची गाठभेट व्हावी

---

१. यूलिसिस–जेम्स जॉईस; २. Remmbrance of Things Pasts प्राऊस्त.

इतक्या मूर्त, साक्षात आणि संनिध असतात. म्हणूनच त्यांना मी कल्पनांची गाठ पडणे म्हणतो. या कल्पनांचा विकास व विस्तार हा नंतरचा टप्पा असतो. या मूर्त कल्पना बहूप्रसव आहेत हे आपणाला तत्काळ उमगते. अशा कल्पनांपैकी एक मला मिसरमध्ये भेटली. ही कल्पना स्फिंक्सच्या पुतळयातून आविर्भूत झाली. त्या मूर्तीचा दगड इतका झिजला होत की तिचा चेहरा आकारहीन व्हायच्या बेताला आला होता; झिजून पाषाण आकारहीन झाला की मग मूर्तींच्या चेहऱ्यांना, 'सैतानी' दगडांची किंवा पवित्र डोंगरांची कळा येते. तशीच सैतानी अगर दैवी कळा स्फिंक्सला आली होती. रात्र पडत असल्यामुळे अगोदरच नाहीसा होत चाललेला तो चेहरा तर आणखीच झाकळून जातो आहे. या क्षणीच सर्वात प्राचीनतम घडीव आकार, जिथे देव पूर्वी बोलते झाले, त्या स्थळाला पुन्हा चैतन्य, नवजीवन देताहेत; ती विशाल आकारहीनता, ते पुरातन घडीव, बांधीव आकार हुसकावून लावताहेत आणि नक्षत्रांना, रात्रीतून आविष्कृत होऊ पाहणाऱ्या नक्षत्रांना, स्वत:भोवती प्रदक्षिणा घालण्यास आज्ञापिताहेत. ईजिप्तच्या या स्मारकशिल्पांनी काल व पैस यांच्यावर आपला ठसा उमवटला आहे. हा ठसा सर्व अटळ नियतीचा एक भाग वळकावणाऱ्या सर्व आकारजातातून प्रतीत झालेला आहे. त्या सर्व आकारजाताच्या संदर्भात, काही अंशाचा बदल सोडला, तर वास्तवता हाच देखावा आहे, वास्तविक दर्शन आहे. त्याशिवाय त्यात आणखीही असे काही असते की तो देखावा (appearence) नसतो. की त्या त्याला देव असेही नेहमीच म्हणत नाहीत. मानवाचे चिरंतन आवर्तन (drifting), चिरंतन परिवर्तन आणि त्याला प्रवृत्त करणारे किंवा त्याची अजिबात दखल न घेणारे, त्याला तुच्छ गणणारे असे जे काही असते, त्यात जो सुसंवाद (harmony) असतो. त्यामुळेच त्या आकारांना सत्ता व परिणाम-कारकता लाभते. स्फिंक्सचे ओबडधोबड शिरोभूषण पिरॅमिडांशी सुसंवादी आहे. परंतु पिरॅमिडांच्या या प्रचंड राक्षसी रूपाकृती त्यांच्याखाली असलेल्या लहानशा दफनघरातून उठलेल्या आहेत. त्यात असणाऱ्या लेपसंस्कारित (embalmed) प्रेताची सांगड अनंततेशी घालण्याचे महत्कार्य पिरामिडांचे होते.

हे दिसून आले आणि मग गेली तीस वर्षे ज्या दोन भाषा मला एकच आहेत असे वाटत होते, त्यातला फरक मला कळला. यातली पहिली भाषा देखाव्याची, बाह्य दर्शनाची; हीभाषा जमावाची; ही भाषा भंगुराची. दुसरी भाषा सत्याची, अनंताची आणि पवित्राची हिंदू खेडुतांना मानवातल्या अज्ञाताचे जे दर्शन झाले तेच ईजिप्तला देखिल झाले. परंतु हिंदू लोकांना अनंततेचा

साक्षात्कार जसा स्वतःच्या शत्रूला पायाखाली चिरडणाऱ्या नटराज शिवाच्या तांडवनृत्याचे प्रतीक जसे नक्षत्रात परावर्तित झालेले पाहून होतो, तसा ईजिप्तला तो दिसत नाही. ईजिप्तचे अनंततेचे प्रतीक स्फिंक्स आहे. स्फिंक्स म्हणजेच एक मोठा भ्रम आहे. तिची अवास्तावता तिच्या भग्नतेने आणखीच प्रत्ययाला येते; त्या भग्नतेने तिचे मस्तक म्हणजे मृत्यूचेच प्रचंड मस्तक भासते. युरोपमधली ख्रिस्ती प्रार्थना मंदिरे आणि भारत व चीनमधली पाषाणमंदिरे मला तशीच वाटली. मला जाणवले की कला म्हणजे लोकांच्या जीवनातले भंगुर जे आहे, त्यातून निघालेली दुय्यम वस्तू नव्हे. हे भंगुर म्हणजे त्यांची घरे, लाकडी सामान-सुमान इत्यादि. त्या भंगुराचे कला प्रतीक नव्हेत. कला ही प्रत्येकाने आपापल्या धर्माने जे अनंतत्व निर्माण केलेले असते त्याचे प्रतीक आहे. कला समाधीवर, कबरीवर नव्हे, तर अनंततेवर आधारलेली असते. सर्व धर्मपर कला मृत्युविमुख असते. कारण ती कला त्या-त्या संस्कृतीचे अलंकरण म्हणून नव्हे, तर तिच्या परमोच्च मूल्यांचा आविष्कार म्हणून अस्तित्वात आलेली असते. 'पवित्र' या शब्दात मला अंत्येष्टीचे ताणलेले सूर ऐकू आले नाहीत शाश्वत वास्तवता असते ती असते ती पारलौकिकच असते आणि या संदर्भात पाहिले की मला आधुनिक कला एखाद्या दंतकथेतल्या पशूसारखी भासते. परंतु हा शोध घ्यायला मला अनेक वर्षे खर्ची घालावी लागली."

---

## चांगल्यांचे जग विलयाला गेले

मॉरिस निकॉल हे The New Man (१९४३) या आपल्या पुस्तकात म्हणतात, "माझी दिवसेंदिवस खात्री पटत चालली आहे की आता भल्या माणसांचे युग मावळले आहे. आमचा शेवटचा सज्जन नेव्हिल चेंबरलेन होते. ते महान नव्हते, पण भले निश्चित होते. आता चर्चिल हा मधला दुवा आहेत. याच्यानंतरचा इतिहास म्हणजे दुर्जनांचा अभ्युदय ठरेल;' हे लोक दुसऱ्यांच्या दुःखकष्टांचा उपयोग आपल्या स्वार्थासाठी करतील, आजच मिस्. एम्. मला म्हणाल्या की 'माझा अन्न-मंत्रालयाचा अनुभव असा आहे की, या मंत्रालयात जसे दुष्ट, गळाकापू युगाचे दर्शन होते, तसे पूर्वी मी जेव्हा रंगमंचावर काम करीत होते, तिथेही आले नाही. पूर्वी लोकांत थोडीतरी दया होती, सभ्यपणा होता; आता त्यांच्यात काहीच राहिलेले नाही. .

( Beryl Pogson, Maurice Nicoll, London, 1961, P. 215. )







अनुक्रमणिका




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

